# नवभारत

वर्ष २ रें ] फेब्रुवारी १९४९ [ अंक ५ वा



१ रुपया







अनुक्रमणिका




नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका






सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्त-मंडळाचें मासिक

वर्ष दुसरें | अंक पांचवा

# नवभारत

फेब्रुवारी १९४९

संचालक : श्री. शंकरराव देव

संपादक-मंडळ

आचार्य शं. द. जावडेकर–आचार्य स. ज. भागवत – श्री. हरि कृष्ण मोहनी – प्रा. वि. म. बेडेकर
का. संपादक

---



---

वार्षिक रु. ९ | सहामाही रु. ५ | अंकास रु. १

हें मासिक श्री. र. ग. जोशी यांनीं सुलभ मुद्रणालय, २९१ शनिवार, पुणें २, येथें छापून, सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्त-मंडळाकरितां तेथेंच नवभारत कार्यालयांत प्रसिद्ध केलें.

# 'नवभारत' फेब्रुवारी १९४९

## लेखक-परिचय

[ खालीं दिलेल्या लेखकांशिवाय या अंकांतील इतर लेखकांचे लेख 'नवभारतां'त पूर्वी आले असून त्या त्या वेळीं त्यांचा परिचय दिलेला आहे.— का. सं. ]

**श्री. श. वा. रानडे** (नागपूर)— वाङ्मयप्रेमी अभ्यासक.

**श्री. बा. भ. बोरकर** (पुणें)— 'प्रतिभा', 'जीवनसंगीत', 'दूधसागर' इत्यादि काव्यसंग्रहांचे; 'कागदी होड्या' या लघुनिबंधसंग्रहाचे; 'मावळता चन्द्र', 'अंधारांतील वाट' इत्यादि कादंबऱ्यांचे कर्ते. 'आमचा गोमंतक' या पाक्षिकाचे संपादक.

**प्रा. य. द. भावे**— बेळगांव येथील लिंगराज कॉलेजमध्यें इंग्रजीचे प्राध्यापक. प्रा. माटे यांच्या 'विज्ञानबोधा'मधील 'चमत्कारखंड' व 'चरित्रखंड' यांचे सहसंपादक व लेखक. या अंकांतील त्यांची कविता ही त्यांच्या 'आर्द्रा' या आगामी काव्यसंग्रहामधील आहे.

**प्रा. गं. ब. ग्रामोपाध्ये**— बेळगांव येथील लिंगराज कॉलेजमध्यें मराठीचे प्राध्यापक. 'संतकाव्य-समालोचन', 'पेशवेकालीन मराठी भाषेचें स्वरूप' या पुस्तकांचे कर्ते.

**श्री. पां. श्री. आपटे**— सुप्रसिद्ध निष्ठावंत कार्यकर्ते. 'टिळकदर्शन' 'गांधीदर्शन' इत्यादि पुस्तकांचे लेखक.

**श्री. अच्युतराव पटवर्धन**— सुप्रसिद्ध समाजवादी पुढारी.

**श्री. सानेगुरुजी**— सुप्रसिद्ध निष्ठावंत कार्यकर्ते व प्रतिभावंत साहित्यिक. 'साधना' ह्या वैशिष्ट्यपूर्ण साप्ताहिकाचे संपादक.

---

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल, अशा प्रकारें महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणें, हें या मासिकाचें ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनीं स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठीं जें आपलें सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेलें असेल, उच्च वातावरणांतील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेनें संगृहीत केलेला असेल, त्याचें दिग्दर्शन हेंच संस्कृति-पोषक वाङ्मय होऊं शकतें, असा संचालक व संपादक-मंडळ याचा विश्वास आहे.

या मासिकांत येणाऱ्या लेखांत कोणत्याहि विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतु नाहीं.

संचालक व संपादक-मंडळांतील सर्व व्यक्ती यांचेंही सर्व विषयांत मतैक्य आहे, असें नाहीं. मानवी जीवन-विषयक व सांस्कृतिक मूल्यासंबंधीं सदृश अशा दृष्टिकोनानेंच त्यांना एकत्र आणलें आहे. तथापि प्रत्येकाचें व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होतां विकास व्हावा या दृष्टीनेंच त्यांचें सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ति आपल्या नांवानें प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकांत प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणांत सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

---

अनुक्रमणिका



काय सांगावें, भावी पिढ्या कदाचित् विश्वासही ठेवणार नाहींत कीं असा मनुष्य-खरोखरी हाडामांसाचा मनुष्य-या पृथ्वीतलावर होऊन गेला म्हणून!

—प्रो. आल्बर्ट आइन्स्टाइन

नवजीवन ट्रस्टच्या कृपेनें।










# ‘सर्वोदय-दिन’

महात्मा गांधींचा प्रथम वार्षिक श्राद्धदिन जानेवारी ३० ला नुकताच ‘सर्वोदय-दिन’ म्हणून पाळला गेला; त्या दिवसाकरितां कॉंग्रेसच्या कार्यकारिणीनें तयार केलेला जो संदेश ठिकठिकाणीं देशभर वाचला गेला त्याचा अनुवाद खालीं दिला आहे:

“पिढयानुपिढया चालविलेल्या स्वातंत्र्यसंग्रामाच्या दीर्घ इतिहासांत हिंदुस्थाननें दुःख व सुख, कित्येक विजय नि पराजय अनुभवले आहेत. परंतु आमच्या राष्ट्रपित्याच्या–नेत्यांचेहि नेते अशा आमच्या राष्ट्रपित्याच्या–नेतृत्वा (Super-leadership) मुळें दुःखानेंहि लोकांना नम्र व पावन केलें; पराजयानेंहि दुप्पट जोरानें प्रयत्न करण्याची स्फूर्तिच दिली व विजयाची पूर्वतयारी केली.

“अलीकडील वर्षें तर अडचणींनीं भरलेलीं, आमच्या परीक्षेचींच होतीं. परंतु त्या वेळींहि गांधीजींच्या संदेशानें राष्ट्राला धैर्य व चैतन्य दिलें. या काळांत आमचे मनोरथ अंशतः सफल झाले आणि ज्याकरितां पिढयामागून पिढयांनीं संग्राम केला व यातना अनुभवल्या तें स्वातंत्र्य आम्हांस मिळालें. पण तें मिळवितांना आम्हांला किंमत किती जबर द्यावी लागली! आमच्या मातृभूमीचे दोन तुकडे झाले! या भयंकर फाळणीच्या अनर्थानंतर लोकांना जणूं पिशाच्चबाधा होऊन त्यांचीं माथीं भडकलीं; आणि ज्या ध्येयाकरितां आपलें सर्व जीवन गांधीजींनीं वाहिलें त्या ध्येयांना क्षणभर ग्रहण लागल्यासारखें दिसलें! परंतु अशाहि अंधारांतून गांधीजींचा संदेश प्रकाशत होता. दुःखानें पोळलेल्या किती तरी अंतःकरणांना त्यामुळें धीर व हुरूप प्राप्त झाला!

आणि यानंतर–! यानंतर आमच्यावर तो अत्यंत दारुण वज्राघात झाला! जो स्वतः प्रेमाची मूर्ति, जो हिंदुस्थानच्या शांत आणि दुर्दम्य वृत्तीचा मूर्तिमंत अवतार, त्याचाच खून झाला! अशा रीतीनें जें मिळविण्याकरितां हिंदुस्थाननें महान् सायास केले, जें दीर्घकालीन संग्रामाचा मूर्तिमंत परिपाक, असें तें स्वातंत्र्य मिळूनहि स्वातंत्र्यप्राप्तीमुळें जीवनांत प्रफुल्लता तर आलीच नाहीं उलट दुःख आणि सुन्नपणाच सर्वत्र पसरला!

“गांधीजींचें आणि त्यांनीं शिकविलेल्या तत्त्वांचें पवित्र स्मरण करीत आपल्या देशानें या सर्व भीषण अनर्थांना धैर्यानें तोंड दिलें. या सर्व जीवन-मरणाच्या अनर्थकारी प्रसंगांतून अत्यंत भीषण अशा जर कोणत्या आपत्तीची भीति वाटली असेल तर ती ही कीं आपला नैतिक धीरच, आपली सत्त्ववृत्तिच खचून जाते कीं काय (Crisis of the spirit)! कांहीं

काळ तरी या भीतीनें हिंदुस्थानचें मन काळवंडून गेलें होतें, हिंदुस्थानला कांहीं काळ भ्रान्ति होऊन तो आपल्या गुरुजींचीं तत्त्वें जणूं विसरूनच गेला होता !

" ज्यानें राष्ट्राला स्वातंत्र्य मिळवून दिलें आणि जीवन दिलें त्याच्या निर्याणाला एक वर्ष लोटलें आहे. या पहिल्या श्राद्धदिनीं आम्ही त्या महान् आत्म्याला आणि त्याच्या महान् संदेशाला आदरयुक्त श्रद्धांजलि अर्पण करतों आणि त्या चैतन्यप्रद संदेशानुसार हिंदवासियांची आणि मानव-जातीची सेवा करण्याचें व्रत चालूं ठेवण्याचा निश्चय करतों.

" गांधीजींच्या नेतृत्वाखालीं अनत्याचारी साधनांनीं आम्ही राजकीय स्वातंत्र्य मिळविलेलें आहे. आतां आम्हांला सामाजिक आणि आर्थिक स्वातंत्र्य साध्य करून घ्यावयाचें आहे. कारण त्या योगानेंच तमाम हिंदी जनतेला जातिधर्मनिरपेक्ष अशी उन्नति व समान संधि प्राप्त होतील. तें साध्य करायचें म्हणजे आपण नवीन आणि विधायक दृष्टीनें प्रेरित होऊन आपल्या मातृभूमीच्या सेवेला विधायक वृत्तीनें स्वतःला वाहून घेतलें पाहिजे.

" हिंदुस्थानच्या जनतेनें स्वातंत्र्य मिळविलें खरें; परंतु तें स्वातंत्र्य खरें उपभोगायचें असेल तर जनतेनें आपल्या जबाबदाऱ्या व आपलीं कर्तव्यें पार पाडलीं पाहिजेत. ह्या जबाबदाऱ्या व कर्तव्यें अंगावर घेऊन जनतेची सेवा करण्याचा खास मान आतांपर्यंत आपणांस मिळत आला आहे तो तसाच पुढें देखील मिळत रहावा याची जाणीव आपण नेहमीं ठेविली पाहिजे. आपलीं कर्तव्यें विसरून जे अधिकाराला व सत्तेला लालचावले आहेत ते आपल्या देशाचें अकल्याण करीत आहेत.

" हिंदुस्थानांतील जनतेंत ऐक्य व सदिच्छा यांचें संवर्धन व्हावें, वर्गभेद आणि जन्म, जात, धर्म यांच्यावर अधिष्ठित असलेला उच्चनीचपणा नष्ट करावा आणि शांततामय मार्गानें वर्गहीन समाज अस्तित्वांत यावा या गोष्टींकडे आपण आपल्या सेवावृत्तीचा मोर्चा वळविला पाहिजे यावर गांधीजींचा विशेष कटाक्ष होता. ज्या नैतिक मूल्यामुळें जीवनाला खरी कृतार्थता येते त्यांचें पालन कोणत्याहि परिस्थितींत, कांहींहि झालें तरी, केलें पाहिजे ह्यावर गांधीजींचा विशेष भर होता.

" आज राष्ट्रीय वा आंतरराष्ट्रीय क्षेत्रांत ज्या अडचणी व अनर्थ-कारक प्रसंग आम्हांवर गुदरले आहेत त्यांना गांधीजींच्या संदेशाच्या अनुरोधानेंच तोंड देण्याचा आम्ही मनापासून प्रयत्न करूं. कारण अशाच योगानें हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याचें संवर्धन होऊन त्याची नैतिक उंची वाढेल आणि ज्या ध्येयांना आपलें जीवन गांधीजींनीं वाहिलें तीं ध्येयें परिपूर्ण होतील. "

---

अनुक्रमणिका

डॉ. अ. स. अळतेकर

# प्राचीन भारतीय शासनपद्धति : गुणदोषविवेचन

प्राचीन भारतीय शासनपद्धतीचें 'नवभारता'-च्या ऑक्टोबर १९४८ च्या अंकांत दिग्दर्शन केलें आहे. आतां तिचे ठळक गुणदोष काय होते व त्यांपासून आपणांस काय बोध घेतां येईल तें पाहूं. गुणदोषविवेचन करतांना एक खबरदारी घेणें फार आवश्यक आहे. आजच्या परिस्थितीच्या, सिद्धांताच्या किंवा मतप्रणालीच्या दृष्टीनें प्राचीन शासनपद्धतीचें मूल्यमापन करणें योग्य होणार नाहीं. त्या वेळीं हिंदुस्थानांत परिस्थिति काय होती व इतरत्र शासनपद्धति कशी काय व कितपत उत्क्रान्त झाली होती तें लक्षांत घेऊनच आपण प्राचीन भारतीय शासनपद्धतीचें गुणदोषविवेचन केलें पाहिजे.

## प्रजातंत्राच्या विनाशाचीं कारणें

प्राचीन भारतखंडांत नृपतंत्र, प्रजातंत्र, उच्चजनतंत्र (Aristrocracy) इत्यादि अनेक प्रकारच्या शासनपद्धती प्रचलित होत्या. त्यांपैकीं नृपतंत्रच अखेर लोकप्रिय झालें व प्रजातंत्रादि इतर राज्यपद्धती विनष्ट झाल्या. भारतामधील ही घटना अनन्यसाधारण नव्हती. कारण ग्रीस, इटली वगैरे पाश्चात्य देशांतहि प्रथम प्रजातंत्रें अस्तित्वांत होतीं व त्यांची जागा हळूहळू नृपतंत्रांनीं व्याप्त केली. तेव्हां प्रजातंत्रात्मक शासनपद्धति हिंदुस्थानांत रुजतच नाहीं म्हणून ती येथें यशस्वी होणार नाहीं असा कांहीं सिध्दान्त आपणांस प्राचीन इतिहासावरून काढतां यावयाचा नाहीं. प्राचीन हिंदुस्थान, ग्रीस व इटली या सर्व देशांत प्रजातंत्र-राज्यें फार छोटीं छोटीं होतीं. प्रातिनिधिक पद्धति त्या वेळीं कोठेंच माहीत नसल्यामुळें प्रजातंत्रीय राज्यें विस्तारानें मोठीं होणें कोठेंच शक्य झालें नाहीं. राज्यांतील उच्चवर्गीतील बहुतेक सर्व पुरुषांस लोकसभेमध्यें हजर राहून बोलण्याचा व मत देण्याचा अधिकार होता. अशा लोकांची संख्या मोठ्या राज्यामध्यें बेसुमार झाली असती. म्हणून प्रजातंत्र राज्यें मोठीं होऊं शकलीं नाहींत. याच्या उलट नृपतंत्रांचें साम्राज्यांत रूपांतर होऊं लागलें व तीं अधिक शक्तिशाली झालीं, व छोट्या छोट्या प्रजातंत्रांना ग्रासून टाकूं लागलीं.

ज्या उपरिनिर्दिष्ट परिस्थितीमुळें प्रजातंत्र राज्यें विनष्ट झालीं ती परिस्थिति आज नाहीं. प्रातिनिधिक पद्धति हल्लीं सर्वत्र रूढ आहे. तेव्हां विशाल प्रजातंत्रें जशीं जगामध्यें इतरत्र प्रस्थापित झालीं आहेत तशीं तीं हिंदुस्थानमध्येंहि प्रस्थापित होऊन त्यांचें संघराज्य बनणें प्राचीन परंपरेशीं मुळींच विसंगत नाहीं.

प्राचीन प्रजातंत्रामध्यें निर्णायक सत्ता क्षत्रिय (म्हणजे आधुनिक खत्री, मराठे वगैरे) वर्गाचे हातामध्यें असे. हल्लीं खऱ्याखुऱ्या लोकसत्तेचें युग आलें आहे, तेव्हां प्राचिन परंपरा चालू राखणें शक्य नाहीं. नवभारतामध्यें मतदानाचा हक्क सर्व जमातींना सारख्याच तत्त्वावर देणें जरूर आहे, व तसा तो देण्यांतहि येत आहे.

'ना विष्णुः पृथिवीपतिः' या मताचा वाढता प्रसार हेंहि एक प्रजातंत्रांच्या विनाशाचें कारण होतें हें आपण वर पाहिलेंच आहे. आधुनिक युगामध्यें राजाच्या देवत्वाची कल्पना प्रजातंत्रांच्या प्रस्थापनेच्या आड येणें शक्य नाहीं. देशी राज्यें ज्या झपाट्यानें हिंदुस्थानांत विलीन होऊं लागलीं आहेत व जीं उरत आहेत, त्यांमध्यें ज्या वेगानें जबाबदार राज्यपद्धति प्रस्थापित होऊं लागली आहे, त्याकडे पाहिलें म्हणजे राजाच्या देवत्वाची कल्पना आतां प्रजातंत्राच्या आड मुळींच येणें शक्य नाहीं हें सहज दिसून येईल. अखेर जीं देशी राज्यें उरतील, त्यांच्या








नरेशांनींहि हें ध्यानांत ठेवणें जरूर आहे कीं, जे राजे सुयोग्य, सदाचारी व कर्तव्यरत असत व प्रजेचे विश्वस्त म्हणून राज्यकारभार चालवीत त्यांसच परमेश्वराचे अंश मानीत; जे याच्या उलट वर्तनाचे असत, त्यांस राक्षसाचे अंश समजण्यांत येई. जोंपर्यंत देशी राजे परमेश्वराचे अंश म्हणून मानण्याच्या योग्यतेचे राहतील व आपल्या राज्यामध्यें खरीखुरी जबाबदार राज्यपद्धति चालू देतील तोंपर्यंतच तीं टिकतील यांत शंका नाहीं.

नवभारतामध्यें स्थापण्यांत येणारे प्रजातंत्र कोणत्या परिस्थितींत प्रभावशाली होईल व कोणत्या परिस्थितींत त्यास उतरती कळा लागेल यावरहि प्राचीन भारतीय शासनपद्धतीच्या अध्ययनानें चांगला प्रकाश पडतो. आपसांतील तंटे, फुटीर प्रवृत्ति, पुढारीपणाबद्दल अहमहमिका वगैरे कारणांमुळें प्रजातंत्रें कमजोर बनत, सत्ताहीन पार्टीचे पुढारी आपल्या स्वार्थाकरितां देशाचा गळा कापून परकीय शत्रूशीं संगनमत करून देशामध्यें आपला जम बसवीत व त्यामुळें अखेर देश हा परतंत्र होई, हें आपणांस प्राचीन इतिहासावरून दिसून येतें. लिच्छवि प्रजातंत्राचा नाश केव्हां होईल याबद्दल भगवान् बुद्धास एकदां विचारणा केली होती; त्या वेळीं त्यानें केलेलें भाकीत ध्यानांत ठेवण्याजोगें आहे. बुद्ध भगवान् म्हणाले होते कीं "जोंपर्यंत लिच्छवींची लोकसभा नियमानें भरत जाईल, वारंवार भरत जाईल, जोंपर्यंत तिचे सभासद एकदिलानें राहून एकोप्यानें राज्यकारभार करतील, जोंपर्यंत ते वृद्ध, अनुभवी व योग्य पुढाऱ्यांचा आदर करून त्यांच्या सल्ल्यानें वागत जातील व तुच्छ स्वार्थ व मानापमान यांच्याकरितां भांडत राहणार नाहींत, तोंपर्यंत लिच्छवि प्रजातंत्र शक्तिशालीच राहील. ज्या वेळीं याच्या उलट परिस्थिति होईल त्या वेळीं त्याचा नाश होईल." भगवान् बुद्धाची भविष्यवाणी फक्त लिच्छवींऐवजीं हिंद प्रजातंत्र एवढा नामाचा फरक करून हिंदुस्थानच्या पार्लमेंट-भवनावर कोरून ठेवण्याजोगी आहे यांत शंका नाहीं.

### राजाच्या सत्तेवरच्या नियंत्रणाचे प्रकार

वैदिक युगामध्यें लोकसभा ऊर्फ समिति हिच्या हातांत खरीखुरी राज्यसत्ता असे. समितीशीं वेबनाव होणें, म्हणजे राजावर सर्वांत मोठी आपत्ति येणें असें समजत. समितीच्या द्वारा पुष्कळ राजेलोक पदच्युत होत असत; पुन्हां जर त्यांना समितींत मताधिक्य मिळालें तरच त्यांना सिंहासनाधिष्ठित होतां येई. उत्तर वैदिक कालामध्यें पुढें समितीचें अंतर्धान झालें व राजांची सत्ता वाढत गेली. हळूहळू त्यांच्या देवत्वाचाहि पुरस्कार करण्यांत येऊं लागला. पण राजाचें देवत्व मान्य करणारे स्मृतिकारहि त्याचा प्रजेवर जुलूम करण्याचा अधिकार कधींच मान्य करीत नसत. पण जुलमी राजांच्या निरंकुशतेस प्रतिकार करण्यास जें एक प्रभावी साधन म्हणजे लोकसभा होती तिचा जेव्हां लोप झाला, तेव्हां त्याऐवजीं दुसरा व्यावहारिक उपाय आमचे स्मृतिकार सुचवूं शकले नाहींत. नरकाचें भय कांहीं राजांचे जुलमी हात थांबवूं शकलें, सर्व राजांचा थांबवूं शकलें नाहीं. आमच्या ग्रंथकारांनीं कांहीं ऐहिक व व्यावहारिक उपायहि सुचवले होते, पण ते अमलांत आणणें कठिण होतें. जुलमी राजांच्या डोळ्यांत झणझणीत अंजन घालण्याकरितां संत्रस्त प्रजेनें देशत्याग करावा असेंहि आमचे स्मृतिकार सांगतात. या उपायाचा अवलंब करून प्रजेनें राजावर मात केल्याचे कांहीं दाखले प्राचीन इतिहासांत सांपडतात हें खरें; पण एकंदरींत हा उपाय अंमलांत आणण्यास अत्यंत कठिण होता यांत शंका नाहीं. अत्याचारी राजाचा वध करण्यासहि प्रजेला स्मृतिकारांनीं परवानगी दिलेली आहे. त्याप्रमाणें कांहीं राजांचे वध झाल्याचे दाखलेहि पुराणांत व प्रत्यक्ष इतिहासांत आढळतात; पण हा उपायहि कष्टसाध्यच होता. यशस्वी बंड झाल्याशिवाय राजास प्राणदंड होणें शक्य नसतें व यशस्वी बंड करणें ही गोष्ट बरीच कठिण असते. एकंदरींत विचार करतां हें मान्य करावें लागेल कीं, ज्या वेळीं लोकसभा लुप्त झाली, त्या वेळीं राजावर प्रभावी नियंत्रण करण्यास व्यावहारिक उपाय आमचे प्राचीन राज्यशास्त्रज्ञ सुचवूं शकले नाहींत व त्यामुळें निरंकुश राजतंत्राची प्राचीन भारतामध्यें मौर्योत्तर युगामध्यें अधिकाधिक चलती होऊं लागली.

# प्राचीन भारतीय शासनपद्धति : गुणदोषविवेचन

## लोकसभेचा लोप कां झाला?

लोकसभा ऊर्फ समिति हिचा उत्तर वैदिक कालामध्यें लोप होण्याचें कारण म्हणजे लोकतंत्राची भावनाच प्राचीन हिंदुस्थानांत नव्हती हें नव्हे, तर राज्यांचा वाढता विस्तार व प्रातिनिधिक तत्त्वाचा अभाव हें होतें. त्या वेळीं जगांत कोणत्याच देशामध्यें विशिष्ट जिल्हे अगर तालुके यांनीं निवडून दिलेल्या प्रतिनिधींनीं एकत्र जमून राज्यकारभार करण्याची पद्धति अस्तित्वांत नव्हती. व जरी ती अस्तित्वांत असती तरी अशोक, चंद्रगुप्त, हर्षवर्धन वगैरे राजांच्या विशाल साम्राज्यांतील दूरदूरच्या स्थानांतील लोकांना वारंवार एकत्र जमून राज्यकारभार चालविणें अशक्यप्राय झालें असतें. त्या वेळच्या दळणवळणांच्या साधनांचा विचार केला म्हणजे पुरुषपूर ऊर्फ पेशावर किंवा भृगुकच्छ किंवा भडोच येथील प्रतिनिधींना जर पाटलीपुत्रांत भरणाऱ्या सभेस जावयाचें असतें तर जाण्यास दीड महिना व परत येण्यास दीड महिना लागला असता. वर्षांतून जर लोकसभेचीं दोनच अधिवेशनें झालीं असतीं तरी सभासदांचे सहा महिने प्रवासांतच गेले असते! अशा परिस्थितींत लोकसभेचा लोप होणें अपरिहार्य होतें व तो झालाहि. प्रस्तुत काळीं परिस्थिति बदललेली आहे. दळणवळणाची कांहींच अडचण नाहीं, प्रातिनिधिक तत्त्व सर्वमान्य झालें आहे. तेव्हां प्रभावी लोकसभेच्या द्वारा राज्यकारभार करण्यांत कांहींच अडचण नाहीं.

## स्थानिक संस्थांचे विस्तृत अधिकार

लोकसभेचा जेव्हां हळूहळू लोप झाला व राजसत्ता अधिकाधिक अनियंत्रित होऊं लागली, तेव्हां लोकहित—संरक्षणाकरितां राजशासनपद्धतींत विकेन्द्रीकरणाचें तत्त्व अधिकाधिक अमलांत आणण्यांत येऊं लागलें. जिल्हे, नगरें व ग्रामें येथें पूर्वींपासूनच स्वयंशासित पंचायती होत्या; पण आतां त्यांचे अधिकार अधिकाधिक विस्तृत करण्यांत येऊं लागले. या पंचायतींमध्यें लोकप्रतिनिधींचेंच सत्ताधिक्य होतें; व जसजसे केन्द्रीय सरकारचे अधिकार कमी होऊन स्थानिक संस्थांचे हक्क वाढवण्यांत येऊं लागले, तसतशी लोकप्रतिनिधींच्या हातीं अधिकाधिक सत्ता येऊं लागली. गुप्त शासनपद्धतींत तर स्थानीय संस्थांचे अधिकार इतके विस्तृत होते कीं, सरकारी पडीक जमीन जर स्वतः सरकारला विकावयाची झाली तरी देखील स्थानिक संस्थांची परवानगी घ्यावी लागे. इसवी सनाच्या पहिल्या सहस्रकांत स्थानिक शासनसंस्थांचें जितकें विस्तीर्ण अधिकारक्षेत्र होतें, तितकें त्या वेळीं इतरत्र कोठेंच नव्हतें यांत शंका नाहीं. स्थानिक शासनसंस्था त्या वेळीं केन्द्रीय व प्रांतिक सरकारांचे कर वसूल करीत; त्यांपैकीं जर त्यांना कांहीं अयोग्य वाटले तर ते वसूल करण्याचेंच त्या साफ नाकारीत. गांवांतील तंटे मिटवण्याचें काम त्यांचेकडूनच होई; विहिरी, धर्मशाळा वगैरे त्याच बांधीत असत; शाळा, महाविद्यालयें, रुग्णालयें वगैरेंची व्यवस्था त्याच करीत. स्वतंत्र भारताचें नवविधान बनवितांना स्थानिक संस्थांचे अधिकार पूर्वपरंपरेप्रमाणें अधिक विस्तृत करण्याचा प्रयत्न करणें जरूर आहे. पण असें करण्यांत एकदम सफलता मिळणार नाहीं. कारण पूर्वकालची परिस्थिति आज विद्यमान नाहीं. सत्य व सच्चरित्र यांना पूर्वीं फार मान मिळत असे; ग्रामवृद्धांचा समाज आदर करी, व निवडणुकीची धामधूम न होतां, स्वाभाविक तऱ्हेनें व सर्वसंमतीनें, त्यांची ग्रामपंचायतीमध्यें निवड होत असे. आजकालची निवडणुकीची पद्धति व दलसंघटन त्या वेळीं अस्तित्वांत नव्हतीं व तीं खेडेगांवांमध्यें योग्य तऱ्हेनें रुळण्यास कांहीं काळ जावा लागेल. जेव्हां सार्वत्रिक शिक्षणप्रचार होईल व परमेश्वरावरील श्रद्धेचें व नरकाच्या भयाचें स्थान नागरिककर्तव्यपालनेच्या भावनेनें घेतलें जाईल, त्या वेळींच खेडेगांवामध्यें निवडणुकी यशस्वी तऱ्हेनें होऊं शकतील. तसें होण्यास कांहीं कालावधि लागेल यांत शंका नाहीं.

## पंचायतींमार्फत न्यायनिर्णय

प्राचीन भारतामध्यें घोर अपराधाव्यतिरिक्त सर्व कज्जे व गुन्हे यांचा निवाडा ग्रामपंचायतींमार्फतच होत असे. त्या वेळीं जीवनक्रम साधा होता व न्याया-करितां येणारे झगडे प्रायः स्थानिक स्वरूपाचेच असत व त्यांचा न्यायहि योग्य तऱ्हेनें पंचायतींमार्फत होऊं शके. कायदे थोडे व साधे असत व ते

सर्व लोकांना समजतहि असत. हल्लीं कायदेकानू अवघड व गहन झाले आहेत व त्यांचा अर्थ लावण्यास तज्ज्ञ वकिलांची जरूर पडत असते. कज्जांतील वादी-प्रतिवादी पुष्कळदां शेंकडों मैल दूर रहाणारे असतात. तेव्हां अशा परिस्थितींत पूर्वीइतके विस्तृत अधिकार हल्लींच्या ग्रामपंचायतींस देणें शक्य होणार नाहीं. तथापि पंचायतींना न्यायदानांत अधिकाधिक अधिकार हळूहळू देत जाणें आवश्यक आहे. जर गांवामध्यें दलबंदी होऊं दिली नाहीं व जर धर्मश्रद्धेचें स्थान नागरिकांच्या उत्तरदायित्वाच्या भावनेनें घेतलें तर त्यांचा सदुपयोगहि होऊं शकेल. गांवांत एकादी घटना घडली तर तिजबद्दल खरी माहिती बहुतेक सर्वांना असते. आपल्या शेजाऱ्यापाजाऱ्यांसमक्ष ग्रामपंचायतींमध्यें असल्या सर्वप्रसिद्ध घटनेबद्दल धादान्त खोटी साक्ष देणें ही गोष्ट दूरच्या कोर्टामध्यें कांहीं परक्या लोकांसमोर खोटें बोलण्याइतकी सोपी नसते. ग्रामपंचायती कज्जांचे निकालहि लवकर लावूं शकतील यांत शंका नाहीं.

प्राचीन भारतामध्यें भूमिकरापैकीं शेंकडा १५ ते ३० पर्यंत कर स्थानिक शासनसंस्थांना केंद्रीय सरकारकडून स्थानिक खर्च भागविण्याकरितां परत मिळत असे. तशाप्रकारची परिपाटी जर सुरू झाली तर आजकालच्या स्थानिक शासनसंस्थांपुढील आर्थिक अडचणी बऱ्याच कमी होतील यांत शंका नाहीं. या दृष्टीनें प्रयत्न करणें जरूर आहे असें आम्हांस वाटतें.

## राज्यक्षेत्र व व्यक्तिस्वातंत्र्य यांचा समन्वय

प्राचीन भारतांतील शासनसंस्था केवळ कर वसूल करूनच स्वस्थ बसत नसत तर लोकहिताचीं अनेक कामेंहि सुरू करून तडीस नेत. आजकालच्या सोशियालिस्ट स्टेटप्रमाणें शिक्षणप्रसार, दीनदुःखविमोचन इत्यादि कामें प्राचीन भारतांतील राज्यें करीत असत. फाजील किंमतवाढीपासून तीं ग्राहकांचें संरक्षण करीत, खाणी व इतर कांहीं उद्योगधंदे व कारखाने चालवून देशाच्या संपत्तींत भर टाकीत; अरण्यांची लागवड करून देश संपन्न करीत; वसाहती–स्थापनेस मदत करून लोकसंख्येच्या वाढीस आळा घालीत. पण वरील प्रकारचीं बहुतेक कामें सरकारच्या नोकरशाहीकडून होत नसत, तर निरनिराळ्या जातींच्या व धंद्यांच्या पंचायती–(श्रेणी)मार्फत तीं प्रायः करण्यांत येत. खाजगी तज्ज्ञांना आपली कर्तबगारी दाखवण्यास सरकारकडून पुरा वाव मिळे. उदाहरणार्थ, शिक्षणप्रसारार्थ सरकारकडून मुक्तहस्तानें मदत मिळे. पण शिक्षणसंस्थांनीं अमुकच प्रकारचें शिक्षण दिलें पाहिजे अशी सरकारकडून मुळींच सक्ती होत नसे. हिंदु गुप्त सम्राटांच्या मदतीनें चालत असलेल्या नालंदा विश्वविद्यालयामध्यें बौद्ध तत्त्वज्ञान व धर्म यांचें शिक्षण व प्रसार यावरच विशेष जोर देण्यांत येई. राज्याच्या कार्यक्षेत्राचें क्षेत्र जरी विस्तीर्ण झालें होतें तरी वरील परिस्थितीमुळें खाजगी प्रयत्नास बराच वाव मिळे व वैयक्तिक किंवा संस्थांच्या स्वातंत्र्यास त्यामुळें फारसा पायबंद बसत नसे. व्यक्ति व राज्य यांच्यामधील संघर्ष कमी करण्याचा हा मार्ग आधुनिक काळांतहि अनुकरण्यासारखा आहे.

## कायद्यांतील विषमतेचें कारण

प्राचीन भारतामध्यें राज्यापुढचे आदर्श फार उच्च होते; आध्यात्मिक, धार्मिक, सांस्कृतिक, भौतिक व औद्योगिक प्रगति घडवून आणणें हे राज्याचें कर्तव्य आहे असें सर्व शास्त्रज्ञांचें मत होतें. पण ही प्रगति कशी घडवून आणावयाची याबद्दलच्या कल्पना निरनिराळ्या युगांमध्यें निरनिराळ्या असतात हेंहि आपणांस विसरतां येणार नाहीं. धार्मिक किंवा सांस्कृतिक सुस्थिति व प्रगति यांकरितां प्राचीन हिंदुस्थानांत जें कांहीं करण्यांत येत असे त्या सर्वांचेंच समर्थन आज करतां येणार नाहीं हें उघड आहे. उदाहरणार्थ, वर्णाश्रम–व्यवस्थेचें संरक्षण करणें हें राज्याचें आद्य कर्तव्य मानलें जाई, व वर्णव्यवस्थेमध्यें शूद्र व अस्पृश्य यांवर अन्याय घडून येत होते, असें आजच्या पिढीचें निःसंशय मत होईल; पण जर आज तर्कदुष्ट वाटणाऱ्या वर्णव्यवस्थेचें प्राचीन हिंदुस्थानांत राज्याकडून समर्थन होत असेल तर त्यांस कारण म्हणजे त्या व्यवस्थेवर सर्व हिंदु समाजाचा सामान्यतः विश्वास होता हें होय. याचा दोष शासनपद्धतीपेक्षां समाजावरच अधिक येतो यांत शंका नाहीं. त्या वेळीं








लोकांचा कर्मफलविपाकाच्या सिद्धांतावर पूर्ण विश्वास होता; पूर्वजन्मांतील पातकांमुळेंच मनुष्यास शूद्र–चंडालादि जातींमध्यें जन्म मिळतो व त्यांचें क्षालन करण्यास त्यानें तज्जाति–निगडित दुःखही सहन केलेंच पाहिजे असें त्या वेळीं शेंकडा नव्याण्णव शूद्र-चंडालादिकांस सुद्धां वाटत असे हें आपणांस विसरून चालणार नाहीं. शूद्र–किंवा–चंडालादिकांवर असणारे निर्बंध काढून टाकण्याचें जर एकाद्या प्राचीन भारतीय राजानें ठरवलें असतें, तर लोक-क्षोभापुढें त्याचा नाशच झाला असता यांत संशय नाहीं; या कारणामुळेंच प्राचीन भारतामध्यें सर्व जातींना एक प्रकारचे व सारख्या स्वरूपाचे कायदे लागू केलेले नव्हते. दुःखाची गोष्ट आहे कीं, शूद्रांना ब्राह्मणांपेक्षां अधिक कठोर शिक्षा सांगितली होती. एकाद्या अपराधाबद्दल ब्राह्मणाचें पाप शूद्रापेक्षां अधिक असतें असें धर्मशास्त्रकारांनीं सांगितलें आहे; कारण ते अधिक सुसंस्कृत असत. पण पाप अधिक म्हणून ब्राह्मणांना जर शिक्षाहि अधिक कठोर सांगितली असती, तर निःसंशय आपणांस हल्लींच्या युगांत आपल्या संस्कृतीबद्दल अधिक अभिमान वाटला असता. पण येथें हेंहि विसरतां कामा नये कीं, प्राचीन संस्कृतीला आधुनिक मानदंडानें मापून तिला कमी पडल्याबद्दल दोष देणें हें न्याय्य होणार नाहीं. समतेचें तत्त्व प्राचीन काळीं कोणत्याच देशामध्यें—मग तो यूरोपांतील असो वा आशियांतील असो—रूढ होऊं शकलें नव्हतें. प्राचीन भारतांत ज्याप्रमाणें ब्राह्मण-हत्येबद्दल शूद्रहत्येपेक्षां अधिक दंड सांगितला आहे, त्याचप्रमाणें प्राचीन व मध्ययुगीन यूरोपांतहि एकाद्या सरदाराच्या हत्येबद्दल शेतकऱ्याच्या हत्येपेक्षां फार मोठा दंड दिला जात असे. फ्रेंच राज्यक्रांति होईपर्यंत यूरोपमध्यें सरदारलोक व पुरोहित हे सर्व जवळजवळ पूर्ण करमुक्त होते व सामान्य जनताच करभाराखालीं दडपून जात असे. जातिभेदामुळें हीन जातींच्या लोकांना श्रेष्ठपण प्राप्त करून घेणें शक्य नव्हतें. पण यूरोपमध्यें देखील विसाव्या शतकांतच चर्मकाराच्या मुलांना मुख्य प्रधान होण्याची संधि मिळूं लागली आहे. एका जातीनें दुसऱ्या जातीचें काम करूं नये, असा समाजाचाच दंडक होता व शासनयंत्रहि त्याचप्रमाणें वागत असे. हा नियम बदलणें त्याच्या शक्तीच्या बाहेर होतें. प्रस्तुत कालांत जातिजन्य विषमतेचें कोणीच समर्थन करीत नाहीं व ती निर्मूलहि होत चालली आहे.

### सामंतबहुल साम्राज्य

आसेतुहिमाचल एकछत्री साम्राज्य स्थापन करण्याचें ध्येय भारतामध्यें ब्राह्मणग्रंथकालापासून (सुमारें इ. स. पू. १०००) स्वीकृत झालें होतें. पण ऐतिहासिक युगामध्यें एवढें मोठें साम्राज्य दोन-तीनदांच होऊं शकलें. चक्रवर्ती राजाचें क्षेत्र सर्व भारतवर्ष होय असें जें राज्यशास्त्रकार प्रतिपादीत होते त्यास मुख्य कारण म्हणजे भारतवर्षांतील सांस्कृतिक एकता हें होतें. पण त्या ध्येयाचा असा अर्थ नव्हता कीं चक्रवर्ती राजानें निरनिराळीं छोटीं-मोठीं राज्यें खालसा करून, स्थानिक संस्था व रीतिरिवाज यांना भरडून काढून आपलें एकछत्री साम्राज्य स्थापन करावें. प्राचीन भारतीय राज्य-शास्त्रज्ञ उलट असें स्वच्छ व वारंवार प्रतिपादतात कीं, चक्रवर्ती राजानें प्रांतिक राज्यें मुळींच खालसा करूं नयेत; जर त्यांनीं सार्वभौमत्व इतर राजांनीं मान्य करून त्यास करभार अर्पण केला, तर त्यांना मांडलिक करून मग राज्य द्यावें. जर चक्रवर्ती राजाशीं लढाई करण्यामध्यें एकादा मांडलिक ठार झाला, तरीहि त्याचें राज्य खालसा करण्यास सम्राटास परवानगी नसे. मृत राजाच्या वारसास अगर इतर कोणा स्थानिक सरदारास आपलें सार्वभौमत्व मान्य करण्याच्या अटीवर मांडलिक म्हणून राज्य पुढें चालवण्यास चक्रवर्ती राजानें परवानगी दिलीच पाहिजे असा राज्यशास्त्रज्ञांचा कटाक्ष असे. स्थानिक कायदे व रीतिरिवाजहि त्यास बदलतां येत नसत.

### स्वायत्तप्रांताधिष्ठित साम्राज्याशीं साम्य

यावरून निष्कर्ष असा निघतो कीं, प्राचीन भारताचें ध्येय असें होतें कीं, भारतखंडभर एक बलशाली साम्राज्य असावें; त्यामध्यें प्रांताप्रांतांतील राज्यें एका सूत्रामध्यें ग्रथित असावीत व सर्वांच्या साहाय्यानें व सहकार्यानें बाह्य आक्रमणापासून देशाचें रक्षण व्हावें. पण मांडलिक किंवा प्रांतिक







राज्यांना पूर्ण अन्तर्गत स्वातंत्र्य असे, त्यांच्या स्थानिक कायद्यामध्यें व रीतिरिवाजांमध्यें साम्राज्य-सत्ता हस्तक्षेप करूं शकत नसे; फक्त अडचणीच्या व संकटाच्या वेळीं आपलें सैन्य पाठवून त्यांना साम्राज्यसत्तेस मदत करावी लागे व शांततेच्या वेळीं ठराविक करभार पाठवावा लागे. प्राचीन भारताचें हें ध्येय आधुनिक भारताच्या वैधानिक ध्येयाशीं बरेचसें जुळणारें आहे; आजहि आपण सर्वजण हिंदुस्थानांत एक मध्यवर्ती बलशाली केंद्रीय सरकार असावें, त्यानें प्रांतिक सरकारच्या मदतीनें व सहकार्यानें देशाचें परचक्रापासून रक्षण करावें, त्याच्या सर्वांगीण भौतिक व औद्योगिक उन्नतीसाठीं प्रयत्न करावा, प्रांतिक सरकारांना इतर सर्व बाबतींत पूर्ण स्वायत्तता असावी, व त्यांना आपली भाषा, वाङ्मय व स्थानिक संस्कृति यांचा विकास करण्यास संपूर्ण स्वातंत्र असावें असें प्रतिपादीत आहोंत. या ध्येयाचे गुणदोष काय आहेत याची चर्चा करणें या वेळीं फार महत्त्वाचें आहे. कारण आजचें ध्येय जवळजवळ तसेंच असल्यामुळें त्याचे दोष ज्या योगें नाहींसे होतील व गुण वृद्धिंगत होतील अशी तजवीज आज आपणांस करणें अत्यावश्यक आहे.

### प्राचीन प्रांतिक स्वायत्ततेचें गुणदोषविवेचन

पराजित राज्यें खालसा करूं नये, तीं मांडलिक म्हणून राहूं द्यावीं व त्यांच्या स्थानिक रीति-रिवाजांचा व संस्कृतीचा निर्बंध विकास होऊं द्यावा असा प्राचीन भारतीय शासनपद्धतीचा कटाक्ष असे. या तत्त्वामुळें प्रांताप्रांतांमध्यें व राज्याराज्यांमध्यें सर्व-संहारक युद्धें प्रायः होत नसत. युद्ध झालें तरी पराजित राजांस फक्त करभार द्यावा लागे व मांडलिकत्व स्वीकारणें भाग पडे; त्यांचें अंतर्गत स्वातंत्र्य व संस्कृति यांना भय नसे. यामुळें प्राचीन भारतामध्यें युध्देंहि धार्मिक नियमानेंच प्रायः चालवण्यांत येत व प्रांताप्रांतांमध्यें किंवा राज्याराज्यांमध्यें प्रायः पिढ्यान्‌पिढ्या टिकणारें हाडवैर उत्पन्न होत नसें. त्यामुळें भारतखंडांत सांस्कृतिक ऐक्य स्थापन होण्यास बरीच मदत झाली.

पण वरील ध्येयामध्यें कांहीं दोषहि आहेत; त्यामुळें आपल्या देशाचें बरेंच नुकसानहि झालें आहे. म्हणून तिकडेहि वाचकांचें लक्ष वेधणें आवश्यक आहे. पराजित प्रांतांना अगर राजांना मांडलिक म्हणून नांदूं देण्याच्या नीतीनें भारतखंडांत एकसूत्री केंद्रीय सरकार स्थापन होंऊं शकलें नाहीं. प्राचीन भारतामध्यें जीं तीन-चार मोठीं साम्राज्यें झालीं होतीं, तीं म्हणजे अनेक मांडलिक राजांचा एका सम्राटाच्या अधिपत्याखालीं असणारा एक ढिला संघ होता; जोंपर्यंत सम्राटाच्या कुलामध्यें कार्यक्षम राजे निपजत, तोंपर्यंत म्हणजे सामान्यतः तीन-चार पिढ्या हीं साम्राज्यें टिकत, व मग मांडलिकांनीं बंड केल्यामुळें तीं एकाएकीं मोडून जात. आमच्या प्राचीन राज्यशास्त्रज्ञांनीं हाहि सिद्धान्त स्वीकृत केला होता, कीं प्रत्येक मांडलिक राजास चक्रवर्तीपद प्राप्त करून घेण्याचा जन्मसिद्ध हक्क आहे. ज्या वेळीं त्यास आपली शक्ति वाढली आहे व सम्राटाची क्षीण झाली आहे असें वाटेल, त्या वेळीं त्यानें बेलाशक बंड करून साम्राज्यपद प्राप्त करून घ्यावें. या विचारसरणीमुळें सम्राट्पद प्राप्त करून घेण्या-करितां मांडलिकांमध्यें नेहमीं प्रच्छन्न किंवा उघड संघर्ष चालू असे व त्यामुळें साम्राज्यामध्यें स्थैर्य फार थोडा काळ टिकत असें. जर पराजित राज्यें खालसा करण्याचा अधिकार जेत्यांस देण्यांत आला असता, जर सम्राट्पद प्राप्त करून घेण्याची मांड-लिकाची महत्त्वाकांक्षा स्वाभाविक व उत्तेजनार्ह मानली गेली नसती, तर प्राचीन भारतखंडांत जवळ-जवळ अविरत तऱ्हेनें होणारीं छोटींमोठीं युद्धें बरींच कमी झालीं असतीं, साम्राज्यें अधिक स्थिर व शक्तिशाली झालीं असतीं व त्यांना देशाचें परचक्रापासून रक्षण करणें अधिक सोपें गेलें असतें.

वरील ध्येयामध्यें आपणांस आज जे दोष दिस-तात, ते आपल्या पूर्वजांस अनेक कारणांमुळें दिसूं शकले नाहींत. त्यांची अशी कल्पना असावी कीं, प्रत्येक प्रांतास अगर राज्यास, त्यानें आपली ताकद वाढवली तर, कधीं तरी साम्राज्यपद प्राप्त करून घेण्याची संधि मिळावी. आज बिहारचें साम्राज्य होऊन पाटलीपुत्र राजधानी बनलें, उद्यां संयुक्त प्रांताचें साम्राज्य होऊन कनोज राजधानी बनलें, किंवा उद्या पंजाबचें साम्राज्य होऊन पेशावर राजधानी बनलें तर इतर प्रांतांना त्यामुळें फारसें वैषम्य वाटत नसे. कारण त्यांची भाषा, धर्म, रीतिरिवाज किंवा संस्कृति








यांवर त्यामुळें फारसें संकट येत नसे. जेत्याला त्यांमध्यें हस्तक्षेप करण्यास अधिकार नसे.

### केन्द्रिय सरकारच्या कमजोरीमुळें स्वातंत्र्यनाश

पण वरील प्रकारच्या विचारसरणीमुळें व परिस्थितीमुळें स्थिर व शक्तिशाली केंद्रीय सरकारच्या आवश्यकतेची व उपयुक्ततेची जरूरी देशास फारशी वाटेनाशी झाली. इ. स. ४०० नंतर प्रांताप्रांतांतील राज्यें नृपतंत्रेंच होतीं. कारण त्या वेळीं प्रजातंत्रें नष्ट झालीं होतीं. त्यामुळें राज्याराज्यांतील स्पर्धा म्हणजे राजाराजांतलि स्पर्धा होऊन बसली व त्यांच्यामध्यें प्रामुख्यासाठीं किंवा साम्राज्यपदासाठीं चालणाऱ्या झगड्याच्या बाबतींत प्रजा उदासीन राहूं लागली. कारण कोणीहि विजयी झाला, तरी स्थानिक संस्कृति, रीतिरिवाज व कायदे यांमध्यें प्रायः ढवळाढवळ होत नसे. युद्धांत भाग घेणाऱ्या शिपायांच्या मनांमध्यें आपण आपल्या अन्नदात्या राजाकरितां लढत आहोंत ही भावना असे, जन्मदात्या देशाबद्दल लढत आहोंत ही उच्च भावना नसे. त्यामुळें स्वाभाविकच देशाभिमानाच्या भावनेचा परिपोष होऊं शकला नाहीं.

असो. ज्या ध्येयान्वयें प्रत्येक सामंतास म्हणजे मांडलिकास वाटेल त्या वेळीं साम्राज्यपदप्राप्तीकरितां लढण्याचा जन्मसिद्ध हक्क असे, पण सम्राटास पराजित सामंतांचीं राज्यें खालसा मात्र करतां येत नसत, अशा या सामंतप्रचुर संघात्मक साम्राज्याच्या ध्येयानें प्राचीन भारतामध्यें एकसारखी राजकीय अस्थिरता निर्माण झाली होती. वारंवार अनेक लढाया होत व त्यांमध्यें राष्ट्राची शक्ति क्षीण होई. पण त्याचें फलस्वरूप म्हणून एकादें स्थिर व शक्तिशाली असें साम्राज्य उत्पन्न झालें नाहीं व अखेर देशास मुसलमानी हल्ल्यापुढें हार खावी लागली.

### शक्तिसंपन्न केंद्रीय सरकारची आवश्यकता

प्राचीन इतिहासाचें व शासनपद्धतीचें जर अवलोकन केलें, तर आपणांस असें दिसून येतें कीं, मौर्य व गुप्त राजवटींच्या वेळीं जेव्हां शक्तिशाली साम्राज्य हिंदुस्थानांत स्थिर झालें होतें, तेव्हांच भारतवर्षाची सर्वांगीण प्रगति होऊं शकली. गेल्या शंभर वर्षांमध्येंहि हिंदुस्थानची जी कांहींशी प्रगति झालेली आहे, त्यास मुख्य कारण म्हणजे सुदृढ व कार्यक्षम केंद्रीय सरकारचें अस्तित्व व प्रांतीय फुटीरतेचा अभाव हेंच होय. भारतवर्षाचें नवविधान बनविण्याच्या वेळीं इतिहासाचा हा सिद्धान्त विसरतां कामा नये. आजकाल आपण ज्या प्रांतीय स्वायत्ततेबद्दल बोलत आहोंत, ती म्हणजे पराजित राज्यास खालसा न करण्याच्या प्राचीन तत्त्वाचेंच नवें स्वरूप होय. या तत्त्वामुळें हरएक प्रांतास, प्रदेशास व संस्थानास आपापल्या संस्कृतीचा, आपापल्या पूर्वपीठिकेप्रमाणें पूर्ण विकास करून घेण्यास पूर्ण वाव मिळूं शकतो. पण प्राचीन भारतामध्यें जशी प्रत्येक प्रांतास किंवा राज्यास वाटेल त्या वेळीं युद्ध पुकारून आपलें अधिराज्य स्थापन करण्याची मुभा असे, तशी आज आपणांस संघांतर्भूत प्रांतास अगर संस्थानास देतां येणार नाहीं. प्राचीन भारतीय राज्यशास्त्रज्ञांनीं असली परवानगी संभवतः या हेतूनें दिली असावी कीं, प्रत्येक प्रांतास इतिहासामध्यें कधीं तरी एकदां आपलें साम्राज्य स्थापन करण्याची संधि मिळावी. त्यांना असें वाटणें एका दृष्टीनें स्वाभाविकहि होतें. त्या वेळीं प्रातिनिधिक शासनपद्धति विकसित झालेली नव्हती; प्रत्येक प्रांतास अगर राज्यास केंद्रीय सरकारमध्यें आपले प्रतिनिधी पाठवितां येत नसत व त्यामुळें केंद्रीय किंवा साम्राज्य सरकार म्हणजे आपलेंहि सरकार आहे अशी भावना प्रांतांमध्यें किंवा मांडलिकांमध्यें उत्पन्न होणें शक्य नसे. पण आतां नवीन युगामध्यें हिंदुस्थानांत जें केंद्रीय सरकार स्थापन होणार आहे, तें प्रातिनिधिक होणार आहे. प्रत्येक प्रांताचे प्रतिनिधी त्यांत योग्य प्रमाणांत घेण्यांत येतील व लोकसभा—किंवा—पार्लमेंटमध्यें सर्व प्रांतांचे व संस्थानांचे लोकनिर्वाचित प्रतिनिधीहि असतील. नवीन युगामध्यें अशी परिस्थिति असल्यामुळें कोणत्याहि प्रांतास अगर संस्थानास आपलें सैन्य ठेवून अगर वाढवून सर्व भारतखंडावर सोयीच्या वेळीं आपलें आधिपत्य गाजवण्यास संधि देणें शक्य नाहीं. प्रत्येक प्रांतास किंवा राज्यास संपूर्ण स्वायत्तता राहील; आपली भाषा व आपली संस्कृति यांची पूर्वपीठिकेनुसार उन्नति करण्यास त्यांना पूर्ण अवसरहि राहील. पण प्रत्येक प्रांतास व राज्यास आपल्या फुटीर प्रवृत्तीस










दाबून ठेवावें लागेल, इतर प्रांतांवर किंवा केन्द्रीय सरकारवर कुरघोडी करतां येणार नाहीं किंवा त्याकरितां सैन्यहि ठेवण्यास परवानगी मिळणार नाहीं. केन्द्रीय सरकार सुदृढ करण्यास जर सर्व प्रांतांनीं व संस्थानांनीं मनापासून सहकार्य केलें, त्याकरितां आपले कांहीं अधिकार त्यास आनंदानें अर्पण केले, व आपापसांतील मतभेद संघन्यायालयामार्फतच निरसन करण्याचा पायंडा पाडला तरच हिंदुस्थानमध्यें पुन्हां शक्तिशाली राज्य स्थापन होईल व त्यापासून देशाचें व मानवजातीचें कल्याण होईल.

---

## कॉंग्रेसजनांची आजची वृत्ति

मला तर स्पष्ट दिसत आहे कीं, कॉंग्रेसजनांनीं पूर्वी जे त्याग करून पुण्याई कमविली ती ते सर्वच्या सर्व घडाक्यानें उधळून टाकीत आहेत. नवीन त्याग करून पुन्हां त्या पुण्याईंत भर घालायचें त्यांच्या मनांत येत नाहीं. भूतकालीन त्यागाच्या हुंड्या आज बाजारांत वटवून त्यांच्या रोखीवर चैन करायला आज ते उतावीळ झाले आहेत. भोगलालसा वाढत आहे. मत्सर, हेवादावा यांना अंत राहिलेला नाहीं. सत्याची कदर राहिलेली नाहीं. मी हें सर्व दोषैकदृष्टीनें म्हणत नाहीं. मीहि कॉंग्रेसचा एक नम्र सेवक म्हणून काम करीत आलों आहे. अधिकारापासून मी सदैव दूर राहिलों आहें. जेव्हां जेव्हां कॉंग्रेसला माझ्या सेवेचा उपयोग होईल असें वाटलें तेव्हां तेव्हां ती सेवा—त्या सेवेचें मूल्य कांहीं असो—ती मी मनःपूर्वक केली आहे. म्हणूनच वरील विधानें करीत असतांना माझें हृदय व्यथित होतें. कॉंग्रेसला आपली ही विचारसरणी पटवून द्यायचें धैर्य आपण दाखविलें पाहिजे. आपणाला सर्व देशांशीं एकजीव व्हायचें आहे. केवळ कॉंग्रेसमध्येंच नव्हे तर जेथें जेथें आपणांस जायला मिळेल तेथें तेथें लोकांपुढें आम्हीं आमचीं मतें व कार्यक्रम मांडूं. त्यांना उपयुक्त वाटलें तर तीं ते स्वीकारतील. नारदाच्या लीनतेनें आम्ही आपलें कार्य करीत राहूं. नारदाचा संचार त्रैलोक्यांत होता. देव, असुर, मानव या सर्वांकडे तो जात असे. आम्हीं देखील कोणत्याहि जमातींत कोणत्याही ठिकाणीं जसा आम्हांला प्रवेश मिळेल तसे जाऊं.

## राज्यसत्ता आणि स्वराज्य

कोणत्याहि संस्थेच्या कृपाछत्राखालीं आम्हांला मिंधें रहायची किंवा सरकारी अधिकाऱ्याचें आश्रित म्हणून नांदायची आमची इच्छा नाहीं. कोणत्याही क्रांतिकारक विचाराचा यशस्वी प्रसार सरकारी अधिकाराच्या जोरावर झालेला नाहीं. सरकारी अधिकाराच्या जोरावर फार तर थोडीशी शांतता आणि कांहीं सुखसोयी मिळून जीवन किंचित् सुखाचें होतें एवढेंच. परंतु सरकार यापेक्षां अधिक कांहीं करूं शकेल याची आपण अपेक्षा करूं नये. भगवान् बुद्धानें क्रांतिकारक तत्त्वें सांगितलीं; पण त्या तत्त्वांच्या प्रसाराकरितां त्यानें राज्यसत्ता वापरली नाहीं. उलट पक्षीं त्याला राज्यसत्तेला कोपरापासून नमस्कारच करावा लागला ! गांधीजींना देखील आपल्या ध्येयाच्या प्रसारार्थ राज्यसत्ता नको होती. त्यांना स्वराज्य, 'स्व–राज्य' पाहिजे होतें. राज्य आणि स्व–राज्य हीं एक नव्हत. स्वराज्य म्हणजे स्वतःचें राज्य. प्रत्येकावर प्रत्येकानें प्रत्येकासाठीं केलेलें राज्य. स्वराज्यांत एकाची दुसऱ्यावर सत्ता अशी नसते. राज्यसत्ता सर्वत्र पसरते, विलीन होते. ती वापरायला अवसरच नसतो. असें खरें स्वराज्य अवतीर्ण व्हावें म्हणून आपण प्रयत्न केला पाहिजे. तसा प्रयत्न करीत असतांना आमची वृत्ति सदैव त्यागमय, अनन्यपरायण आणि कार्यतत्पर राहो.

—**आचार्य विनोबा** (जयपूर येथें सर्वोदय–प्रदर्शनाच्या उद्‌घाटनप्रसंगीं केलेल्या भाषणांतून १४–१२–४८ )








श्री. श. वा. गानडे

# 'देवनागरी' ही बालबोध कशी होईल ?

मूळावेगळी सर्वथा । प्रसिद्ध नव्हेचि कदा कथा ।
आणि या ग्रंथाचा मी कर्ता । ऐसें म्हणतां दोष लागे ।।
—श्रीधर.

## पौराणिक कालांतील साहजिक अनास्था

मराठी लिपि सुधारण्याचा प्रश्न फारां दिवसांपासून लोकांपुढें आहे. देवनागरी वर्णव्यवस्था अगदीं नमुनेदार असली, तरी 'लिपि' नमुनेदार म्हणून प्रख्यात नाहीं. केवळ ताम्रपट किंवा शिलालेख लिहिण्याच्या काळांत पूर्वलिपींचा आकार बदलत बदलत झाला तसा झाला. 'क, च, ट, त, प' हे पांच वर्ग व प्रत्येक वर्गांत दोन कठोर व तीन मृदु व्यंजनें आणि त्यांतील अन्त्य अनुनासिक अशी कोरींव, कांतींव व आंखींव मांडणी ज्या वर्णव्यवस्थेची झालेली दिसते, तिची लिपि मात्र झाली तशी झाली, अशी वाऱ्यावर सोडल्यासारखी दिसते. आमच्या वैयाकरण ऋषींचा काल हा लेखनकाल नसावा. पाठिकतेच्या त्या काळांत लेखनदोषांची किंवा अडचणींची कल्पना साहजिकच त्या ऋषींना न आल्यानें आणि पुढेंहि लेखन हें सार्वत्रिक नसल्यामुळें लिपि सुद्धां केवळ तांबट आणि पाथरवट यांच्याच हातीं राहिली असावी. नाहीं तर ज्या शास्त्रशुद्ध पद्धतीनें पांच वर्ग निर्माण करून त्यांत विशिष्ट अक्षरें विभागण्यांत आलीं, त्याच पद्धतीनें पांच अक्षरें आणि त्यांच्या पांच विकारांपैकीं प्रत्येकासाठीं एकेक संस्कार अशा प्रकारें निदान पंचवीस वर्णांची तरी व्यवस्था लावण्यांत आली असती. उदाहरणार्थ, ओठ हलवितांक्षणीं बाहेर पडणारा वर्ण म्हणजे "प" हा आपण घेऊं. आपल्या वैयाकरणांनीं त्याला ओष्ठ्यवर्गाचें मूळ अक्षर संबोधिलें हें साहाजिक आहे. लिपींत त्यासाठीं 'प' हें अक्षर कसेंहि आलें असो; पण तें मान्य झालें. नंतर त्याचाच महाप्राण वर्ण दर्शविण्यासाठीं त्याला एक (झूल किंवा) पंख देण्यांत आलेला दिसतो; तेव्हां "फ" झाला. अशीच झूल 'ट' ला दिली व त्याचा "ठ" झालेला दिसतो. पण बाकीच्या तीन वर्गांत हाच संस्कार अवलंबिला गेला नाहीं. तसेंच "प"चा मृदु उच्चार व्यक्त करण्यासाठीं "ब" हें अक्षर आहे. खरें पाहिलें तर यांतील पोट फोडण्याचा संस्कार कायम ठेवून 'प' चा "प़" असा आकार 'ब'साठीं यावयास पाहिजे होता; आणि याचाच पुनः महाप्राण वर्ण झूल घालून "(१) *" हा सध्यांच्या 'भ'साठीं यावयास पाहिजे होता. अनुनासिकासाठीं मूळ अक्षरांत पूर्वभागांत गांठ देणें हा एक संस्कार बरा दिसतो, पण तोहि सर्व वर्गांत अवलंबिलेला नाहीं. फक्त 'प'चा 'म' आणि 'त'चा 'न' या दोनच वर्गांत तो अवलंबिण्यांत आला. याप्रमाणेंच एकच संस्कार सारख्या उच्चारभेदासाठीं पांची वर्गांत अवलंबण्यांत आला नाहीं. व एकाच मूळ अक्षरावर संस्कार करण्याचेंहि नियमन लिपींत घालण्यांत आलें नाहीं. नाहीं तर सध्यांहि थोडा नमुनेदार असलेल्या "प" वर्गासाठीं "प, फ, प़, (१)*, म" अशी निर्दोष वर्णमाला, महाप्राणासाठीं पंख किंवा झूल, मृदु उच्चारासाठीं अंतश्छेद व अनुनासिकासाठीं गांठ हा नियम सुसंगतपणें पाळून, ऋषींनीं आपणांस दिली असती. परंतु ऋषिकालीं लेखन हा विचाराचा विषय नव्हता हेंच खरें.

## पहिला लिपिसुधारक हेमाद्रि

ऐतिहासिक काळांत कागदपत्र लिहितांना या

* लेखाच्या शेवटीं या आंकड्यांचीं अक्षरें पाहावींत. —का. सं.










लिपीचा बोजडपणा हेमाद्रि या बुद्धिमान् पुरुषाच्या लक्षांत आलेला व म्हणून लेखनाची सुलभता व शीघ्रता वाढविण्याचा प्रयत्न त्यानें मनःपूर्वक आणि योजनापूर्वक केलेला दिसतो. राज्याचा मुख्य प्रधान या नात्यानें असलेल्या अधिकारामुळें इष्ट वाटलेल्या सुधारणा रूढ करवून घेणेंहि त्याला सुलभ झालें असावें. नाहीं तर इकार-उकारांतील ऱ्हस्व-दीर्घ भेद नष्ट करण्यास पंडित लेखक तयार होते ना. आणि त्यांच्या समित्यांतून एकमतानें ठराव करून घेणें अशक्यच झालें असतें. ऱ्हस्व इकार व्यंजनानंतर उच्चारला जावयाचा पण लिपींत त्याचा परिवार अगोदर ध्यावयाचा हा बोजडपणा हल्लीं नागरी टंक-लेखकास जितका त्रासदायक भासत असेल, तितक्याच तीव्रपणें त्या बुद्धिमान् पुरुषासहि प्रतीत झाला असावा आणि त्यानें तो अजिबात रद्द करण्याचा हुकूम तावडतोब आपल्या 'सेक्रेटरी-अट'मध्यें दिला असावा! त्यानें उकार मात्र दीर्घ काढून टाकले. लांबलचक उकार काढून नंतर तो हात-मोडीपद्धतीनें लिहिण्यासाठीं रेघेकडे घेणें यांतील गैरसोय लक्षांत घेऊन हेमाडपंतांनीं ऱ्हस्व उकारच फक्त कायम ठेविले. प्रत्येक वर्णाअखेर हात शक्य तों वरील रेघेकडे नेणें ही एक लेखन-शीघ्रतेच्या दृष्टीनें त्यानें केलेली सुधारणा होती. रेघेकडून एक मात्रा तशीच हात न सोडतां वर घेणें किंवा दोन मात्रा जोडून लिहिणें या योजना तर आजहि फारच कौतुकास्पद वाटण्यासारख्या आहेत. किरकोळ वर्णभेद दाखविण्यासाठीं एक 'नुक्ता' किंवा टिंब 'ट' चा 'उ' करितांना उपयोगिलेलें आहे. 'आ' वर एक व दोन मात्रा देऊन 'ओ' 'औ' देवनागरींत होतच होते, त्याचप्रमाणें 'अ' वर मात्रा देऊन 'ए ऐ' करण्याची योजना त्यानें केली. ज्याकरितां ऱ्हस्व इकार त्याज्य, त्याच कारणासाठीं 'ए, ऐ'मधील पृष्ठमात्रा त्याला त्याज्य वाटली असावी. शिवाय या दोन किरकोळ स्वरूपाच्या अक्षरांत मध्येंच हात सोडावा किंवा उचलावा लागणें टाळावें हाहि हेतु असेल. ही गैरसोय न वाटल्यामुळें 'ई' व 'उ' त्यानें वेगळे राहूं दिलेच. त्याला 'अ'च्या बाराखडीची नवी सुधारणा म्हणून शिकवावयाची नव्हती; लेखनसुलभ अक्षर हें त्याचें ध्येय होतें.

### आद्यवर्ण 'अ' चें स्वरूप

त्याची अत्यंत मोठी सुधारणा म्हणजे 'अ' या अक्षराची. 'अ' हा वर्णांतील आद्यवर्ण, आणि त्यास आमच्या लिखाणांत आज रूढ असलेलें अक्षर किती बोजड! हिंदी (देवनागरी) लिपींतील या अक्षराचें स्वरूप तर भयानकच वाटतें! कै. वैद्यबंधूंनीं या अक्षराचें रूप केवळ एक उभी रेघ काढिलें तेंच खरें पाहूं जातां बरोबर असावें. 'उ' व 'ए' हीं अक्षरें हेंच दर्शवितात. केवळ एक रेघ व उकार चिन्ह व रेघ आणि पृष्ठमात्रा या त्यांच्या रूपांत 'अ' हें अक्षर (किंवा हे वेगळे स्वर मानावयाचे तर त्यांस आपण अक्षराभास म्हणूं) केवळ रेघरूपानें आहे हें स्पष्टच दिसतें.

अगदीं प्राथमिक काळांत 'अ' हा केवळ एक रेघच असेल व त्यांत वर्णप्राण दिसण्यासाठीं एक डोकें असेल. म्हणजे मूळचा एक आंकडा व प्राथमिक वर्ण 'अ' एकरूपच असावेत. फक्त वर्णास वरती रेघ असावी. पुढें कोणी तरी आद्यवर्ण म्हणून त्या 'अ'ला सध्यांचें भरदार रूप दिलें असावें. पण त्यामुळें लेखनांत येणारा बोजडपणा हेमाद्रींना सहन होणें शक्यच नव्हतें; आणि म्हणून त्यांनीं तावडतोब त्यास मूळ रूपांत म्हणजे रेघेवर काढलेल्या(२)* या स्वरूपांत घेतलें व लिहिण्याचा हात पुनः वर रेघेकडे नेण्याच्या पद्धतीनें(३)* असें वळण त्यांस आलें. त्याला मात्रा द्यावयाची म्हणून 'आ'साठीं एक गांठ येऊन तें अक्षर(४)* असें झालें. रेघेला थोडा बांक देऊन हात वर नेऊन वेलांटी दिल्यानें मोडी ई झाली. नुसतें उकाराचें चिन्ह हा 'उ' वर्ण झाला पुढील स्वरमालेचा विचार वर झालाच आहे. याप्रमाणें हेमाद्रीनें देव--नागरीस भू--नागरी केलें व खरोखरीच नागरी व्यवहार सुलभ केला. त्याच्या नांवावरून या सुधारलेल्या लिपीस हेमाद्रि-लिपि किंवा हेमाडी लिपि किंवा मोडी लिपी हें नांव प्रच-

* लेखाच्या शेवटीं दिलेलीं या आकड्यांचीं अक्षरें पहावींत. —का. सं.








## ' देवनागरी ' ही बालबोध कशी होईल ?

लित झालें व कचेरींत इंग्रजीचें प्रस्थ वाढेपर्यंत याच लिपीचा उपयोग अगदीं अलीकडेपर्यंत होत होता.

### मुद्रणासाठीं लिपिसुधारणा

पूर्वसूरींच्या वर्णव्यवस्थेंत दृष्टोत्पत्तीस येणाऱ्या योजना व कल्पना हल्लींच्या सुधारलेल्या काळांत विचारपूर्वक लावून सुबोध वर्णमाला तयार करणें अवघड नाहीं. परंतु लेखनासाठीं वर्णमालेंत सुधारणा करण्याचा विचार हेमाडपंतानंतर कोणींच केलेला दिसत नाहीं. गेल्या पन्नास-साठ वर्षांत वेळोवेळीं हा प्रश्न उपस्थित केला गेला तो मुद्रणसुलभतेच्या दृष्टीनें किंवा टंकलेखकांत बसविण्याच्या बुद्धीनें; छापखान्यांतील खिळ्यांची अगडबंब केस कमी करावी किंवा टंकलेखकावरील ओळी कमी व्हाव्या म्हणून. इंग्रजीच्या सुटसुटीत २८ अक्षरांच्या वर्णमालेंत जगाचा व्यवहार चालू असतां, आमच्या वर्णमालेचा गौरव व तिची महती कोणी कितीहि गावो, त्यासाठीं येवढा व्याप वाढावा हें पाहून छापखानेवाले किंवा टंक-लेखनवाले या धंदेवाइकांना माथेशूळ उत्पन्न झाला, आणि केवळ अनुकरण-प्रियतेनें टाइपाची छोटीशी ' केस ' कशी होऊं शकेल व खिळ्यांपुढें खिळे कसे ठेवितां येतील असला विचार सुरू झाला. अच्या बाराखडीनें भक्कम काटछाट होईल कोणास वाटलें, तर लेखनाच्या सोयीसाठीं खालीं-वरतीं असणारी स्वरचिन्हें ओढून एका ओळींतच घ्यावीं अशीहि कल्पना निघाली. आमच्या लिपीच्या तिमजली इमारतीवर हल्ले झाले. परंतु यांत्रिक सोयीसाठीं लिपीची इमारत ढांसळविण्यापेक्षां या लिपीजोगी इष्ट यांत्रिक सुधारणाच करण्याची कल्पनाहि एकदोघांच्या मनांत आली; आणि श्री. शंकरराव दाते व श्री. बि. म. अत्रे यांनीं मुद्रण व टंकलेखन या दोन्ही बाबतींत आमच्या तिमजली लिपीचें ऐश्वर्य तसेंच सौंदर्य कायम ठेवून ती सुघड केली याबद्दल ते अभिनंदनास पात्र आहेत.

### " अ " लेखनसुलभ करा

स्वरमालेसाठीं हेमाडपंतांच्या पद्धतीनें ' अ 'चा उपयोग करण्यास कोणाचा विरोध होण्याचें कारण नव्हतेंच; तेव्हां कांहीं छापखानेवाल्यांनीं लिपिसुधारणेचा आपला हिरीरीचा पुरस्कार म्हणून जवळ तयार असलेल्या 'अ'चा उपयोग करण्यास सुरुवात केली. पण हेमाडपंताप्रमाणें लेखनसौकर्याच्या दृष्टीनें त्याकडे कोणीहि न पाहिल्यामुळें त्याला थोडें सुलभ रूप देण्याची सुधारणा कोणालाच स्फुरली नाहीं. मुद्रकांच्या धंदेवाईक पेशांत त्यांना इकडे लक्ष देण्याची जरूरी साहजिकच नव्हती; पण महाराष्ट्र-साहित्य-परिषदेनें 'अ'च्या बाराखडीस मान्यता देतांना तिकडे लक्ष द्यावयास पाहिजे होतें. बहुधा त्या समितींत लेखकांचा प्रतिनिधि नसावा. असो. अजूनहि वेळ गेली नाहीं. आतां स्वराज्याच्या सुरुवातीनंतर शिक्षणप्रसार वाढविण्याचे प्रयत्न चालू असतां 'अ'ची बाराखडी ही फारच उपयुक्त सुधारणा आहे. एकदम जुन्या पद्धतींतील सहा वर्ण शिकण्याचें वांचतें. मात्र एकाद्या हेमाद्रीनें हा ' अ ' थोडा लेखनसुलभ करून द्यावा.

### अल्पप्राण अक्षरांपासून महाप्राण अक्षरें करणें

आणि याच दृष्टीनें वर्णमालेंतील आणखीहि कांहीं अक्षरें सामान्य वाचकाचा मुळींच घोटाळा न करतां कमी होण्यासारखीं आहेत. वर निर्देशिलेल्या सुधारणांपैकीं अल्पप्राण वर्णास केवळ एक पंख जोडून किंवा श्री. काकासाहेब कालेलकर यांच्या शब्दांत एक 'कुलंगें शेपूट ' लावून महाप्राण वर्ण तयार करणें हा नियम नवीन लिपि शिकणारांस फारच सोयीचा होणार आहे, आणि मुद्रकांस तर दहा खिळे एकदम कमी होण्यामुळें महोत्सवच वाटेल. रेषेला जोडलेला इंग्रजी लहान ' एच् ' (५*) हें अक्षर "ह" म्हणून मानण्याचें ठरल्यास या महाप्राणाची वर्णलिपींतहि सुसंगति दाखविणें सर्वांसच सोपें जाईल.

पंचवर्गीय सर्व महाप्राण वर्ण असें कुलंगें शेंपूट लावून या पद्धतीनें करावयाचें. परंतु हा नियम सर्व अल्पप्राण वर्णांस पंख लावतांना सोयीचा वाटणार नाहीं याची कल्पना प्रस्तुत लेखकास आहे. 'ट, ड, द' हीं तीन अक्षरें आणि आधींच पंख फुटलेला 'क' यांना पंख लावणें जरा अडचणीचें आहे; पण ही अडचण

---

* लेखाच्या शेवटीं या आंकड्याचें अक्षर पहावें— का. सं.



अनुक्रमणिका






दुर्लंघ्य नाहीं. उपायच सुचवावयाचे म्हटल्यास सपंख 'क' ला 'ख' समजणें, पंखविरहित 'व'ला 'क' समजणें, हा पर्याय वाईट नाहीं. नव्या नियमामुळें मोकळा उरलेला 'घ' हा 'व'साठीं घेण्यास हरकत नाहीं. त्याचें रूप केवळ शेंडी फुटलेल्या 'व'चेंच आहे. इतकीं दोन अक्षरें बदलावयाचीं नसतील तर 'घ' लाच सरळ 'क' म्हणावें व त्याचप्रमाणें 'ध' ला 'द' म्हणावें, 'ट' ला मोडी रूप देतां येईल व असेंच थोडें डोकें खाजवून 'ड'चा 'ढ' करणेंहि जमेल.

परंतु असे तीनचार वर्णांत वेगवेगळे फरक करण्यानें अनेकांच्या डोक्यांत शूळ उठण्याचा संभव असल्यानें तूर्त तातडतोब अवलंबिण्याचा नियम म्हणजे– आहेत याच रूपांतील अल्पप्राण वर्णांस पंख लावून महाप्राण वर्ण करणें हा होय. नवीन शिकणारांस तर यानें लेखन–वाचन सुलभ होईलच; कारण उच्चारसाम्यामुळें त्याचें स्वरूपसाम्य त्यांच्या सहज लक्षांत राहील आणि अक्षरांचें स्वरूप अनोळखी नसल्यानें जुन्या लिपिज्ञांचाहि फारसा घोटाळा होणार नाहीं. पंख जोडलेला स्पष्ट दिसण्यासाठीं 'क' 'ट', 'ड', 'द', या चार अक्षरांचे टाइप मुद्रकांस कदाचित् योग्य वळणाचे व जरा स्पष्ट करून घ्यावे लागतील. पण तेवढें ते साहजिकच आनंदानें करतील. लेखनांत महाप्राण वर्ण शेंकडा फार फार तर तीन-चार येतात. तेवढ्यांत वाचकांची गैरसोय फारशी होत नाहीं. पण लेखक-मुद्रकांची सोय मात्र मोठीच होणार. अशी ही सुधारणा जितकी लवकर अवलंबिली जाईल तेवढी बरी. 'क' चें रूप कटीवर दोन्ही हात ठेवल्यासारखें 'क' केल्यास त्याला नवा पंख जोडून 'ख' करणें सोईचें होईल.

## गाळण्याजोगीं आठ अक्षरें

प्राथमिक शिक्षणाच्या सुलभतेसाठीं सध्यांच्या वर्णमालेंतील आणखीहि अनेक वर्ण गाळण्याजोगे आहेत. ते म्हणजे ॠ, ङ, ञ, ष, क्ष, ज्ञ, ॐ आणि श्री. इतकीं अक्षरें नवीन शिकणारास तरी लिहावयास शिकविण्याचें कारण नाहीं. पूर्वी लिहिलें गेलेलें लिखाण वाचतां वाचतां त्यांना हे वर्ण कामापुरते माहीत होतील तेव्हां होतील. वरीलपैकीं शेवटलीं चार अक्षरें, तर केवळ लेखकांच्या हौशीनेंच रूढ झालेलीं दिसतात. नव्या लेखकांनीं हीं अक्षरें आपणांस ज्ञात असलेल्या वर्णांत लिहिण्यास मुळींच हरकत नाहीं. लिपि ही उच्चारानुसारच लिहावयाची हा मुख्य नियम. म्हणूनच वैयाकरणाच्या मतें "ज्ञ" मधले वर्ण कोणतेहि असोत, उच्चारानुसार तें अक्षर "द्न्य" असें लिहिणें बरोबर मानलें पाहिजे. 'ॠ' या कपिला षष्ठीला येणाऱ्या अक्षरासाठीं वेगळा वर्ण नको. जरूर तेव्हां 'अ' ला ॠकार जोडतां येईल. 'ङ' आणि 'ञ' तर सरळ सरळ गाळण्यांस हरकतच नाहीं. 'वाङ्मय' वांग्याच्या चालीवर जाण्याची एकुलती एक भीति सोडली, तर मराठींत या वर्णयुग्माची कांहींच जरूरी नाहीं. 'वाङ्मय' आणि "वांग्मय" हे दोन शब्द वाचतांना उच्चारांत होणारा सूक्ष्म फरक लक्षांत घेण्यासारखा नाहीं. आणि अशाच सूक्ष्म फरकासाठीं शेंडीफोड्या व पोटफोड्या असे दोन 'श' **बालबोध** लिपींत ठेवण्याची आवश्यकता दिसत नाहीं. कोणता तरी एक वर्ण ठेवावा. येथें पोटफोड्या गाळावा म्हटलें तें केवळ अशोकवनिकान्यायानें. गाळावयाचाच तर 'प'शीं साम्य असलेला वर्ण गाळावा इतकेंच.

## सूक्ष्म उच्चारभेद बालबोधीसाठीं नकोत

सूक्ष्म उच्चारभेदासाठीं आणखी नवे वर्ण किंवा संस्कार उत्पन्न करावे अशा सूचना व असे प्रयत्न कांहीं लिपिसुधारकांकडून होत आहेत. हें गैर नसलें तरी ही सुधारणा व्यवहारास आज आवश्यक आहे असें मात्र नाहीं. इंग्रजी कोशांतून एका स्वराचे अनेक उच्चार स्पष्ट करण्यासाठीं खालींवरतीं टिंबें–रेघा वगैरे देण्याचा प्रघात आहे. त्या पद्धतीनें कानडीसारखे ऱ्हस्व-दीर्घ "ए, ऐ," दंत्यतालव्य-उच्चारी "च" वर्ग, अरेबिक "क, ख" किंवा इंग्रजी "एफ्" या अक्षरांचे उच्चार समजण्यासाठीं पंडितांनीं संकेत ठरवून घ्यावे व ते कोशांतून वगैरे वापरावे. सामान्य लिखाणांत त्यांबद्दल नव्यानें आग्रह उत्पन्न करूं नये. 'काफर" शब्द जेथें जेथें येईल तेथें तेथें त्याचा पठाणी उच्चार वर्णरूपांत व्यक्त झालाच पाहिजे असें नाहीं. अवश्यच असेल तेथें विशिष्ट खुणांचा उपयोग करावा. वर्णांचे विशिष्ट उच्चार समाजभेदानें व आनुवंशिक संस्कारानें येतात. लिहिणारानें





अनुक्रमणिका

# 'देवनागरी' ही बालबोध कशी होईल ?

वर्ण कसेहि लिहिले तरी वाचणाराच्या संवयीप्रमाणेंच त्यांचा उच्चार होणार. इंग्रजी साहेब "मथुरा" शब्द "मुट्रा" च वाचणार, आणि महाराष्ट्रीयेतर खुणांकडे फारसें लक्ष न देतां एकदम 'च्यांगली' म्हणूनच वाचणार. नाटकांत वगैरे विशिष्ट उच्चार दर्शविण्यासाठीं अशा लिपिसंकेतांचा उपयोग करतां येईल. इतर लिखाणांत अशा अडगळीची जरूरी नाहीं व वर्णमाला तर वाढविण्याची आवश्यकता नाहींच नाहीं. उलट वर दर्शविल्याप्रमाणें सध्यां असलेले कांहीं वर्ण गाळणेंच इष्ट होईल. त्यामुळें सूक्ष्म उच्चारभेद नष्ट होण्याची भीति कोणाला वाटत असली तरीहि शेंकडा ९९ लोकांच्या लक्षांत जो भेद येत नाहीं, तो दर्शविण्यासाठीं वेगवेगळे वर्ण नकोत. 'गवत' शब्दांतील तीन 'अ'-कार वेगवेगळ्या उच्चारांचे आहेत. शेवटला 'त' चा उच्चार तोटका, तर 'व'चा उच्चार दीर्घ व 'ग' चा सामान्य. पंडितांखेरीज ही छाननी कोणी केली आहे ? सामान्य मनुष्य आपल्या उच्चारपद्धतीप्रमाणें ते वाचतो. "नाहीं मी बोलत आतां" यांतील 'आतां' हा शब्द बालगंधर्व म्हणतात तितक्या कमी जास्त लांबीचा आणि ठसक्याचा दर्शविण्यासाठीं लिपिसुधारकांनीं कंबर कसण्याचें कारण नाहीं. संगीतस्वरमालिकाहि हें काम पूर्णत्वानें करतीलच असें नाहीं. ध्वनिमुद्रिकालेखन वाचण्याची कला किंवा तें वाचण्याचें शास्त्र अस्तित्वांत येईल तेव्हांच हें वाचन, झाल्यास, निर्दोष होऊं शकेल. सध्यां आमची लिपि वर्णांतील स्थूल भेद दर्शविणारी आहे तितकी पुरे. बालबोध लिपि फक्त बावीस मातृकांची करावी. आणि ती लिपि खरी "बाल-बोध" करण्यासाठीं वर सुचविल्याप्रमाणें पंख लावून महाप्राणवाचक वर्ण करावयाचे आणि अनावश्यक वर्ण वर्ज्य करावयाचे असें ठरविल्यास बालांस किंवा प्रौढांस फक्त बावीस वर्ण शिकावे लागतील:—

| | |
|---|---|
| क च ट त प | (पंचवर्गीय आद्यवर्ण) |
| ग ज ड द ब | (घोषवर्ण) |
| य र ल ळ व | (अर्धस्वर) |
| श स ह | (महाप्राण) |
| ण न म | (अनुनासिकें) |
| अ | (आद्यस्वर) |

येवढ्या वर्णलिपींत सर्व मराठीहिंदी लिखाण—चालू उच्चाराचें—समाविष्ट होऊं शकेल. संस्कृतसाठीं आणखी चार वर्ण घालावे लागतील. पण सामान्य व्यवहार बावीसच अक्षरें शिकल्यानें भागेल. मुद्रणास इतकींच अक्षरें पुरतील. टंकलेखन आटोपसर होईल व शिक्षणप्रसार मुलांत व प्रौढांत तितकाच सुकर होईल.

## शुद्धाशुद्ध लेखनाचा प्रश्न येथें नको

लिपिसुधारणेचा विचार करतांना, जोडाक्षरांचे आघात, अनाघात त्याचप्रमाणें शुद्धाशुद्धलेखन यांसंबंधीं अनेक प्रश्न कित्येकजण उपस्थित करतात. पण त्यांचा विचार करण्याचें हें स्थळ नव्हे. 'उच्चार तसें लेखन' येवढा नियम लिपीच्या दृष्टीनें पुरे; व असे सर्व उच्चार केवळ वरील बावीस मातृकांत व्यक्त होतात हें मान्य झाल्यास, आपली देवनागरी लिपि तितकी सुटसुटीत करणें हेंच सार्वत्रिक शिक्षणाबाबत अगत्य बाळगणाऱ्या व्यक्तींचें व राष्ट्रधुरीणांचें कर्तव्य ठरेल. त्यांचें इकडे लवकर लक्ष जावो, येवढेंच इच्छितों.

१ २ 3 ४ ५

त्या त्या आंकड्याखालील अक्षर लेखांत दिलेल्या त्या त्या आंकड्याऐवजीं वाचावें.

---








सेनापति पां. म. बापट

# धर्माचें हृदय

'धर्म ही अफूची गोळी आहे,' हें 'कवित्व' पुष्कळां-च्या कानावर आलें असेल. नुकतेंच 'सकाळ' पत्रांत रशियाचें सरकार धर्मविरोधी प्रचार पूर्वी-प्रमाणें पुनश्च करूं लागलें आहे, इत्यादि वृत्त देतांना वरील वाक्य धर्मविरोधकांचें घोषवाक्य म्हणून 'सकाळ' कारांनीं दिलें आहे.

धर्म ही अफूची गोळी आहे असें मानणारे व म्हणणारे भारतांतहि आहेत. नव-भारत जे आम्ही निर्माण करणार, त्या आम्हांमधील धर्म = अफूची गोळी या मताची मंडळी सहजच धर्मविरोधी प्रचार करणार. तें त्यांचें कर्तव्यच आहे.

## जुन्या धर्मांतील अफूच्या गोळ्या

धर्म ही काय वस्तु आहे? आमच्या परंपरेंत चार व्याख्या सर्वविश्रुत आहेत.

प्रभवार्थाय भूतानां धर्मप्रवचनं कृतम्
यः स्यात् प्रभवसंयुक्तः स धर्म इति निश्चयः १
धारणात् धर्म इत्याहुः धर्मेण विधृताः प्रजाः
यः स्यात् धारणसंयुक्तः स धर्म इति निश्चयः २
अहिंसार्थाय भूतानां धर्मप्रवचनं कृतम्
यः स्यादहिंसासंयुक्तः स धर्म इति निश्चयः ३
आरंभो न्याययुक्तो यः स धर्म इति निश्चयः ४

धर्म ही सामाजिक विचारसरणि आणि आचार-सरणी आहे, त्याचप्रमाणें वैयक्तिक आचारविचार-सरणी आहे.

वैयक्तिक वा सामाजिक वैभव, संरक्षण, पीडा-निवारण, न्याय या गोष्टी सर्वानुमतें इष्ट असल्यानें या गोष्टी मिळवून देणाऱ्या आचारविचारांना "अफूच्या गोळ्या" म्हणून कोणी विचारवंत संबोधील काय? नाहीं.

साम्यवाद, समाजसत्तावाद, राष्ट्रवाद—वगैरे सर्व विशिष्ट समाजव्यवस्था उत्तम असें प्रतिपादन करणारे वाद वरील व्याख्याचतुष्टयानुसार धर्म आहेत आणि या वादांना कोणी अफूच्या गोळ्या मानीत नाहीं.

हिंदु धर्म, ख्रिस्ती धर्म, मुसलमानी धर्म या व दुसऱ्या जुन्या धर्मांत वर सांगितलेल्या वैभवादि गोष्टी मिळवून देण्यास आजहि समर्थ असणाऱ्या आचारविचारांना कोणी अफूच्या गोळ्या म्हणणार नाहीं.

मग अफूच्या गोळ्या जुन्या धर्मांत कोठें आहेत? "धर्म=अफूची गोळी" या मताच्या माणसांना जुन्या धर्मांतला देवविषयक विचार-आचार अफूच्या गोळीसारखा वाटतो. आणि हा विचार-आचार त्या धर्मांचा अविभाज्य विभाग म्हणून समजला जात असल्यानें ते धर्म सर्व अफूमय म्हणून त्याज्य असें हे अफूघोष करणारे नास्तिक आणि संशयात्मे म्हणतात.

देव नाहीं, आणि देव असेल—नसेल या दोन मतांच्या माणसांना देव आहे या श्रद्धेचे किंवा अनुभूतीचे लोक अफूचा कैफ करणारे वाटतात. आणि या लोकांचा अफूमय 'धर्म' जगांतून नाहींसा व्हावा यासाठीं खटपट करणें हें ते नास्तिक आणि संशयात्मे आपलें कर्तव्य समजतात.

जुन्या धर्मांत एक बुद्ध-धर्म असा आहे कीं ज्यांत देव-विषयक विचार-आचार नाहींत. बुद्ध म्हणे कीं "देव आहे कीं नाहीं हें मला माहीत नाहीं. मला माहीत आहे तें हें कीं विश्वांत दुःख भरलेलें आहे व हें दुःख दूर कसें होईल याची तळमळ लोकांना आहे. ज्यांना तळमळ असेल त्यांना माझा दुःखनिर्मूलनाचा मार्ग मी सांगतो वगैरे "



अनुक्रमणिका








बुद्धाचा अ-ज्ञान-वाद हा नास्तिवाद आणि संशय-वाद यांहून भिन्न आहे. अ-ज्ञान-वाद हा मूळ वाद. 'मला माहीत नाहीं' ही मनाची मूळ बैठक. अंतर्बाह्य विश्वाचा विचार केल्याअगोदरची ही बैठक. येथून विचाराला सुरुवात. विचार करून कोणी विश्वाच्या मूळाचा विचार करणें सोडून देऊन त्या मुळासंबंधानें 'मला माहीत नाहीं' ही आपली बैठक कायम करून टाकतो. कोणी असेल–नसेल अशा देव-विषयक संशयवादापर्यंत येऊन ही आपली संशयवादी बैठक कांहीं कारणांसाठीं गुप्त ठेवून 'मला माहीत नाहीं' असेंच लोकांना उत्तर देतो. कोणी आपली संशयवादी बैठक आपल्या कारणांसह लोकांपुढें मांडतो. कोणी विचारक 'देव नाहीं' या निश्चयाला येतो व तसें सांगतो. विचार करून कोणी अस्तिवादी अथवा आस्तिक होतो आणि या आस्तिकांतून कोणी विचारवंत "आस्मिक" "आस्मिवादी" किंवा 'ब्रह्माऽस्मिवादी' होतो.— 'अस्तीति ब्रुवतोऽन्यत्र कथं तदुपलभ्यते' असें कठोपनिषदांत म्हटलें आहे. 'विश्वाचें मूळ, मध्य, अंत जें ब्रह्म तेंच माझें अन्नमयादि कोशांच्या आंतील खरें शाश्वत रूप' हें ज्ञान व्हावयाच्या आधीं विश्वाचें मूळ एकच एक चैतन्य आहे असा अस्तिवाद मनांत पक्का व्हावा लागतो.

'मला माहीत नाहीं' हा बुद्धाचा देव-विषयक पृच्छा करणारांना दिलेला जबाब यथार्थ असेल किंवा आपला संशयवाद गुप्त ठेवण्यासाठींहि बुद्धानें तसें उत्तर दिलें असेल. तें कसेंहि असो. बुद्धानें देव-विषयक विचार–आचार लोकांना उपदेशिले नाहींत– अथवा अफू–घोषकांच्या शब्दांत त्यानें लोकांना अफूची गोळी दिली नाहीं! पण हें माझें विधान अगदीं बिनचूक नाहीं. बुद्ध पुनर्जन्म मानीत होता, कर्मविपाक मानीत होता आणि ही मान्यता अस्सल अफू–घोषकांना अफूबाजीचाच परिणाम म्हणून प्रतीत होणार हें निश्चित. तेव्हां बुद्ध–धर्म हाहि आजच्या धर्मविरोधकांच्या धर्मनिर्मूलक प्रहारांचा विषय होणार.

थोडक्यांत धर्मविरोधकांचें म्हणणें असें कीं, देहा-व्यतिरिक्त आत्मा म्हणून कांहीं मरणानंतर टिकणारी चैतन्य वस्तु आहे, तसेंच परमात्मा किंवा सृष्टि-देहाव्यतिरिक्त सृष्टिमूल कांहीं सर्वगामी चैतन्य आहे...इत्यादि विचार अफीमबाजाच्या निशेंतील कल्पनांप्रमाणें बिनबुडाच्या कल्पना आहेत; व या कल्पना माणसांना महत्त्वाच्या ऐहिक व्यवहारांबाबत पराङ्मुख, उदासीन किंवा निरुत्साही बनवितात आणि त्यामुळें मानवसमाजाचें नुकसान होतें; अतएव आत्म्याच्या, परमात्म्याच्या गोष्टी बोलणारे धर्म नाहींसे केले पाहिजेत.

## अतिशयोक्तीचा भाग

मानवसमाजाचें नुकसान न व्हावें ही धर्मविरो-धकांची बैठक अभिनंदनीय आहे. एकाहि व्यक्तीचें नुकसान होऊं नये, समाजाचें नुकसान होऊं नये, सर्वांना, व्यक्तींना व समाजांना सुखलाभ व्हावा, अधिकांत अधिक, श्रेष्ठांत श्रेष्ठ सुखाचा लाभ व्हावा, या हेतूनें विचारवंत सर्व कालीं सर्व स्थलीं विचार करीत असतात. व या विचारांतूनच पूर्वकालीं भिन्न स्थलीं भिन्न धर्मांची शिकवणूक जन्मास आली. हिंदुधर्म, मुसलमानी धर्म, ख्रिस्ती धर्म, पार्शी धर्म इत्यादि सर्व धर्म विचारवंतांनीं व्यष्टिहिताच्या व समष्टिहिताच्या दृष्टीनें त्या त्या कालीं व देशीं परिस्थितीचा विचार करून उपदेशिलेले आहेत. त्या त्या विचारवंतांना जेवढें भौतिक ज्ञान होतें व जेवढें आध्यात्मिक ज्ञान होतें तेवढ्याचा उपयोग त्यांनीं धर्मोपदेश करतांना केला. ज्ञान हें वाढतें आहे. आजच्या ज्ञानानुरूप आज व्यष्टिहिताचा व समष्टिहिताचा विचार करून आजचे विचारवंत साम्यवाद, समाजवाद, राष्ट्रवाद इत्यादि वाद लोकांपुढें ठेवीत आहेत. हें सर्व ठीक आहे. परंतु जुन्या धर्मां-तील देव-विषयक व आत्म-विषयक सर्व कल्पना बिनबुडाच्या आहेत व व्यक्तीचें व समाजाचें नुकसान करणाऱ्या आहेत हें म्हणणें अतिशयोक्तीचें आहे.

कांहीं श्रेष्ठ आधुनिक वैज्ञानिक आत्मवादी व देववादी आहेत. कांहीं जडवादी आहेत. तेव्हां आत्मवाद व देववाद हा अफूच्या गोळीचा प्रभाव आहे असेंच कांहीं नाहीं हें स्पष्ट आहे.

मानवी बुद्धि बाह्य सृष्टीचें व अंतःसृष्टीचें संशो-धन अगदीं आरंभापासून सारखें करीत आली आहे. आज संशोधन चालूं आहे व संशोधन सतत चालूं राहील. नव्या संशोधनानें जुन्या संशोधनाच्या कांहीं

निर्णयांना बळकटी येते, कांहीं निर्णय निराधार होतात. त्यांत पुन्हां वैयक्तिक बुद्धीचा प्रश्न असतो. कांहींजणांना निराधार झाल्यासारखे वाटणारे जुने निर्णय दुसऱ्या कांहींजणांना तसे वाटत नाहींत.

बुद्धीच्या अनेक परी आहेत. अनेक पायऱ्या आहेत. आजहि, मानवी बुद्धीचा सामान्यतः बराच विकास झाल्यानंतरहि, तिच्या बहुतेक सर्व परी व सर्व पायऱ्या आजहि मानवसमाजांत कोठें कांहीं, कोठें कांहीं आढळतात. म्हणून जुने धर्म आजहि सर्वांशानें निरुपयोगी झालेले नाहींत. ज्यांना ते उपयोगाचे राहिलेले नाहींत त्यांनीं ते सर्वांनाच निरुपयोगी अशी कल्पना करून त्यांचा निकाल लावण्यासाठीं झटावें हें स्वाभाविक आहे. म्हणून धर्मविरोधकांना दोष लावणें नको.

तथापि, धर्मविरोधक सर्वच उच्च पायरीवर आहेत असें मानण्याचें कारण नाहीं. कांहीं चार्वाकासारखे अगदीं निकृष्ट पायरीवर असतील. कांहीं बुद्धाप्रमाणें संशयवादी परंतु आग्रही संशयवादी असतील. कांहीं अर्धवटपणानें नास्तिक झालेले असतील. कांहीं वैज्ञानिक दृष्टीनें विचार करून कांहीं वैज्ञानिकाप्रमाणें नास्तिक झालेले असतील. खऱ्या वैज्ञानिकाची पायरी उच्च मानणें योग्य आहे.

## वैज्ञानिकांचे भिन्न विचार

पण बाह्य सृष्टीचा शोध करणारा वैज्ञानिक व अंतःसृष्टीचा शोध करणारा वैज्ञानिक यांत अंतर आहे. स्थूल इंद्रियें आणि त्यांना मदत करणारीं यंत्रें वापरून बाह्य सृष्टींत संशोधन करतात. अंतःसृष्टीच्या संशोधनांत स्थूल इंद्रियांचा प्रत्यक्ष उपयोग कांहींच नसतो. सूक्ष्म इंद्रियें स्वप्नांत काम करतात. स्थूल इंद्रियें सूक्ष्म इंद्रियांच्या साहाय्यानेंच बाह्य सृष्टीचा अनुभव घेऊं शकतात. स्वतंत्रपणें त्यांचा कांहींच उपयोग नसतो, ही गोष्ट जाग्रति संपली म्हणजे आपल्या नजरेस येते. तेव्हां स्थूल इंद्रियसमूह जो देह त्यापासून कांहीं काळ अलग राहूं शकतो असा कोणी तरी देही आहे असें अनुमान अंतःसृष्टिसंशोधक काढतो. स्वप्नस्थिति संपते तेव्हां सूक्ष्म इंद्रियें जीं मन, व बुद्धि यांपासूनहि कांहीं काळ अलग राहूं शकणारा असें देहीचें स्वरूप दिसतें. गाढ निद्रेच्या अवस्थेंत स्थूल देह, इंद्रियें, मन, बुद्धि कोणीच काम करीत नाहीं. गाढ निद्रा संपल्यावर त्यांचें काम पुन्हां चालूं होतें. तेव्हां त्यांना कामाला लावणारा व विसांवा देणारा आणि पुन्हां कामाला लावणारा सर्वदा जागरूक, तिन्हीं अवस्थांतील भोक्ता आणि जाग्रतींतील कर्ता भोक्ता, स्वप्नांतील आभासिक कर्ता भोक्ता कोण ? शिवाय, सुषुप्ति-गाढ निद्रा असतांना फक्त सुखाचाच भोग घेणारा, कामनाशून्य असणारा असा हा स्थूल सूक्ष्मदेहधारी कोण ? ( सूक्ष्म इंद्रियें, मन, बुद्धि यांना सूक्ष्म देह अशी संज्ञा आहे ). या प्रश्नाचें उत्तर जुन्या अंतःसृष्टिसंशोधकांनीं ' आत्मा ' असें दिलें. आत्मा म्हणजे व्यापक, तिन्हीं अवस्थांना व्यापून राहणारी चैतन्यवस्तु, स्थूल सूक्ष्म देह काम करीत नसतांना त्यांना पूर्ण जाणिवेनें रुधिराभिसरणादि क्रियांच्या द्वारा कार्यक्षम ठेवणारी आणि त्यांना जाणीव देऊन त्यांजकडून जाग्रतींत व स्वप्नांत काम करून घेणारी चैतन्यवस्तु. अंतःसृष्टिसंशोधकाचा हा आत्मनिश्चय, ही आत्मविषयक 'कल्पना' मला बिनबुडाची वाटत नाहीं. याप्रमाणेंच परमात्मविषयक निश्चयाची किंवा 'कल्पनेची' गोष्ट आहे. बाह्यविषयक विज्ञानाच्या उच्च पायरीवर असणारे थोर वैज्ञानिक कांहीं आत्मा, परमात्मा मानणारे आहेत, तर कांहीं नास्तिक आहेत. याचें कारण विचारपद्धतीची भिन्नता. असो.

## ज्ञानाचा दुरुपयोगहि होऊं शकतो

धर्मविरोधकांचा धर्मांना जो विरोध आहे त्याचें एक कारण आत्म-परमात्माविषयक कल्पना बिनबुडाच्या आहेत अशी त्यांची एक कल्पना आहे. त्याचप्रमाणें त्यांची दुसरी कल्पना अशी आहे कीं, या आत्म-परमात्मविषयक कल्पना माणसांना ऐहिक व्यवहारांबाबत पराङ्मुख, उदासीन, निरुत्साही बनवितात आणि त्यामुळें त्या त्या व्यक्तींचें व एकंदर मानवी समाजाचें नुकसान होतें. ही दुसरी कल्पना बरोबर, सर्वथा बरोबर नाहीं असें संसाराचें सूक्ष्म निरीक्षण करणाराला दिसून येईल. ॲटम् बॉंब ज्यांनीं संशोधनानें आणि संयोजनानें प्राप्त करून घेतला, त्यांनीं त्याचा उपयोग बरा किंवा वाईट करणें हें जसें शक्य आहे, त्याचप्रमाणें आत्मा हा ज्यांनीं संशोधनानें आणि योगरूपी संयोजनानें प्राप्त करून घेतला त्यांनींहि त्याचा उपयोग बरा किंवा वाईट










करणें शक्य आहे. आत्मविषयक 'कल्पना' कांहीं लोकांना ऐहिकपराङ्मुख करते. पण दुसऱ्या अनेकांना 'जोरदार' ऐहिकवादी बनविते हें कोणास माहीत नाहीं ? अफूची गोळी ही उपमा धर्माला देणारे, धर्माचा दारूच्या बाटलीसारखाहि उपयोग केला जातो, हें विसरतात. जगांतले अत्यंत भयंकर अत्याचार धर्माच्या नांवानें ऐतिहासिक कालांत अनेकदा झाले आहेत व आजहि होत आहेत, हें काय कोणास ठाऊक नाहीं ? इत्यर्थ असा कीं, सत्याचा दुरुपयोग हा सत्याची सत्यता कमी करूं शकत नाहीं, किंवा त्याचा सदुपयोग त्याची सत्यता वाढवूं शकत नाहीं.

तथापि, धर्मवाद्यांनीं धर्मविरोधी प्रचाराला यशस्वी विरोध करावयाचा तर आपापल्या धर्मांतील आजच्या काळाच्या दृष्टीनें निरुपयोगी झालेला किंवा व्यक्तिहिताला आणि समाजहिताला प्रतिकूल झालेला भाग काढून टाकण्याची खटपट केली पाहिजे. तसेंच आत्मा आणि परमात्मा याच्या ज्ञानाचा दुरुपयोग न होईल अशी स्वतःची वागणूक ठेवली पाहिजे. आत्मज्ञान मुरलें नाहीं तोंवर मनुष्य त्याचा गैरउपयोग करूं शकतो. कारण इंद्रियें आणि मन यांजला अनेक बऱ्यावाईट गोष्टींचा ओढा असतो व हा ओढा मनुष्याला तो स्थितप्रज्ञ झाला नाहीं तोंवर भलत्या मार्गांत ओढून नेऊं शकतो.

जाग्रति, स्वप्न, सुषुप्ति या तीन अवस्थांचा विचार करतां जो आत्मा यांचा संबंध धरणारा आणि सोडणारा म्हणून सांपडला त्याविषयीं अधिक विचार करून जुन्या विचारवंतांनीं ठरविलें कीं, ज्या अर्थीं हा आत्मा सुषुप्तींत कामनाशून्य केवल सुखरूप राहूं शकतो त्या अर्थीं जाग्रतींत त्याला तसें राहण्याची शक्यता आहे खास. ही शक्यता लक्षांत आल्यावर इंद्रियसंयम, मनःसंयम यांच्या आधारानें निष्कामता, निरहंकारता, निर्भयता अभ्यासण्याचा उपक्रम सुरू झाला आणि आणि या अभ्यासानें थोर त्यागी समाजसेवक निर्माण केले. स्वतःचें वैभव, स्वतःचें संरक्षण, स्वतः-पुरतें पीडानिवारण, स्वतःपुरता न्याय—या गोष्टी आत्मज्ञानी संयमी माणसाला सामाजिक वैभवादि गोष्टींच्या तुलनेनें कःपदार्थ वाटतात आणि म्हणून तो स्वतःच्या वैभवावर पाणी सोडून, स्वतःच अन्याय सोसून समाजाच्या वैभवासाठीं, समाजांत न्याय असावा यासाठीं, समाजावर आलेल्या संकटाच्या निवारणासाठीं आपले प्राणहि आनंदानें अर्पण करतो.

## नियमाच्या मार्गें नियंता

बाह्यसृष्टिविज्ञान आजला या सृष्टीच्या घटकांचें पूर्वीपेक्षां पुष्कळच तपशीलवार ज्ञान देतें; परंतु सृष्टीचें मूलद्रव्य विद्युच्चुंबकीय लहरींचें क्षेत्र असलेलें एकच एक अखंड आकाशतत्त्व आहे असें सांगतें. पूर्वी बाह्य विज्ञान तुटपुंजें असतांना एकच एक अखंड आकाश,आकाश, वायु, तेज, आप, पृथिवी या क्रमानें वनस्पतिसृष्टीच्या मुळाशीं होतें व वनस्पतिसृष्टीच्या आधारानें जीवसृष्टि व शेवटीं मनुष्यसृष्टि झाली असें मानलें जात असे. पण हें सृष्टिमूल अखंड अनंत आकाश जड आकाश, चिदाकाशापासून अनंत अखंड आत्मरूप चिदाकाशापासून झालें, असा निष्कर्ष पूर्वीच्या विचारवंतांनीं काढला होता. माझा आत्मा आणि प्रत्येक व्यक्तीचा आत्मा हा या अखंड अनंत चित्सागरांतला एक बिंदु आणि म्हणून प्रत्येक व्यक्ति चित्सागराच्या द्वारा इतर सर्व व्यक्तींशीं जोडलेली आहे. सागर हेंच बिंदूंचें जीवन, त्याप्रमाणें चित्सागर हेंच प्रत्येक व्यक्तिगत चिदंश-रूप जीवात्म्याचें जीवन हें लक्षांत आल्यावर अहं ब्रह्म, तत्त्वमसि, अयमात्मा ब्रह्म, सर्वं खलु इदं ब्रह्म-हीं महावाक्यें पूर्वकालीन विचारवन्तांनीं जीवाच्या उद्धारासाठीं, जीवांना परमश्रेष्ठ आध्यात्मिक वैभव प्राप्त होण्यासाठीं उपदेशिलीं. आजचे वैज्ञानिक जे अनात्मवादी आहेत ते हें विसरतात कीं, विद्युच्चुं-बकशक्तिमय जाणीवशून्य आकाश सर्व सृष्टीचें मूळ आहे असें म्हणतांना सृष्टीच्या घडामोडी जाणिवे-शिवाय नियमबद्ध अशा चालल्या आहेत असा अपसिद्धान्त ते मांडतात. नियम जाणीवयुक्त नियन्त्याशिवाय संभवतो कसा ? माझ्यासारख्याच्या बुद्धीला हें पटत नाहीं. जाग्रतींत कमी-अधिक निष्काम जीवनाची शक्यता ज्याप्रमाणें अवस्था-त्रयातीत "असंगो हि अयं पुरुषः" या ज्ञानानें, या वस्तुस्थितीनें सिद्ध होतें, त्याप्रमाणें जाग्रतींत कमी-








अधिक व्यापक जीवनाची, लहानमोठ्या सामाजिक जीवनाची शक्यता आम्ही सर्व जीव अखंड ब्रह्मद्वारा एकमेकांशीं जोडलेले आहों, या ज्ञानानें, या वस्तुस्थितीनें सिद्ध होतें.

इंद्रियांचा इंद्रियविषयांकडे ओढा असल्यानें व आत्म्याचा आत्म्याकडे ओढा असल्यानें अनेक गुंतागुंती मानवी जीवनांत उत्पन्न होतात. या गुंतागुंतीच्या जीवनांत यशस्वी रीतीनें मार्गक्रमण करून परमव्यापक परमशांतीचें जीवन जगावयाचें असेल तर

आत्मानं रथिनं विद्धि शरीरं रथमेव तु
बुद्धिं तु सारथिं विद्धि मनः प्रग्रहमेव च
इंद्रियाणि हयानाहुः विषयांस्तेषु गोचरान् ॥

हें ध्यानांत वागवून आम्ही सावधानतेनें इंद्रियांना मनाचा लगाम व लगाम बुद्धीच्या हातांत अशी व्यवस्था ठेवून, हा शरीर-रथ विषयक्षेत्रांत 'तद्विष्णोः परमं पदम्'–विश्वव्यापक ममत्वाचें प्रेममय जीवन हें जें विष्णूचें परमधाम, त्याच्या रोखानें बुद्धीकडून चालविला पाहिजे, असा धर्माचा आदेश आहे. हा आदेश अफूची गोळी खास नाहीं, दारूची बाटलीहि नाहीं.

नियमबद्ध निसर्गघटना जाणीवयुक्त निर्माता–नियन्ता असल्याशिवाय संभवत नाहींत असा मी माझ्या बुद्धीचा निर्णय वर दिलेला आहे. यासंबंधांत माझ्या स्नेह्याशीं बोलतांना एक गोष्ट मी अनेकदा सांगितलेली आहे. ती ही: आमच्या शाळेंत रसायनशास्त्राचे आमचे शिक्षक हैड्रोजन आणि ऑक्सिजन २:१ या प्रमाणांत एका नळींत दोन्ही तोंडांनीं बंद अशा कांचेच्या नळींत घातलेले आम्हांला दाखवीत व नंतर त्या नळींत विजेची ठिणगी पाडण्याची योजना असे. त्या योजनेनुसार ठिणगी पाडीत. त्यायोगें बराच मोठा आवाज होऊन नळीच्या आंतील वायु नाहींसे होत व त्यांचे जागीं पाण्याचा ओलावा नळींत दिसूं लागे. 'पहा $H_2O$ = पाणी, हें आतां नीट ध्यानांत ठेवा' असें नंतर आमचे गुरुजी आम्हांला सांगत. तेव्हां आम्हीं तें सूत्र पाठ केलें. परंतु या सूत्रांत एक उणीव मला अलीकडे दिसूं लागली आहे. आम्हीं खरोखरी काय पाहिलें त्याचें $H_2O$= पाणी, हें सूत्र यथार्थ वर्णन करीत नाहीं. आम्ही असें पाहिलें, कीं गुरुजींनीं H आणि O एका विशिष्ट प्रमाणांत एकत्र आणले, नंतर विजेची ठिणगी पाडली व त्यायोगें $H_2O$ = पाणी झालें. म्हणजे खरें सूत्र $H_2O$ = पाणी हें नसून $MH_2O$= पाणी हें आहे (M = Mind = गुरुजींची बुद्धि). ज्याप्रमाणें प्रयोगशाळेंत बुद्धीच्या जोरावरच सर्व प्रयोग केले जाऊन अनेक वस्तू निर्माण केल्या जातात त्याचप्रमाणें सृष्टि, सर्व सृष्टवस्तू सृष्टिप्रयोगशाळेंत स्रष्ट्यानें आपल्या बुद्धीच्या पराक्रमानें निर्माण केल्या आहेत, म्हणजे चैतन्य हें सृष्टीच्या मुळाशीं व सृष्टिनियमांच्या मुळाशीं आहे, हें म्हणणें प्रयोगशाळेंतील घटनेवरून मला सुसंगत वाटतें. जड सृष्टवस्तूंच्या यदृच्छाघटित विकासक्रमांत एका पायरीवर बुद्धि निर्माण झाली हें म्हणणें निर्बुद्ध वाटतें.

## बुद्धाचें निर्वाण आणि ब्रह्मनिर्वाण

बुद्धानें देवाविषयीं 'मला माहिती नाहीं' असें सांगून पृच्छकाला दुःखनिर्मूलनमार्गाचा उपदेश केला.

सद्धर्म सांगे मग बुद्ध देव
... ... ...
शांती दया प्रेम मनीं धरोनी
जा वेंच आयुष्य परोपकारें

असा आपल्या 'नवभारता'च्या सेप्टेंबर १९४८ च्या अंकांत श्री. परब यांच्या "सद्धर्म कोणता?" या कवितेचा शेवट आहे. या कवितेंत प्रथम वेदान्त, नंतर चार्वाकसिद्धान्त आणि शेवटीं बुद्धबोध, दिलेला आहे. वेदान्तांत बुद्धाच्या शिकवणीचा अंतर्भाव होतो हें कवितेवरून वाचकांच्या लक्षांत येऊं शकत नाहीं. असाहि कवितेंतून ध्वनि निघतो कीं, सद्धर्माला–दुःखनिर्मूलनमार्गाला–ईश्वराचें, ईश्वरभजनाचें वावडें आहे. खरी गोष्ट अशी दिसते कीं, बुद्धानें वेदान्ताचा कांहीं भाग दुःखनिर्मूलनमार्ग म्हणून लोकांपुढें ठेवला, कांहीं बाजूला ठेवला. जो भाग बुद्धानें बाजूला ठेवला तो आत्मविषयक, परमात्मविषयक भाग सद्धर्माचें अंग असून त्यानें अगणित लोकांचें दुःखनिर्मूलन केलें आहे व आज तो तें करीत आहे, आणि भविष्यकाळींहि अगणित लोकांचें दुःखनिर्मूलन तो करील.








## धर्माचें हृदय

चार्वाकानें यज्ञांतील हिंसेचा निषेध केला, पितरांना पिंडांनीं तृप्ति होते या कल्पनेचा फोलपणा दाखविला; तेव्हां त्यानें कांहीं तत्कालीन धर्मांतील दोष दाखविले हें उघड आहे. पण त्याबरोबर तो शुद्ध देहवादी व व देहसुखवादी झाला हा त्याच्यांतील दोष होय. बुद्धानें सांगितला तो सद्धर्मच सांगितला. पण त्याची निर्वाणाची कल्पना संसारी माणसाच्या नित्यनिद्रेच्या कल्पनेप्रमाणें दिसते. वेदान्ताची ब्रह्म-निर्वाणाची कल्पना निराळी आहे व ती माझ्या बुद्धीला खरी वाटते. अहंचें निर्वाण—शून्य—होणें, हें बुद्धांचें आणि वेदान्ताचें समान साध्य. परंतु अहंचें शून्य होणें ही संसारी अस्तित्वाची इतिश्री आणि म्हणून दुःखांची इतिश्री अशी बुद्धाची कल्पना दिसते. वेदान्ताच्या दृष्टीनें अहंचें शून्य होणें म्हणजे आत्म्यानें आपलें अहमूच्या उपाधीमुळें कमी-अधिक दृष्टीआड झालेलें पूर्णत्व ओळखणें, ब्रह्मत्व ओळखणें, यांत दुःखाची इतिश्री तर होतेच पण अनन्त सुखाची कमाई पण होते.

एका वेळे केलें रितें कलेवर
आंत दिली थार पांडुरंगा ।
आपुलिया हातें केली वाताहात
लागली ते ज्योत अविनाश ॥

* * *

आनंदाचे डोहीं आनंदतरंग
आनंदाचि अंग आनंदाचें ॥

* * *

अवघाचि संसार सुखाचा करीन
आनंदे भरीन तिन्ही लोक ॥

हीं श्रीतुकोबांचीं वचनें ब्रह्मनिर्वाणाची साक्ष देतात 'सत्यं ज्ञानमनंतं ब्रह्म यो वेद निहितं गुहायां परमे व्योमन् सोऽश्नुते सर्वान् कामान् सह ब्रह्मणा विपश्चिता ॥' (तैत्तिरीय उपनिषद्) हा उपनिषदांतील अनुभवात्मक सिद्धान्तच श्रीतुकोबांच्या अनुभूतींत आपणांस दिसतो. संकुचित अहं हा शून्य करून हृदयगुहेंत सर्वांत खोल, सर्वांच्या पलीकडे सर्वाधार असलेल्या अनंत चैतन्याची गांठ घेतली, कीं सर्व इच्छा त्याच्या समागमें तृप्त होऊन आनंदी—आनंद होतो हें उपनिषत्कारांनीं ब्रह्मनिर्वाणाचें लक्षण सांगितलें व श्रीतुकोबांनीं भक्तीच्या परिभाषेंत तीच गोष्ट आपल्या अनुभवाची म्हणून सांगितली.

### धर्माचें हृदय

प्रिय वाचक ! तुम्हीं नास्तिक असा, संशयवादी असा, कोणी असा; धर्म ही अफूची गोळी आहे म्हणा, दारूची बाटली आहे म्हणा, कांहीं म्हणा. माझ्या बुद्धीचा निश्चय व आत्म्याची अनुभूति उपनिषत्कारांप्रमाणें व श्रीतुकोबांप्रमाणें आहे. धर्माचें हृदय आत्म्याचें आणि परमात्म्यांचें परम सख्य हें आहे. परम सख्याचा आणि त्याच्या पोटीं होणाऱ्या 'आत्मनिवेदनाचा'—आत्मार्पणाचा—आनंद हा सर्वश्रेष्ठ "धर्मानंद" आहे. हा आनंद माणसाला जनसेवापराङ्मुख करीत नाहीं, तर जनसेवेचें वेड लावतो. या आनंदाच्या साधनेंत जनसेवेचा अंतर्भाव होतो व या आनंदाच्या सिद्धीनें जनसेवेची गोडी वाढते, असा माझा अनुभव आहे.

अद्वेष्टा सर्वभूतांना मैत्रः करुण एव च ।
निर्ममो निरहंकारः समदुःखसुखः क्षमी ॥
संतुष्टः सततम् योगी यतात्मा दृढनिश्चयः ।
मय्यर्पितमनोबुद्धिः यो मे भक्तः स मे प्रियः ॥

ही गोष्ट अक्षरशः खरी आहे. कोणाचाहि द्वेष करण्याचें सोडा, सर्वांच्या संबंधांत मित्रभाव ठेवा, प्रसंगीं करुणभाव ठेवा—इत्यादि या श्लोकांतील धर्मोपदेश मनांत ठसवून घेऊन तदनुरूप आचाराचा अभ्यास करा—आणि मग

स मे प्रियः

असें म्हणणारा परमात्मा तुमच्यासाठीं काय काय 'प्रिय' करतो तें पहा.

———









**स्टीफन झ्वायग** अनुवादक : **श्री. बा. भ. बोरकर**

# उशीरां फेडलेलें ऋण

प्रिय ऐलेन,

इतक्या वर्षांनीं माझ्याकडून पत्र आलेलं पाहून तूं आश्चर्यचकित होशील हें माहीत आहे मला; मीं तुला शेवटचं पत्र लिहिलं त्याला आतां पांच–कदाचित् सहाहि वर्षं लोटलीं असतील. तुझ्या धाकट्या मुलीच्या विवाहप्रसंगींचं अभिनंदनाचं पत्र असावं तें. या खेपेचं कारण तसं सोहळ्याचं नाहीं. एका असाधारण भेटीची गोष्ट फक्त तुझ्याशींच बोलण्याची मला गरज वाटावी, हें कदाचित् तुला विचित्रहि वाटायचं. पण कांहीं दिवसांमागं जें काय घडलं तें केवळ तुलाच मला सांगतां येईल. तुलाच तें कळायचं.

तुला हें लिहितांना, माझी इच्छा नसतांनाहि मला वाटतं माझी लेखणी डळमळते आहे आणि हंसूं अनावर होतं. जेव्हां आपण पंधरासोळा वर्षांच्या अननुभवी आणि अवखळ पोरी होतों तेव्हां शाळेंत किंवा रस्त्यांत आपापलीं बालिश गुपितं परस्परांशीं उघडीं करतांना 'तुलाच हें कळायचं' हेच नेमके शब्द आपण हजारों वेळां नव्हते का एकमेकांना सांगितले ? आणि त्या कोवळ्या वयांत एका ठराविक माणसाविषयींचं सारं कांहीं अगदीं तपशीलवार एकमेकांनीं एकमेकांना सांगायचं असं शपथपूर्वक आपण नव्हतं का कबूल केलं ? या गोष्टीला आतां पंचवीस वर्षं होऊन गेलीं. पण घेतलेल्या आणा-शपथा पाळल्याच पाहिजेत नाहीं का ? विलंबानं का होईना, दिलेला शब्द मीं इमानें इतबारें पाळीत आहे असें तुला दिसून येईल.

गोष्ट अशी घडली:—यंदाचं वर्ष मला मोठं कष्टाचं आणि अडचणींचं गेलं. इथल्या मोठ्या रुग्णालयाच्या मुख्य डॉक्टराचं काम करण्यासाठीं म्हणून माझ्या नवऱ्याची या शहरीं बदली झाली. सगळा थारेपालट मलाच करावा लागला. तेवढ्यात माझ्या जांवयाला बायकोला घेऊन व्यापारी सफरीच्या निमित्तानं ब्राझीलला जावं लागलं. तान्हीं मुलं माझ्याकडे राहिलीं. लवकरच तांबड्या (Scarlet) तापानं तीं एकामागून एक आजारी पडलीं आणि त्यांचं मलाच पहावं लागलं. धाकट्या नातवानं अंथरूण सोडण्याआधींच माझी सासू वारली. हें सारं अवघ्या कांहीं आठवड्यांत घडलं. पहिल्यापहिल्यानं मी या आपत्ती अवसान गळूं न देतां पेलाव्या असं मला वाटलं. पण मला वाटलं होतं त्यापेक्षां कुठून तरी मला अधिक हादरा बसला असावा. कारण एके दिवशीं माझ्या नवऱ्यानं बराच वेळ मुकाट्यानं मला न्याहाळल्यावर म्हटलं, 'मार्गारेट, सुदैवानं मुलांची प्रकृति सुधारली आहे. आतां तूं तुझ्याहि प्रकृतीची काळजी घ्यायला हवीस. फारच गळलेली दिसतेस. खात्रीनं भलते श्रम घेतलेयस तूं. शहराबाहेरच्या एखाद्या आरोग्यालयांत दोनतीन आठवडे विश्रांति घेतलीस तर पूर्ववत् ठीक होशील.'

माझ्या नवऱ्याचं म्हणणं खरं होतं. मी समजत होतें त्यापेक्षां किती तरी जास्त थकलें होतें मी. मुख्य डॉक्टरची जागा माझ्या नवऱ्यानं घेतल्यापासून आम्हांला अनेकांकडे शिष्टाचार म्हणून जावं लागे आणि ते आमच्याकडे आले म्हणजे त्यांची ऊठबस करावी लागे. अशी मंडळी आमच्याकडे आलेली असतांना तासभर गुदरल्यावर त्यांच्या संभाषणाकडे लक्ष देणं कधीं कधीं मला अशक्य होऊन जाई. संसाराची देखरेख करतांना साध्यांतल्या साध्या गोष्टींचा मला अनेकदां विसर पडे. आणि सकाळीं












अंथरुणांतून उठण्यासाठीं मला केवढे प्रयास करावे लागत. हा माझा शारीरिक आणि मानसिक थकवा माझ्या नवऱ्याच्या भेदक आणि तज्ज्ञ डॉक्टरी नजरेला दिसून आल्याशिवाय रहाणं शक्यच नव्हतं. मला गरज होती ती दोन आठवड्यांच्या विश्रांतीची. आणि ते दोन आठवडे असे कीं स्वैंपाक, धुलाई, भेटीगांठी, रोजचे आचारव्यवहार यांपैकीं कशाचाच विचार करायला नको. एकटं, माझं मीच असावं. आई, आजी, घरमालकीण, बड्या डॉक्टरची पत्नी हीं तींच तींच नेहमींचीं नातीं मावळून जावीं. सुदैवानं त्या वेळीं माझ्या विधवा वहिणीला कांहीं दिवस आमच्याकडे रहाणं शक्य होतं. अर्थात् मला निघणं सोपं होतं. म्हणून निःसंकोचपणें मीं माझ्या नवऱ्याच्या सल्ल्याप्रमाणं वागायचं ठरवलं आणि पंचवीस वर्षांच्या वैवाहिक जीवनानंतर पहिल्या-वहिल्यानं स्वतःचं घर सोडून कांहीं दिवस एकट्यानं दुसरीकडे रहायला मी तयार झालें. या आरामानं मला जो जोम मिळणार होता त्याच्या केवळ कल्पने-नं कांहींशा अधीरतेनं मीं आनंदून गेलें. पण हा आराम आरोग्यालयांत करायचा एवढी माझ्या नवऱ्याची सूचना मात्र मीं पसंत केली नाहीं. वाकी त्यानं आरोग्यालयाची निवड देखील केलेली होती. त्याचा मालक त्यांचा तरुणपणांतला दोस्त होता, मला स्वतांतच चूर असण्यापलीकडे दुसरं कांहीं नको होतं. दोन आठवडे घालवायचे ते वाचीत, हिंडत, कल्पनेंत दंग होऊन आणि मन मानेल तितकं झोंपून. टेलिफोन नाहीं कीं रेडियो नाहीं. दोन आठवडे पण अगदीं निवान्तपणाचे—इतके निवान्तपणाचे कीं मनाला कोणतीहि चल-विचल जाणवणार नाहीं. या असल्या संपूर्ण शांती-इतकी आणि विश्रांतीइतकी गेलीं कित्येक वर्षे, अभावितपणें, अन्य कशाचीहि मीं उत्कठेनं वाट पाहिली नव्हती.

लग्नानंतरच्या सुरुवातीच्या वर्षांत आमचं वास्तव्य 'बोसन'मधें होतं आणि तिथं माझा नवरा मदतनीस डॉक्टरच्या कामावर होता. त्या दिवसांत एकदां आम्ही दूरच्या एका डोंगरवस्तींतल्या खेड्यांत तीन तासांची ट्रिप काढली होती. त्या गोष्टीची आतां मला आठवण झाली. गांवच्या चिमुकल्या चौकांत खिस्तालयासमोरच एक खानावळ होती. 'तिरोल'ला ज्या प्रकारच्या गांवठी खाणावळी वरचेवर आढळतात तशासारखीच. तळमजल्याच्या भिंती मोठ्या चिऱ्यांच्या होत्या आणि वरचा मजला लांकडी छपरानं झांकलेला होता. पाडस चांगला रुंद होता आणि त्याच्याखालीं ऐसपैस व्हरांडा होता. त्या पावसाच्या दिवसांत ही इमारत द्राक्षवेलींनीं नुसती वेढली गेली होती. जणूं जळती शेगडीच पण त्याच वेळीं आपल्या गारव्यानं जिव भरणारी. या खाणावळीच्या डाव्या-उजव्या बाजूंना लहानलहान घरं आणि गवताच्या झोंपड्या कोंडाळीं करून पडलेल्या, इमानी कुत्र्यां-प्रमाणं पहुडलेल्या दिसत होत्या आणि कधीं या घरांशीं तर कधीं त्या झोंपड्यांशीं तुलनेनं आपला उठावदारपणा दाखवीत ती इमारत पावसाळ्याच्या तरल मेघांखालून आपला उघडा वक्षभाग मिरवीत होती आणि समोर पसरलेल्या विस्तीर्ण डोंगराळ सृष्टीवर नजर टाकीत होती.

केवढा तरी वेळ तिच्यासमोर उभी राहून भरल्या मनानं मंत्रमुग्ध झाल्यासारखी टक लावून मी तिच्याकडे पहात होतें. जेव्हां आपण आगगाडींतून किंवा अन्य एखाद्या तऱ्हेनं प्रवास करतों तेव्हां एकादं घर असं कांहीं आपल्या डोळ्यांत भरतं कीं चटकन् एक कल्पना आपल्या मनाचा कवजा घेते; 'वा! आपणांला इथं रहायला मिळतं तर! कदाचित् आपण किती सुखी झालों असतों!' असा अनुभव कांहीं थोड्या थोडक्या वेळीं येत नाहीं, तुला कांहीं हें सांगायला नको. मला वाटतं हा विचार कोणत्याहि माणसाला का असेना केव्हां तरी घेरून टाकतोच. आणि जर एखाद्यानं अशा घरा-कडे आपण यांत सुखी होऊं अशा चोरट्या भावनेनं बराच वेळ टक लावली, तर त्याचं संवेदनाचित्र त्याच्या स्मृतीवर एकूण एक रेषांनीं उमटून निघतं. त्या खिडक्यांतल्या तांबड्या व पिवळ्या फुलांचे देठ आणि वरच्या मजल्याच्या लांकडी व्हरांड्यांत रंगीबेरंगी निशाणांप्रमाणं फडफडणारे ते टांगलेले कपडे यांच्या आठवणी ओळीनं गेलीं कित्येक वर्षे मी काढीत असें. आणखीहि एक आठ-वण माझ्या मनांत घोळत राही. ती म्हणजे अस्मानी










पृष्ठभागावर पिंवळ्या रंगानं चितारलेल्या त्या खिडक्यांतल्या पानांची. त्यांच्या मधोमध हृदयाची आकृति कोरलेली होती आणि वर छपराच्या मधल्या कोनाड्यांत करकोच्याचं एक घरटं होतं. जेव्हां जेव्हां माझं हृदय बेचैन होई तेव्हां तेव्हां मला त्या घराची आठवण होई. कधीं कधीं अर्धमिटल्या मनानं आणि अद्‌भुत रीतीनं आपण अशक्याला धरूं पहातों. नाहीं ? त्या वेळीं मला वाटे आपण एक तरी दिवस इथं घालवायचाच. जवळजवळ विसरली गेलेली ही जुनी इच्छा पुरी करायला हीच सुंदर संधि नाहीं का ? डोंगरांत वसलेलें तें नानावर्णी घर, टेलिफोन, रेडियो भेटी, शिष्टाचार यांच्यापासून अलिप्त पण आपल्या जगाच्या माफक सुखसोयींनीं सज्ज अशी ती खाणावळ हीच माझ्या या थकल्याभागलेल्या मज्जातंतूंना अधिक सोईस्कर नाहीं काय ? मीं स्वतःलाच म्हटलं. त्या घराच्या केवळ आठवणीनं मला वाटलं, मी त्या डोंगरी हवेचा मत्त आणि सुखद गंध घेत आहे आणि चरणाऱ्या गायींच्या गळ्यांतील घंटिकांचा दूरस्थ चिमणा नाद ऐकत आहे. आठवणींच्या या उजळणीनंच मला थोडा उत्साह आला आणि आरोग्य लाभलं. अकारण कांहीं कल्पना आपल्या मनांत उड्या मारूं लागतात. पण खरं पहातां बराच काळ मनांतल्या मनांत दबून राहिलेल्या आणि परिपूर्तीची लपून वाट पहाणाऱ्या आपल्या इच्छांच्या त्या लहरी असतात. ही कल्पनाहि त्यांतलीच एक होती.

मीं या घराच्या कितीदां आठवणी काढल्या. हें माझ्या नवऱ्याला माहीत नव्हतं आणि त्यानं तें पाहून वर्षेहि पुष्कळ झालीं होतीं. पहिल्या पहिल्यानं त्यानं तें हंसण्यावारी नेलं आणि नंतर मला म्हटलं, 'तिथं एकादी खोली खाली असली तर माहिती काढ.' तिकडून उत्तर आलं कीं, पाहुण्यांच्या तीनहि खोल्या रिकाम्याच आहेत. त्यांतली कोणतीहि मीं पसंत करावी. मीं मनाशीं म्हटलं, फारच छान. शेजार नाहीं कीं संभाषण नाहीं. रात्रीच्या पहिल्याच गाडीनं मी निघालें. दुसऱ्या दिवशीं सकाळीं मला व माझ्या चिमुकल्या बॅगेला घेऊन घोड्याची गाडी संथ चालींत डोंगरमाथ्यावर येऊन पोंचली.

सगळं कांहीं उत्तम होतं. अपेक्षेला कुठंच कांहीं उणं नव्हतं. खोलींतल्या पांढऱ्या देवदाराचं लांकूडकाम साधंच होतं तरीहि खोली रम्य होती. दुसरा कुणी पाहुणा नसल्यामुळं सगळा व्हरांडा मला मोकळा होता आणि तिथून विस्तीर्ण निसर्गदृश्य अनावृत होऊन राहिलं होतं. सैंपाकघरावर नजर गेली म्हणजे तेथली निर्दोष स्वच्छता आणि मांडणी पाहून माझ्यासारख्या अनुभवी घरमालकिणीला देखील वाटलं कीं इथं आपल्या सेवाशुश्रूषेंत मुळींच कमी पडणार नाहीं. कुरळ्या केसांची खाणावळकरीणबाई कृश आणि प्रेमळ दिसली. तिनं पुन्हां पुन्हां सांगितलं कीं, भेटीच्या निमित्तानं इथं तुम्हांला कुणी विक्षेप करील किंवा उपद्रव देईल अशी शंका देखील घेऊं नका. ती म्हणाली, 'रोज रात्रीं सातानंतर नगरपालिकेचा चिटणीस, गांवचा पोलिस अधिकारी आणि इतर कांहीं शेजारी दारू प्यायला, पत्ते खेळायला आणि गप्पा छाटायला इथं जमतात. पण हीं सारीं माणसं शांत वृत्तीचीं आहेत. अकराच्या सुमाराला तीं परत फिरतात. फक्त रविवारीं सकाळच्या प्रार्थनेनंतर आणि कधीं कधीं संध्याकाळींहि जवळपासचे खेडूत इथं जमा होतात. त्या वेळीं तेवढी थोडी शांति कमी असते '.

तो दिवस इतका सुंदर होता कीं मला कांहीं खोलींत बसून रहावेना. ज्या कांहीं थोड्या जिनसा मीं बरोबर घेतल्या होत्या त्यांची मीं मांडामांड केली. थंड मांसाच्या चार दोन कापी आणि भाजलेल्या पावाचा तुकडा मागवला आणि एकामागून एक माळ ओलांडीत मी चढती चढत राहिलें. माझ्या समोर सगळं कांहीं माझ्यासारखंच स्वैर होतं—फेंसाळ नदी पोटांत घेऊन राहिलेली ती दरी, पर्वतांचीं शिखरें हिममंडित करून राहिलेला तो शुभ्र किरीट. ऊन माझ्या रोमांरोमांतून संचार करीत आहे असें मला वाटत होतं आणि मी सारखी एक, दोन, तीन तास चालत राहिलें होतें. शेवटीं एकदांची मी त्या आल्पीन पर्वतांतल्या अत्युच्च माळावर येऊन पोंचलें. तेथल्या दाट, उबदार हिरवळीवर मीं अंग टाकून दिलं आणि मला वाटलं कीं वायूचा मंद लयबद्ध निःश्वास आणि भ्रमरांचा गुंजारव यांच्या साथीनं अपरंपार शांति—जिच्या साठीं इतके दिवस मी आसुसत होतें ती शांति माझा ताबा घेत चालली








आहे. मधुरपणें मीं डोळे मिटून घेतले, चित्त एकाग्र केलें आणि झोंपीं गेलें. गात्रांना गारवा जाणवूं लागला तेव्हां कुठं मला जाग आली. रात्र होत आली होती आणि मी चांगली पांच तास झोंपलें होतें. आपणांला केवढा थकवा आलेला होता याची आतां मला जाणीव झाली. पण माझ्या मज्जातंतूंत– माझ्या रक्तांत आतां नवीन जोम भरला होता. मी खाणावळीकडे परतूं लागलें आणि खंबीर, निश्चित आणि चपल पावलांनीं चांगली दोन तास चाललें.

दारांतच खाणावळकरीणबाईची गांठ पडली. मीं वाट चुकलें असेन अशा कल्पनेनं ती विचारी थोडी काळजींतच होती. मला पहातांच तिनं जेवण तयार असल्याची वर्दी दिली. मला सपाटून भूक लागली होती. इतक्या वर्षांत अशी भूक लागल्याचं कधीं मला आठवत नाहीं. मोठ्या आनंदानं तिच्या मागोमाग मी जेवणघरांत गेलें. हा दिवाणखाना खोलगट आणि काळोखा होता पण त्याचा तळ आणि भिंती नितळ लांकडानं बनवलेल्या असल्यामुळं तो आरामशीर झाला होता. आंतली मेजं तांबड्या निळ्या चौखणी टुवालांनीं आच्छादलेलीं होतीं आणि भिंतींवर वन्य बकऱ्यांचीं जातिवंत शिंगें आणि गुणाकार चिन्हांतल्या बंदुका लावलेल्या होत्या. अस्मानी रंगाची ती थोरली शेगडी जरी पेटवण्यांत आली नव्हती, तरी त्या दिवशींच्या गरमपणा मुळं दिवाणखान्यांतलं उष्णतामान सुखकर होतं. आलेल्या मंडळींना पाहूनहि माझं मत चांगलं झालं. चारांपैकीं एका मेजाभोंवतीं गांवचा पोलीस अधिकारी, तहसीलदार व चिटणीस आपापला बीरचा पेला घेऊन पत्ते खेळत बसले होते. गव्हाळी चेहऱ्यांचे आणि जीवनशक्तीनं सळसळणारे कांहीं खेडूत दुसऱ्या एका मेजावर कोंपर टेकून बसले होते. टिरोलीज लोकांच्या शिरस्त्याप्रमाणं ते थोडं बोलत होते आणि चिनई चिलमींतून मनमुराद धूम्रपान करीत होते. दिवसभर त्यांनीं अंग मोडून मेहनत केली आहे हें दिसून येत होतं. अतिश्रमामुळं विचार करण्याइतकें किंवा गप्पा करण्याइतकें देखील त्राण नसलेले ते भलेभावडे लोक विसांवा घेण्यापलीकडे अन्य कांहीं करीत नव्हते. त्यांचे कठोर चेहरे लांकडांतल्या कोरींव चित्रांसारखे दृष्टीला सुखविणारे होते. तिसऱ्या मेजाशीं कांहीं गाडीवाले त्यांच्याच सारखे थकल्यामुळं मुकाट्यानं आपापलं पेय घुटक्या-घुटक्यांनीं पीत होते. चौथं मेज माझ्यासाठीं मांडण्यांत आलं होतं. विलंब न लावतां माझ्यासाठीं तळलेल्या मांसाचा एवढा तुकडा आणून ठेवण्यांत आला कीं त्या दिवशींच्या त्या गार डोंगरी हवेमुळं माझी भूक राक्षसासारखी चवताळून उठली नसती तर त्याचा अर्धा भाग देखील मला खातां आला नसता.

वाचीत बसावं म्हणून मी खोलींत पुस्तक आणायला गेलें. पण त्या निवान्त दिवाणखान्यांत ज्यांच्या सहवासांत मला कसलाच उपद्रव नव्हता अशा प्रेमळ लोकांत बसून रहाणं मला इतकं मधुर वाटलं कीं मी तिथंच राहिलें. केव्हां केव्हां दार उघडे. एखादं सोरपान मूल आपल्या आईबडलांसाठीं बीरचं भांडं हुडकायला जाई किंवा एखादा खेडूत पाळणींत किंवा बाल्कनीजवळ ऐटीनं आपला पेला वर उचली, बाल्कनीच्या आंतल्या बाजूला खाणावळकरीणबाई आपल्या मुलांनातवांचे मोजे विणीत बसली होती. एक बाई तिच्याजवळ आली आणि खालच्या आवाजांत तिच्याशीं बोलूं लागली. त्या साऱ्या येण्याजाण्याला असा कांहीं विलक्षण शांत ताल होता कीं डोळ्यांना आपलें काम करावं लागत असतांनाही मनाला त्याचा कांहीं उपद्रव होत नव्हता आणि त्यामुळं त्या रुचकर वातावरणांत मला कमालीचं सुख वाटत होतं.

अशी निश्चिंत आणि कल्पनासाम्राज्यांत चूर होऊन बराच वेळ मी बसून राहिलें होतें. त्या वेळीं नऊ वाजले असतील. पुन्हां कुणी तरी दार उघडलं. पण या खेपेला खेडूत लोक उघडीत तसं तें सावकाशीनं उघडलं नाहीं. दार उघडलं तें वेगानं आणि सताड उघडलं आणि आंत येणारा माणूस लगेच तें बंद करण्याऐवजीं तिथंच क्षणभर थांबून राहिला. जणूं काय आंत यावं किंवा नाहीं याविषयीं त्याचा पुरता निर्णय झालेला नव्हता. त्यानंतर मात्र त्यानं दार बंद केलं पण इतरांपेक्षां कितीं तरी अधिक आवाज करून. मग त्यानं सगळ्या बाजूंना पाहून घेतलं आणि गंभीर आणि घुमणाऱ्या आवाजांत सर्व उपस्थित












मडळींना अभिवादन करून तो म्हणाला, 'सभ्य गृहस्थहो ! देव तुमचं कल्याण करो.' हें किंचित् कृत्रिम आणि शेतकरी लोकांच्या बाबतींत अस्वाभाविक असं अभिवादन मला लगेच विचित्र वाटलं. टिरोलीज गांवांतल्या एखाद्या खाणावळींत एकमेकांना अभिवादन करतांना शहरांतल्याप्रमाणं 'सभ्य गृहस्थहो !' अशा संबोधनाचा वापर करण्याची लोकांत पद्धत नव्हती आणि खरोखर त्या अभिवादनानं उपस्थित मंडळींत कुठंच कांहीं उत्साह दिसला नाहीं. कुणाचि नजर उचलली नाहीं. खाणावळकरीणबाईनं मुकाट्यानं आपले लोकरीचे राखिया मोजे विणण्याचं काम तसंच चालू ठेवलं. गाडीवाल्याच्या टेबलाकडून मात्र कुणीतरी खालच्या आवाजांत तोंडांतल्या तोंडांत बेपर्वाईनं पुटपुटला, 'देव तुमचं भलं करो'. पण त्या उद्गाराच्या तालावरून 'जा कीं मसणांत' असादेखील त्याचा अर्थ झाला असता. त्या मुलखावेगळ्या गिऱ्हाइकांत जो विचित्रपणा होता त्यानं कोणीही आश्चर्यचकित झाल्याचं दिसलं नाहीं. तथापि या निःस्नेह स्वागतानं तो अनोळखी माणूस मुळीं सुद्धां बेचैन झाल्याचं दिसलं नाहीं. सावकाशीनं आणि गंभीरपणानं त्यानं आपली रुंद पण झिजलेल्या कांठाची आणि शेतकऱ्यांच्या टोपीशीं यत्किंचितहि सादृश्य नसलेली हॅट बकऱ्याच्या शिंगावर लटकावली आणि कुठं बसावं हें न समजल्यामुळं तो प्रत्येक मेजाकडे आळीपाळीनं पहात राहिला. त्यांपैकीं एकाहि मेजाकडून स्वागताचा शब्द निघाला नाहीं. जे तिघेजण खेळत होते ते आपल्या पत्त्यांना तसेंच खिळून राहिले. बांकावर बसलेल्या खेडुतांनीं नवागताला जागा करून देण्यासाठीं एवढी सुद्धां हालचाल केली नाहीं आणि माझ्यावर तर त्याच्या एकंदर वागणुकीचा असा कांहीं वाईट परिणाम झाला कीं त्याच्या बडबड्या स्वभावाची भीति घेऊन मीं लगेच पुस्तक उघडलं.

अशा परिस्थितींत स्पष्टपणें अवजड आणि अवघडलेल्या पावलांनीं बाल्कनीचा रस्ता धरण्याशिवाय त्या अपरिचित माणसाला गत्यंतरच उरलं नाहीं. 'गारगार आणि फेसदार अशी बीर द्या ना सुंदराबाईसाहेब !' तो बऱ्याच उंच आवाजांत म्हणाला. तो असाधारण करुणाजनक आवाज ऐकून पुन्हां मला चमत्कारिक संवेदना झाली. तिरोलीज खेड्यांतल्या एका खाणावळींत असली दरबारी भाषा अगदींच अस्थानीं होती आणि त्या खाणावळकरणींत या आजीबाईच्या वयांत असं कांहींच नव्हत कीं ज्यामुळं असल्या शाब्दिक शृंगाराला दुरून देखील कांहीं समर्थनाला जागा रहावी. अपेक्षेप्रमाणं त्या शब्दांचा तिच्यावर कांहींच परिणाम झाला नाहीं. तिनं प्रत्युत्तर न करतां एक गोलसर दगडी पेला उचलला, टुवालनं चिकटून घेतला, नंतर पिपांत बुडवून आणि अनादर न करतां पण अनास्थेनं त्याच्यापुढं ठेवला. अगदीं बाल्कनीपुढंच त्याच्या डोक्यावर सांखळ्यांना अडकवलेला राकेलचा दिवा लोंबकळत असल्यामुळं या मुलखावेगळ्या गिऱ्हाईकाला बारकाईनं पाहून घेणं मला सुलभ झालं. त्याचं वय छप्पन्न असावं. तरीही त्याची अंगकाठी भरभक्कम होती. आंत येतांनाची त्याची संथ आणि ओढगस्त चाल पाहून माझं ध्यान त्याच्याकडे खेंचलं गेलं होतं. डॉक्टरची पत्नी या नात्यानं मला जो कांहीं अनुभव होता त्याच्या आधारावर त्याच्या या असल्या चालीचं कारण मीं तेव्हांच अंदाजलं होतं. खास, वाताच्या झटक्यानं त्याची एक बाजू कांहींशी लंगडी पडली असली पाहिजे. कारण त्याच्या जिवणीचं इकडचं टोंक तिरपं वळलं होतं आणि डाव्या डोळ्याची वरची पापणी अधिक गळलेली आणि ढिली पडलेली स्पष्ट दिसत होती. या विकृतीमुळं त्याचा चेहरा विद्रूप दिसत होता आणि त्याची मुद्रा कंटाळल्यासारखी दिसत होती. त्या रानवट गांवांत त्याचा तो पेहराव तर अगदीं चमत्कारिक दिसत होता. शेतकरीपद्धतीचं कुडतं आणि कातडी विजार याऐवजीं त्यानं लांबरुंद विजार घातली होती. तिचा वर्ण पिंवळट होता पण एके काळीं तो पांढराहि असणं शक्य आहे. कोट होता तोहि असाच. बरींच वर्षे होऊन गेल्यामुळं तो त्याच्या अंगांवर प्रयासानं चढलेला होता आणि त्याच्या हातांच्या कोपरांना तर झिलई चढली होती. गळपट्टीची गांठ नीट न बसल्यामुळं त्याच्या जाडजूड पण ढिल्या गळ्यांतून ती काळ्या दोरीप्रमाणं लोंबकळत होती. त्याची एकंदर सुरत ढांसळलेली दिसत होती, तरीहि एके काळीं या माण-

साचं रूप चांगल्यापैकीं असणं शक्य आहे. त्याचं कपाळ गोलसर आणि उंच होतं आणि शुभ्र, विपुल आणि न विंचरलेल्या केसांमुळं त्या उंचीत भर पडून त्याला उठाव मिळाला होता. पण खालच्या भरगच भिंवयांखालीं पतनाला सुरुवात झाली होती. लालसर कडांच्या पापण्यांतल्या त्याच्या डोळ्यांत आतां चमक राहिली नव्हती आणि त्याचीं सुरकुतलेलीं आणि लिबलिबीत गालफडं पडलीं होतीं. त्याची चर्या पाहून मला इटलींत पाहिलेल्या एका रोमन बादशहाच्या मुखवट्याची आठवण झाली. इतक्या बारकाईनं त्याला न्याहळण्याइतकं माझं ध्यान त्याच्याकडे कां खेंचलं जावं हें सकृद्दर्शनीं माझं मलाच कळेना. पण माझी ही जिज्ञासा त्याच्या लक्षांत येतां कामा नये हें मीं लगेच ओळखलं. कारण तो कुणाला तरी व्याख्यान झोडायला आतुर झालेला होता हें स्पष्ट दिसत होतं. त्याला बोलण्याचा अनावर उमाळा आल्यासारखा भासत होता. कांपऱ्या हातानं त्यानं पेला उचलला आणि एक घोट घेतला मात्र, तोंच तो उद्गारला 'वा: ! छान, छान!' आणि त्यानं सभोंवार नजर टाकली. कुणीच त्याला उत्तर दिलं नाहीं. जे खेळत होते त्यांनीं पत्ते पिसले आणि वांटले आणि बाकीचे चिलमी ओढीत राहिले. असं दिसत होतं कीं सगळेच ह्याला ओळखतात पण मला ठाऊक नसलेल्या कोणत्या तरी कारणामुळं ते त्याच्याकडे लक्ष देत नाहींत.

शेवटीं त्याला रहावेना. त्यानं बीरचा पेला उचलला आणि तो घेऊन तो खेडूत बसले होते त्या मेजाकडे गेला. 'या म्हाताऱ्या कलेवराला देतां कां थोडी जागा?'

खेडूत निष्काळजीपणानं थोडे बाजूला सरकले. हातांतला अर्धाभरला पेला आळीपाळीनं दूर नेत आणि जवळ घेत तो कांहीं वेळ मुकाट्यानं तसाच बसून राहिला. पुन्हां माझ्या लक्षांत आलं कीं, असं करतांना त्याचीं बोटं कांपत आहेत. शेवटीं त्यानं टेकून घेतलं आणि बऱ्याच मोठ्या आवाजांत त्यानं बोलायला सुरुवात केली. कुणाशीं बोलावं हें त्याला कळेना कारण त्याच्याजवळ बसलेल्या दोघांहीं खेडुतांनीं स्पष्टपणं दाखवून दिलं होतं कीं त्याच्याशीं गप्पा छाटण्याची त्यांना मुळींच इच्छा नाहीं. खरं पहातां तो सगळ्यांनाच उद्देशून बोलत होता. किंबहुना बोलायचं म्हणून-आपण बोललेलं आपण ऐकावं म्हणून तो बोलत होता.

"भली शिक्षा झाली ही आज !" त्यानं सुरुवात केली. "उमरावांचा हेतु उत्तम होता. मुळींच शंका नाहीं यांत. दुसरं कांहीं म्हणतांच यायचं नाहीं—रस्त्यांत मी दिसतांच त्यांनीं मोटार थांबवायला लावली— हो थांबवायला लावली आणि ती केवळ माझ्यासाठीं म्हणून. म्हणाले, 'मुलांना घेऊन बोझनला सिनेमाला चाललों' आणि विचारायला लागले, 'चलता ना' म्हणून. एवढा सुशिक्षित, सुसंस्कृत आणि प्रसिद्ध गृहस्थ, आणि गुणांची कदर करणारा. तेव्हां त्याला नाहीं कसं म्हणायचं ? त्यांत कुणाशीं कसं वागायचं हें माहीत असलेला माणूस मी. अर्थातच मागं त्याच्याच जवळ बसलों. असल्या थोर गृहस्थाच्या जवळ बसून जाणं हा केव्हांहि सन्मानच. मुख्य रस्त्यावर एवढ्या गाजावाज्यानं जत्रेंतल्या गोंधळाप्रमाणें लखलखाट आणि जाहिरातबाजी करून थिएटर उघडलं आहे आणि तिकडे आपणाला नेण्यांत येत आहे तेव्हां म्हटलं 'चला.' हे इंग्रज आणि अमेरिकन लोक जें हें तयार करतात आणि आमचा पैसा घेऊन अंगाला चिकटवितात तें कां न बघा ? हे म्हणतात तशीहि चित्रपटविद्या म्हटलं असेलहि एक कला! पण हे खवीस!"—हे शब्द उच्चारतांना त्यानं जोरानं एक थुंकी टाकली. "हो खवीसच! पडद्यावरून असली घाण चालली होती म्हणतां! कलेवरचा अत्याचार होता तो! ज्या जगानं शेक्सपियर आणि गटे यांना जन्म दिला त्याच्यावर अत्याचार! सुरुवातीला छप्पन रंगांची जनावरं असलेली एक खुळचट रंगीत फीत लागली. मला तिच्याबद्दल कांहीं म्हणावयाचं नाहीं. त्यानं कदाचित् मुलांची करमणूक होत असेल. शिवाय त्यांत कुणाचं कांहीं नुकसान नाहीं. पण नंतर जी 'रोमियो-ज्युलिएट' दाखवली तिला कलेच्या नांवावर बंदीच घालायला पाहिजे होती. हो बंदीच. कविता तर ऐकवत नव्हत्या. शेक्सपियरच्या पवित्र पद्यपंक्ती कुणी तरी भट्टीच्या भोंग्यांतून बाहेर काढतोय् असं वाटत होतं. अशा कांहीं गुळमट आणि विकृत करून ठेवल्या होत्या म्हणतां! मला







मुद्दाम आमंत्रण करून घेऊन गेलेले उमराव जवळ बसलेले नसते तर सरळ उठून चालायला लागलों असतों! असलं बावनकशी सोनं घेऊन असली त्याची अशी घाण करायची आणि या असल्या घाणीच्या युगांत जगावं लागतंय् आपणांला!"

त्यानं एक मोठा घोट घेतला आणि पेला इतक्या जोरानं टेबलावर ठेवला कीं, त्याचा चांगलाच आवाज झाला. त्याचा स्वर आतां इतका चढला होता कीं तो ओरडतो आहे असं वाटत होतं.

"आणि आजकालचे हे नट पैशासाठीं या गोष्टीला तयार होतात. या नतद्रष्ट पैशासाठीं शेक्स्पियरचें यंत्रांतून थुंकून टाकतात आणि कलेचे धिडवडे काढतात. हें पाहिलं म्हणजे रस्त्यांत भेटणाऱ्या कोणत्याहि बाजारबसवीचीं मी स्वतःशींच स्तुति-स्तोत्रं गाऊं लागतों. वांववांव लांबीचीं गुळगुळीत थोबाडं फळ्या—भिंतींवर रंगवायला लावून आणि कलेचा खून करून लक्षांच्या राशी रचणाऱ्या या माकडांपेक्षां हीनांतल्या हीन बाजारबसवीला मी अधिक मानतों आणि अशासाठीं कीं हे लोक शब्दाचा—जिवंत शब्दाचा खून करतात. आणि जनतेला वळण लावण्याऐवजीं आणि तरुणांना शिक्षण देण्याऐवजीं शेक्स्पियरचं काव्य भोंग्याप्रमाणं ओरडत सुटतात. शिलरनं रंगभूमीला नैतिक संस्था असं नांव दिलं; पण आज त्याला कांहींच किंमत राहिली नाहीं. आज कशालाच किंमत राहिली नाहीं. केवळ पैसा, सैतानी पैसा आणि स्वतःची जितकी कांहीं करतां येईल तितकी जाहिरात. आणि ज्याला हें कळत नाहीं तो उपासांनीं मरतो. पण हें उपासांनीं मरणंच बरं. जो जो म्हणून त्या अवलक्षणी हॉलीवुडला विकून घेतो त्याला त्याला माझ्या मतें उभा टांगला पाहिजे फांसावर. हो फांसावरच!"

शेवटचे शब्द त्यानं ओरडत उच्चारले आणि ते उच्चारतांना मेजावर एक मूठ मारली. खेळत होते त्यांतला एक गुरगुरला,

'देवाखातर एकदाचं तोंड आटप ना आतां! या तुझ्या बाष्कळ बडबडीनं इथं कशावरच लक्ष लागत नाहीं आमचं!'

उलट टोला हाणण्यासाठीं जणूं काय, म्हाताऱ्यानं तावडतोब हालचाल केली. त्याच्या विझलेल्या दृष्टींत क्षणभर धगधगीत ठिणगी चमकली पण लगेच विचाऱ्यानं तिरस्कार व्यक्त करण्यावरच समाधान मानलं. जणूं काय आपलं उत्तर देण्याच्या लायकीची ही असामी नाहीं असंच त्याला सुचवायचं होतं. ते दोघेहि खेळत तसेंच चिलीम पीत राहिले होते आणि गढलेल्या नजरेनं तो गप्प बसून राहिला होता. असं गप्प बसावं लागण्याची त्याची ही पहिलीच खेप नव्हती हें तर दिसतच होतं.

मी अगदीं गाभ्यापासून हादरून गेलें होतें. माझं हृदय कांपूं लागलं. या खालावलेल्या माणसाचा दर्जा आजच्यापेक्षां खास एकेकाळीं वरचा होता हें मला लगेच जाणवलं आणि कोणत्या तरी तशाच कारणानं—कदाचित् नशेबाजीनं आजची ही दैन्यावस्था याला आली आहे या विचारानं माझं हृदय कळवळूं लागलं. तो किंवा दुसरं कुणी तरी आतां एकाद्या तंट्याला प्रारंभ करतात कीं काय या शंकेनं माझा नीट श्वास निघेना. तो आंत आला आणि त्याचा आवाज माझ्या कानीं पडला त्या क्षणापासून कांहीं तरी मला बेचैन करूं लागलं—पण तें काय याचा मात्र मला उलगडा होईना. तो माणूस खालीं मान घालून भांबावलेल्या दृष्टीनं मुकाट्यानं बसून राहिला होता. हलूच स्वतःशींच कांहीं तरी तो पुटपुटत आहे असं मला वाटलं. कुणीच त्याच्याकडे लक्ष देत नव्हतं.

तेवढ्यांत खाणावळकरीणबाई कांहीं तरी हुडकून आणण्यासाठीं स्वैंपाकघरांत जाण्यासाठीं उठली. मी तिच्याजवळ गेलें आणि तिला विचारलं, 'कोण ग हा माणूस?'

'गरीब बिचारा' ती शांतपणें म्हणाली. 'तो इथल्या दीनवत्सल—गृहांत रहातो आणि रोज रात्रीं मी त्याला बीरचा एक पेला देतें. तेवढेहि पैसे त्याच्याजवळ नाहींत. पण त्याच्याशीं संबंध ठेवणं सोपं नाहीं. एके काळीं म्हणे तो नट होऊन गेला. कुठं कुणाला माहीत. आपण कुणी तरी होऊन गेलों हें कुणीहि खरं मानीत नाहीं आणि आपल्याला मानानं वागवीत नाहीं यामुळं तो चिडतो. लोक कधीं कधीं त्याला बनवतात आणि त्याला कांहीं तरी म्हणायला सांगतात. नंतर तो उठतो आणि








तासन्‌तास बोलत रहातो. पण बोलतो तें नेमकं असलं बोलतो कीं कुणाला त्यांतलं अवाक्षर देखील समजत नाहीं. कधीं कधीं ते त्याची चेष्टा करूं लागतात आणि तो चवताळतो. म्हणून त्याच्याशीं जपून वागलं पाहिजे. मात्र आपण होऊन तो कुणाच्या वाटेला जात नाहीं. त्याला दोन-तीन पेले बीर दिली म्हणजे झालं. सुखांत असतो मग आमचा गरीब बिचारा पीटर ! '

' —काय ? काय म्हणालीस त्याचं नांव ?'—अगदीं विस्मयचकित होऊन आणि या विस्मयाचं कारण देखील न समजून मीं विचारलं.

—पीटर स्टजेंट्लर. त्याचा बाप इथला, या गांवचा लांकूडफोड्या होता म्हणून त्याला या दीन-वत्सलगृहांत प्रवेश मिळाला.

आतां कळेल तुला मी घाबरीघुबरी कां झालें तें. ज्याची कल्पना देखील करतां आली नसती त्याचा मला क्षणार्धांत उमज पडला.

नशेबाजीनं पोखरलेला, वातानं पांगुळल्यामुळं दीनवत्सल-गृहाचा आश्रय घेतलेला, तो गात्रगळित म्हातारा पीटर स्टजेंट्लर दुसरा तिसरा कोणी नसून आपल्या यौवनाचा देव, आपल्या स्वप्नांचा स्वामी पीटर स्टर्ज होता. तुला माहीतच आहे कीं हाच पीटर स्टर्ज आपल्या शहरांतला प्रसिद्ध नट आणि रंगभूमीचा सम्राट् होता आणि याच्याच वरून आपण दोघीहि यौवनाच्या पहिल्या नव्हाळींत जीव ओवाळून टाकीत होतों, त्याची मानसपूजा करीत होतों, वेडावून जाऊन त्याच्यावर प्रेम करीत होतों, विश्वांतली सगळी भव्यता आणि दिव्यता त्याच्या पलीकडे अन्यत्र आपल्याला दिसत नव्हती. खाणावळींतल्या त्या दिवाणखान्यांत त्याचे ते पहिले शब्द माझ्या कानीं पडतांच मी अशी बेचैन कां झालें त्याचा आतां मला उलगडा झाला. मीं त्याला त्या वेळीं ओळखलं नव्हतं. आणि या अशा कंगाल दशेंत आणि चेहरा असा विद्रूप झालेला असतांना ओळखणं तरी कसं शक्य होतं मला ? पण गाडल्या गेलेल्या आठवणींकडे जातां येण्यापुरती फट मिळावी असं कांहीं तरी त्या आवाजांत होतं. तुला आठवतं का आपण त्याला पहिल्यांदा पाहिलं तें कुठं आणि कसं तें ? इन्स्ब्रुकच्या नगरनाट्यमंदिरानं कुठल्या तरी ग्रामीण नाटक मंडळीकडून कांहीं प्रयोगाच्या बोलीनं त्याला आणलं होतं. ग्रिलपार्झरच्या 'सॅफो' या अभिजात नाटकांत तो काम करणार होता तेव्हां आमच्या आई-वडिलांनीं सहजच आम्हांला नाटकाला जायला परवानगी दिली होती. ज्या रूपवान् तरुणानं 'सॅफो'च्या हृदयाला वेध लावला त्या 'फायोन'ची भूमिका त्यानं घेतली होती. ग्रीक पेहरावांत गर्द काळ्या केशकलापावर मुकुट चढवून ज्या वेळीं जणू दुसरा 'अपोलो'च असा तो रंगभूमीवर प्रकट झाला तेव्हां आमचीं अंतःकरणं आमच्या स्वाधीन राहिलीं नाहींत. तीं त्यानं केव्हांच बळकावलीं होतीं. त्यानं पहिले शब्द देखील उच्चारले नव्हते, तरीहि भावनातिरेकानं आपण नुसत्या कांपत होतों आणि एकमेकांचा हात घट्ट धरून बसलों होतों. शेतकऱ्यांच्या आणि दुय्यम पांढरपेशांच्या त्या शहरांत असला पुरुष आपण कधीं पाहिला नव्हता. गॅलरींतून त्याचं स्वभावचित्रण पुरतं आमच्या लक्षांत येत नव्हतं, तरीहि विशेष प्रसिद्ध नसलेला हा ग्रामीण नट म्हणजे ईश्वरानं पाठविलेला विश्वांतल्या साऱ्या कुलीनतेचा आणि दिव्यतेचा पुतळाच असं आम्हांस वाटलं. आमचीं चिमणीं हृदयं आमच्या छातींत स्पंदन पावूं लागलीं. ज्या वेळीं थिएटरमधून आपण बाहेर पडलों त्या वेळीं आपण मंत्रमुग्ध झालों होतों, दुसऱ्याच कुणी तरी होऊन गेलों होतों. मैत्रिणी असल्यामुळं, मैत्रींत बिघाड येऊं नये म्हणून आपण शपथा घेतल्या कीं आपण दोघांनींही त्याच्यावर प्रेम करावं, त्याची पूजा करावी. आणि त्याच क्षणीं आमच्या स्वच्छंदीपणाला प्रारंभ झाला. त्या पुरुषाहून अधिक महत्त्वाचं असं आपणांस कांहीं उरलं नाहीं, जें जें म्हणून कांहीं शाळेंत, घरांत किंवा शहरांत घडत होतं, त्याचा त्याचा आम्ही अद्भुतपणें त्याच्याशीं संबंध घालीत होतों. बाकी सगळं आपणांला बेचव वाटत होतं. पुस्तकांत आतां आपणांला गोडी राहिली नव्हती आणि त्याच्या वाणींतच काय तें आम्हांला संगीत आढळत होतं. मला वाटतं महिन्याचे महिने आपण त्याच्याच आणि त्याच्या विषयींच्याच गोष्टी बोलत होतों. आपल्या प्रत्येक दिवसाचा प्रारंभ त्याच्याच








वरून व्हावयाचा. कोणतं वर्तमानपत्र आपल्याकडे आलं आहे हें आमच्या वडिलांआधीं आम्हांला कळत असे. धडधड जिना उतरून आपण तें उचलीत असूं आणि त्यांतल्या टीका वाचीत असूं; पण एकहि टीका आपणाला पुरेशी प्रोत्साहक वाटत नसे. त्यांत त्याच्याविषयीं एकादा शब्द जरी स्नेहशून्य आढळला तरी देखील आमचं मन पडत असे. दुसऱ्या एकाद्या नटाची स्तुति आढळली तर आम्हीं त्याचा तिरस्कार केलाच. वेडेपणाच्या इतक्या गोष्टी आपण त्या वेळीं केल्या कीं त्यांचा सहस्रांश देखील आज मला आठवतां येत नाहीं. तो केव्हां निघतो आणि कुठं जातो हें आम्हांला ठाऊक असे. तो कुणाशीं बोलतो हें ठाऊक असे आणि रस्त्यांत जे त्याच्याबरोबर असत त्यांचा आम्हांला हेवा वाटे. तो वापरीत होता ती काठी आणि गळपट्ट्या आमच्या चांगल्या परिचयाच्या झाल्या होत्या. त्याचीं छायाचित्रं आपण केवळ घरांतच लपवून ठेवलीं होतीं असं नाहीं तर आपल्या शालेय पुस्तकांतहि आपण तीं घालून ठेवलीं होतीं आणि अशा रीतीनं धडधडीत वर्गांत आपण वरचेवर तीं चोरट्यानं निरखीत होतों. आपण त्याच्याविषयीं विचार करीत आहोंत हें एकमेकींना या वांकावरून त्या वांकावर कळवतां यावं म्हणून आपण आपली खास हावभावांची भाषा तयार केली होती. बोट कपाळाशीं नेलं म्हणजे 'मी त्याचा विचार करीत आहें' असा अर्थ सूचित होत असे. मोठ्यानं कविता वाचायच्या असल्या म्हणजे न कळत आपण त्याच्याचे आवाजांत त्या म्हणत असूं आणि आज देखील, त्याच्या तोंडून ऐकलेलीं गाणीं मला दुसऱ्या तालांत ऐकवणार नाहींत. थिएटरच्या पायऱ्यांशीं दारांत आपण त्याची वाट पहात असूं आणि चातुर्यानं त्याच्या मागोमाग जात असूं. ज्या हॉटेलांत तो वर्तमानपत्रं वाचीत बसे त्याच्या समोरच्या घराच्या दारांत ठाण मांडून केवढा तरी वेळ आपण त्याच्याकडे ध्यान लावीत असूं. पण आपली भक्ति एवढी मोठी कीं त्या दोन वर्षांत त्याच्याशीं ओळख करून घेण्याचा किंवा दोन शब्द बोलण्याचा आपणांला धीर झाला नाहीं. त्याच्याविषयीं अगत्य असलेल्या पण फारशा संकोची नसलेल्या इतर मुली त्याची स्वाक्षरी मागत आणि रस्त्यांत त्याला अभिवादन करण्याचंहि धाडस करीत. पण आपणांला हें धैर्य कधींच झालं नाहीं. एके दिवशीं त्यानं फेंकून दिलेलं सिगारेटचं एक थोटूक आपणांला सांपडलं. स्मृतिचिन्ह म्हणून आपण त्याचे दोन भाग केले आणि प्रत्येकीनं एकेक भाग ठेवून घेतला. या बालिश मूर्तिपूजेनं त्याच्याशीं संबंध असलेली एकूण एक गोष्ट व्यापून टाकली होती. त्याच्या म्हाताऱ्या घरवाल्या बाईचा आम्हांला किती हेवा वाटे. कारण त्याची सेवाशुश्रूषा करण्याचं भाग्य तिच्या वांट्याला आलेलं होतं. तिच्याबद्दल आम्हांला निरतिशय आदर वाटे. एकदां ती कांहीं वस्तु खरेदी करीत होती. तेव्हां तिची करंडी भरण्याच्या कामांत तिला साहाय्य करण्यासाठीं आम्ही आपण होऊन पुढें झालों आणि जेव्हां तिनं आपणांला दोन भले शब्द दिले तेव्हां आम्हाला केवढी धन्यता वाटली ! या पीटर स्टर्जच्यासाठीं त्या पोरवयांत काय काय वेडेपणा केला आपण ! आणि यांतलं त्याला कांहीं देखील माहीत नव्हतं कीं त्याची पुसट शंका नव्हती !

आज आपण वृद्ध आणि म्हणून समंजस झाल्यामुळं कौमार्यसुलभ उत्तानता म्हणून या वेड्या गोष्टींचा उपहास करणं आपल्याला सोपं आहे. तरीहि आमच्या बाबतींतली ती उत्तानता धोक्याची होती असं म्हटल्याशिवाय माझ्यानं रहावत नाहीं. आम्ही वेड्या मुलींनीं बरोबरच प्रेम करण्याच्या शपथा घेतल्यामुळं केवळ आपल्या या नादाला इतकं अतिरंजित आणि अविवेकी रूप आलं असावं असं मला वाटतं. त्यामुळं आपण उत्तानतेंत एकमेकांवर वरचढ होण्यासाठीं स्पर्धा लावली. आपल्या या स्वप्नदेवाची आपल्याला क्षणमात्र देखील विस्मृति झाली नाहीं अशी एकमेकींना खात्री पटविण्यासाठीं आपण नवनवीन प्रत्यंतरें शोधून काढूं लागलों आणि रोज रोज स्वत:ला नवनवीन पद्धतीनं उत्तेजित करूं लागलों. वाटेल त्या पोरगेल्या तरुणावर भाळून अप्रबुद्ध गंमतींनीं जीव खेळवणाऱ्या इतर पोरींसारख्या नव्हतों आपण. आमच्या दृष्टीनं त्याच एका पुरुषांत जगांतला सारा उत्साह आणि सगळी भावना सामावलेली होती. दुर्दम्य










विकाराच्या त्या दोन वर्षांत आमचे सारे मनोविचार त्याच्यावरच केंद्रित झालेले होते. या अकाल-विकारानंतर देखील आम्हांला आमच्या नवऱ्यांवर आणि मुलांवर इतकं विशुद्ध, दृढ आणि निरामय प्रेम करतां आलं आणि या अविवेकी अतिरेकानं आपली भावनाशक्ति आटून गेली नाहीं याचं कधीं कधीं मला नवल वाटूं लागतं. तरीहि त्या कालाची आज आपल्याला मुळींच शरम वाटायला नको. कारण त्या माणसामुळं आपण त्या कालांत कलेच्या छंदांत जगत होतों आणि आपल्या वेडांत मंगलाची, विशुद्धाची आणि उदात्ताची जी अद्‌भुत ओढ होती तिला त्या माणसांत केवळ योगायोगानं साकारता लाभली होती.

अन्य जीवनाच्या आणि अन्य भावनांच्या आवरणाखालीं हें सारं आतां बऱ्याच काळापासून जुनं झालं होतं. तरीहि खाणावळकरीणबाईनं त्याचं नांव उच्चारतांच मी अशी कांहीं दचकलें कीं तें केवळ चमत्कार म्हणूनच तिच्या ध्यानांत आलं नाहीं. ज्याला आपण प्रोत्साहनाच्या प्रभावळींत पाहिलं आणि यौवन आणि सौंदर्य यांचं प्रतीक म्हणून ज्याच्यावर कडेलोटाला जाऊन आपण प्रेम केलं त्याला अशा दीन अनामिक भिक्षेकऱ्याच्या स्थितींत, जंगली शेतकऱ्यांचा उपहासविषय झालेला आणि या दैन्याची घृणा न येण्याइतका वृद्ध आणि गलित झालेला पाहून मला मोठाच धक्का बसला. खाणावळीच्या त्या दिवाणखान्यांत परत जाणं मला अशक्य झालं. कारण त्याच्यासमोर अश्रू आवरणं किंवा अन्य तऱ्हेनं माझा मनःक्षोभ त्याच्या लक्षांत येऊं न देणं मला कदाचित् अशक्य झालं असतं. म्हणून जिना चढून मी माझ्या खोलीकडे गेलें आणि माझ्या यौवनावस्थेंत मी याला काय मानलं याची मी उजळणी करूं लागलें. इतकं विचित्र असतं माणसाचं मन...... ज्यानं एके काळीं माझं सारं चित्त आणि सारा जीव भरून आणि भारून टाकला होता, त्याची वर्षानुवर्षं मला एकदांहि आठवण आली नव्हती. त्याच्याविषयीं कधींच कांहीं न विचारतां मी मेलें असतें. तो मेला असता, तर मला त्याची वार्ता लागली नसती.

मीं खोलींतला दिवा लावला नाहीं. तशीच काळोखांत बसून मी एकामागून एक आठवणी चाळूं लागलें. प्रारंभ आठवला, अंत आठवला आणि अकस्मात् तो सारा विस्मृत जुना इतिहास मी मनानं पुन्हां जगूं लागलें. ज्या या माझ्या शरीरानं कित्येक वर्षांमागें अनेक मुलांना जन्म दिला तेंच आज नव्यानं कुमारिकेच्या तनुलतिकेप्रमाणं सडपातळ झालं आहे आणि झोंपण्यापूर्वी त्याचा विचार करीत धडधडत्या अंतःकरणानं शय्येवर बसून रहाणारी त्या काळची तीच मी अजून तशी आहे अशी माझी भावना झाली. माझे हात गरम होऊन निघाले आणि मला असा कांहीं प्रत्यय आला कीं त्याचा आतां मलाच अचंबा वाटला. त्या प्रत्ययाचं वर्णन करणंहि मला जमायचं नाहीं. अकस्मात् माझ्या अंगांत आपादमस्तक हुडहुडी भरली. त्याचं कारण मला प्रारंभीं कळलं नाहीं. कशानं तरी मला गदगदां हलविलं होतं. जो विचार जी विशिष्ट आठवण गेलीं कित्येक वर्षं जागी करण्याचं मी टाळीत होतें तिनं माझ्यावर झडप घातली होती.

खाणावळकरणीनं त्याचं नांव सांगितलं त्याच क्षणीं मला वाटलं, कांहीं तरी माझ्यांत उसळी मारीत आहे. जें गहनांतलं गहन रहस्य माणूस हट्टानं स्वतःपासून देखील दडवून ठेवतो, व्हियेन्नाचा प्रो. फ्रॉइड म्हणतो त्याप्रमाणं जें खरोखर वर्षानुवर्षं मीं अंतःकरणाच्या खोलांतल्या खोल तळाशीं गाडून ठेवलं होतं, ज्याची स्मरण करण्याची मला बिलकुल इच्छा नव्हती, तें माझं परमगुह्य आज असं उसळी मारीत होतं. हें परमगुह्य त्या वेळीं मीं तुझ्यापासून देखील लपवून ठेवलं. ज्या तुला त्याच्याविषयींचं सगळं कांहीं सांगण्याचं शपथपूर्वक वचन दिलं होतं मीं, त्या तुझ्यापासून देखील कित्येक वर्षांपर्यंत मी माझ्यापासून देखील लपविलं होतं तें. अकस्मात् तें प्रकट झालं आणि माझ्याजवळ आलं. आणि आज, असला वेडेपणा करण्याची पाळी जेव्हां आमच्या मुलांची आणि कांहीं वर्षांनीं आमच्या नातवंडांची आहे, तेव्हां त्या माणसाच्या आणि माझ्यामध्यें त्या काळीं काय घडलं तें तुझ्याशीं मला उघड करतां येत आहे!








आज हें परमरहस्य मी तुला निःशंकपणें सांगूं शकतें आहे. हेलेन, अशा खालावलेल्या, ढांसळलेल्या, म्हातारा झालेल्या, वीरच्या एका पेल्यासाठीं शेतकऱ्यांना कविता म्हणून दाखवणाऱ्या, आणि त्यांच्या उपहासाचा व चेष्टेचा विषय झालेल्या या अज्ञात, अप्रसिद्ध नटाच्या हातीं एका भयंकर क्षणीं माझं सारं जीवन सोंपवलं गेलं होतं. केवळ त्याच्यावर, त्याच्या इच्छेवर तें अवलंबून होतं. त्याला हवं असतं, तर आजचीं माझीं मुलं जन्माला आलीं नसतीं. आज मी कुठं असतें आणि माझं काय झालं असतं हें कांहीं मला सांगतां येत नाहीं. जी मी आज तुला एक स्त्री, एक मैत्रीण म्हणून हें पत्र लिहीत आहें ती त्याच्याप्रमाणंच जीवनानं पायदळीं तुडवलेली एक अभागिनी ठरलें असतें कदाचित्. कृपा करून हें अतिरंजन असं समजूं नकोस. ज्या संकटांत मीं स्वतःला लोटलं होतं त्याची त्या प्रसंगीं माझी मलाच कल्पना नव्हती. पण त्या वेळीं जें मला कळलं नाहीं तें आज मला स्पष्ट कळत आहे आणि धडधडीत दिसत आहे. त्या विस्मृत माणसाचं केवढं मोठं ऋण माझ्यावर आहे याची आतां कुठं मला जाणीव होत आहे !

जितक्या चांगल्या तऱ्हेनं सांगतां येईल तितक्या चांगल्या तऱ्हेनं मी ती गोष्ट तुला सांगतें. तुला सोळा वर्षे पुरीं होण्याच्या कांहीं दिवस आधीं तुझ्या वडलांची इन्स्ब्रकहून बदली झाली होती हें आठवतं ना तुला ? त्या वेळीं हताश झालेली अशी तूं माझ्या खोलींत आलीस आणि स्फुंदत स्फुंदत मला आणि त्याला सोडून जावं लागत आहे असं मला म्हणालीस. अजून तशी तूं दिसते आहेस मला. त्यांपैकीं कोणती गोष्ट तुला अधिक कष्टमय वाटत होती, मला माहीत नाहीं. तथापि मला वाटतं कीं आपल्या यौवनांतल्या उपास्याचं दर्शन आतां यापुढं होणं शक्य नाहीं आणि त्याच्याशिवाय जगण्यांत स्वारस्य नाहीं ही वेदनाच तुला अधिक असह्य झाली होती. त्या वेळीं मीं तुला वचन दिलं कीं त्याची बारीकसारीक खबर देऊन दर आठवड्याला—नव्हे रोज—त्याच्या संपूर्ण दिनक्रमाचं पत्र मी तुला धाडीत जाईन आणि तें वचन बराच काळ मी इमानेंइतबारें पाळलं देखील. तुला गमावणं मलाहि अत्यंत क्लेशकारक झालं होतं. यापुढं मी माझं मन कुणाशीं मोकळं करणार होतें ? ते वेडे उमाळे आणि आमच्या उन्मादाच्या त्या गोड गोड भिंगऱ्या कुणाला सांगणार होतें मी ? पण त्या मनोव्यथेंत देखील तो अजून मजजवळ आहे, मी त्याला पाहूं शकतें, तो सर्वस्वी माझा आहे ही कल्पना मला सुख देत होती. त्यानंतर थोड्याच दिवसांनीं जो प्रसंग घडला तो आठवत असेल तुला. त्याची त्यावेळीं आपल्याला अस्पष्टच कल्पना होती. लोक बोलत होते कीं स्टर्ज डायरेक्टरच्या पत्नीशीं भ्रमरालाप करीत होता— निदान मला तरी ही गोष्ट पुढें अशी कळली आणि म्हणून प्रकरण एकदांचं हातघाईवर येऊन गेल्यावर त्याला नोकरी सोडणं भाग झालं. तरीहि त्याच्या इभ्रतीसाठीं त्याला शेवटच्या खेळांत काम करूं देण्यात आलं. आपल्या थिएटरांत आणखी एकदां तो काम करणार आहे तेव्हां आतां हेंच कदाचित त्याचें शेवटचें दर्शन व्हायचं असं मला वाटलं.

पीटर स्टर्ज आपलं अखेरचं काम करणार आहे हें ज्या दिवशीं जाहीर झालं तो दिवस माझ्या आयुष्यांत अत्यंत दुर्भाग्याचा गेला असं आज विचार केला म्हणजे वाटतं. मला आजारी वाटूं लागलं. माझ्या मनस्तापांत वांटेकरी होणारं कुणीच नव्हतं. मनाची तळमळ बोलून दाखवायला जिवाचं माणूस नव्हतं. माझी चर्या कशी उतरली आहे आणि मी कशी अस्वस्थ झालें आहें हें शाळेंतल्या शिक्षकांच्या ध्यानांत आलें होतें. घरांत मी पावलोपावलीं चिडत होतें आणि एकेरीवर येत होतें. माझ्या वडलांना माझ्या या मनःस्थितीचा मुळींच दाद-पत्ता नव्हता. त्यामुळं माझ्या या वर्तनानं ते इतके संतापले कीं मला शिक्षा करण्यासाठीं नाटकाला जाण्याची त्यांनीं मला बंदी केली. इतक्या आवेशानं आणि आग्रहानं मीं त्यांचीं आर्जवें केलीं कीं परिस्थिति जास्तच विकोपाला गेली आणि त्याचमुळें आईदेखील माझ्या विरुद्ध गेली आणि म्हणाली कीं, फारदां नाटकाला गेल्यामुळं मी चिडखोर झालें आहे; तेव्हां आज मी घरींच राहिलें पाहिजे. त्या दिवशीं माझ्या भावना इतक्या भडकल्या होत्या—मी त्यां दोघांचाहि द्वेष करूं लागलें. त्यांचं दर्शन देखील मला असह्य










झालं. मीं स्वतःला खोलींत कोंडून घेतलं. जीव द्यावा असं मला वाटूं लागलं. आकस्मिक आणि भयंकर अशा वैतागानं माझ्या मनाचा कबजा घेतला. असल्या गोष्टींचं तरुण वयांत भलतं पर्यवसान होऊं शकतं. मी माझ्या खुर्चींत ताठ बसून राहिलें. डोळ्यांवाटें एक टिपूस निघूं दिलं नाहीं. माझ्या जिवाचा असा कांहीं संताप झाला होता कीं माझे सारे अश्रू कुठल्याकुठं आटून गेले होते. माझं सर्वांग थंडगार पडलं आणि नंतर अकस्मात् मला ताप भरला असं मला वाटलं. मी या भिंतीकडून त्या भिंतीकडे आणि या खोलीकडून दुसऱ्या खोलीकडे पळत सुटलें. मीं खिडक्या लोटून दिल्या आणि खालीं अंगणांत नजर टाकली. उंची मोजली. ती तीन मजल्यांची होती. मला वाटलं, वरून उडी टाकावी. मधूनमधून मी घड्याळाकडे पहात होतें. फक्त तीनच वाजले होते आणि साताला खेळ सुरू व्हायचा होता. तो आज अखेरचं काम करणार आणि पुढें बघायला मिळायचा नाहीं. अकस्मात् माझा संयम पार उडाला. घराबाहेर पडायची बंदी होती त्याची दिक्कत मला वाटेनाशी झाली. कुणाला कांहीं न सांगतां धडधड पायऱ्या उतरून मी पळालें आणि रस्त्यावर येऊन पोंचलें. कुठं जावं हें मला कळेना. बुडून मरण्याची किंवा असाच दुसरा कसला तरी वेडेपणा करण्याची अस्पष्ट कांहीं तरी कल्पना घेऊन गेलें होतें मी, अशी माझी समजूत आहे. त्याच्याखेरीज मला मुळींच जगायचं नव्हतं आणि मरायचं कसं हें ठाऊक नव्हतं. अशा स्थितींत रस्त्याचे चढ-उतार मी पायांखालीं घालीत चालत होतें. वाटेंत ओळखीच्या लोकांनीं अभिवादन केलं पण त्यांना प्रत्युत्तर न देतां तशीच चालत राहिलें. त्याच्याशिवाय अन्य कुणांतहि मला आस्था राहिली नव्हती. माझ्या जगांत त्यांना जागा नव्हती. अकस्मात्—कसं कुणाला माहीत—मी त्याच्या घरापुढं आहे असं मला आढळून आलं. अनेकदा आपण याच घरीं समोरच्या घराच्या दाराच्या आडोशाला राहून त्याच्या येण्याची वाट पहात होतों किंवा खिडक्यांकडे डोळे लावीत होतों. पुन्हा एकदां त्याच्या दर्शनाचं सद्भाग्य मला लाभेल या अंधुक आशेनं अभावितपणें मला इथं ओढून आणलं असावं कदाचित्. पण तो दिसला नाहीं. पोस्टमन, सुतार, लठ्ठेली फळवालीबाई अशीं किती तरी माणसं घरांतून बाहेर येतांना किंवा आंत जातांना दिसत. पण मला त्याचं कसलंच शुद्धाशुद्ध नव्हतं. माझ्या दृष्टीनं असून नसल्यासारखे असे शेंकडों मनुष्यप्राणी रस्त्यांत लगबगीनं माझ्या जवळून जात होते. तो तेवढा दिसला नाहीं....

तेव्हां काय घडलं तें मला माहीत नाहीं. अकस्मात् मी झपाटल्यासारखी झालें. मीं रस्ता ओलांडला, एका दमात त्याच्या घराचे दोन जिने पालथे घातले आणि मी त्याच्या दाराशीं येऊन ठेपलें. मला फक्त त्याच्याजवळ अगदीं जवळ असायला, त्याला तसंच कांहीं तरी सांगायला हवं होतं. पण तें काय याची मला जाणीव नव्हती. खरोखर ती सारी घटना अशा उन्मादाच्या—वेडाच्या अवस्थेंत घडून गेली होती कीं त्याचा मला कधींच बोध झाला नाहीं. मी जी अशी जलदीनें पायऱ्या चढून गेलें तें कदाचित् सारे संकोच तुडवून जाण्यासाठीं असेल. मीं अजून श्वास घेतला नव्हता. तरीहि आतां घंटा वाजूं लागली होती. अजून देखील तो तीव्र भेदक आवाज मला ऐकूं येत आहे आणि त्यानंतरच्या त्या दीर्घ आणि संपूर्ण निःस्तब्धतेची आठवण होत आहे. त्या वेळीं माझी छाती धडधड उडत होती नुसती. शेवटीं एकदांचीं तीं वजनदार, निश्चित आणि नाट्यपूर्ण पावलं मला ऐकूं आलीं. नाटकामुळं माझ्या चांगल्या परिचयाचीं झालीं होतीं तीं. त्या क्षणीं मी भानावर आलें. मला वाटलं, तसाच दारांतून पळ काढावा. पण भीतीनं माझ्या सगळ्या गात्रांचा गोळागोठा झाला होता. माझे पाय पांगळे पडले होते आणि माझं चिमणं अंतःकरण हलायला कबूल नव्हतं.

त्यानं दार उघडलं आणि विस्मयचकित होऊन मजकडे पाहिलं. वेगवेगळ्या प्रकारांनीं त्याजविषयींचा आपला उत्साह दर्शवून त्याला चाहणारे अनेक कुमार आणि कुमारिका नेहमीं त्याच्या भोंवतीं गर्दी करीत असत. तथापि त्याच्यावर जास्तींत जास्त प्रेम करणाऱ्या आपण दोघीहि संकोची स्वभावामुळं नेहमींच त्याची नजर चुकवीत असूं.










त्या क्षणींहि माझी मान खालीं झुकली. डोळा वर करून त्याच्याकडे पहाण्याचा मला धीर होईना. मीं कसला निरोप आणला आहे याची तो वाट पाहूं लागला. आपल्यासाठीं कसला तरी निरोप घेऊन आलेली ही एखाद्या दुकानांतली पोरगी असावी अशी खास त्याची कल्पना झाली असावी.

'—मुली, काय हवंय् तुला ?'—शेवटीं त्यानं विचारलं.

त्याच्या धीरगंभीर आणि झंकारमय आवाजामुळं मला थोडं अवसान आलं.

चांचरत मीं म्हटलं,

'—मला एवढंच सांगायचं होतं......पण तें मला इथं सांगतां यायचं नाहीं...'

—आणि पुन्हां माझी वाचा बसली.

'ठीक, अशी आंत ये मुली. काय हवंय् तुला ?' गोडपणानं तो पुटपुटला.

त्याच्या मागोमाग मी त्याच्या खोलींत गेलें. खोली प्रशस्त पण साधीच होती आणि तिच्यांत अव्यवस्था भरपूर होती. भिंतींवरची चित्रं काढण्यांत आलीं होतीं आणि अर्ध्याअधिक सामानाची बांधाबांध होऊन गेली होती.

'—आतां बोल...तुला इकडे कुणी पाठविलं ?' त्यानं पुन्हां विचारलं.

अकस्मात् जळतीं आसवं माझ्या डोळ्यांत गोळा झालीं आणि आर्जवाचे शब्द माझ्या तोंडून बाहेर पडले.

'—कृपा करून इथंच रहा...कृपा करून इथून जाऊं नका...असे आमच्याचजवळ रहा.'

नकळत तो पाऊल मागं हटला. त्याच्या भिंवया किंचित् वर चढल्या आणि त्याच्या जिवणीचे कोपरे जास्त स्पष्ट झाले. उगीच वेळ खाऊन डोकं उठविणाऱ्या कलावडया पोरींपैकींच मीही एक आहे असं त्याला वाटलं असावं अशी माझी समजूत झाली आणि आतां तो आपणांला कठोरपणानं वागवणार अशा शंकेनं मी भयभीत झालें. तथापि माझ्या बालिश हताशपणाची दया यावी असं माझ्यांत त्याला कांहीं तरी आढळलं असावं खास. माझ्याजवळ येऊन माझा दंड कुरवाळीत कोमलपणानं त्यानं म्हटलं,

'—प्रेमळ मुली',—गुरुजीनं मुलाशीं बोलावं तसा तो बोलत होता—'माझं जाणं माझ्या हातचं नाहीं. आणि आतां त्यावर कांहीं इलाज नाहीं. तूं हें मला सांगायला यावंस हा मोठाच लोभ आहे. आमची नाट्याची सेवा ती तुम्हां तरुणांसाठीं नाहीं तर कुणासाठीं ? तरुणांची सहानुभूति मिळणं हाच नेहमीं मी माझा सर्वश्रेष्ठ आनंद मानीत आलों. पण फांसा टाकला गेला आहे, आतां तो उलटा करणं शक्य नाहीं. तूं हें मला सांगायला आलीस हा मी मघाशीं म्हटल्याप्रमाणें मोठाच अनुग्रह समजतों. मी आभारी आहे तुझा.' असं बोलतांना तो पुन्हां एकदां एक पाऊल मागं हटला. तो पुढं म्हणाला, 'असाच माझ्यावर लोभ ठेवीत जा आणि तुम्हां सगळ्यांना माझी एकादी गोड आठवण उरूं द्या.'

त्यानं मला निरोप दिला हें माझ्या लक्षांत आलं पण अगदीं त्याच वेळीं माझी निराशा विकोपाला गेली. 'नका—जाऊं नका देवाखातर इथून जाऊं नका. तुमच्याशिवाय मला जगतां यायचं नाहीं.' स्फुंदत स्फुंदत मीं म्हणालें. 'भल्या मुली' मला शांत करण्यासाठीं तो म्हणाला.

पण मीं त्याला घट्ट धरलं. ज्या मला त्याच्या कोटाला देखील स्पर्श करण्याचा कधीं धीर झाला नाहीं त्याचं मी त्याला दोन्ही हातांनीं घट्ट धरलं.

'नका. इथून जाऊं नका.'—टाव सुटून मी रडत होतें—'मला अशी एकटी टाकूं नका. मला घेऊन जा आपल्या बरोबर, तुम्हांला पाहिजे तिथं. कुठंहि मी तुम्हांला सोबत करीन. माझं काय वाटेल ते करा... तुम्हीं मला सोडून जाऊं नये एवढंच हवंय मला.'

त्या निराशेच्या उद्वेगांत मी आणखी कोणकोणत्या खुळ्या गोष्टी बोललें ईश्वराला माहीत. मी घट्ट त्याला चिकटून राहिलें. म्हटलं त्यामुळं तरी त्याला थांबवून ठेवतां येईल. पण अशा विकारवेड्या समर्पणानं मी केवढा धोका पत्करित होतें याची मला यत्किंचिताहि कल्पना नव्हती. आपण त्या वेळीं किती भाबड्या होतों आणि शारीरिक प्रीतीची कल्पना आपणांला किती अपरिचित आणि परकी होती हें तुला माहीतच आहे. मी एक तरुण मुलगी होतें आणि आज










# उशीरां फेडलेलें ऋण

मी म्हणूं शकतें कीं चांगलीच सुंदर मुलगी होतें. इतकीं कीं रस्त्यांत पुरुष माझ्यावरची नजर काढीत नसत. आणि तो सदतीस-अडतीस वर्षांचा पुरुष होता. त्याची इच्छा असती तर त्याला माझं काय वाटेल तें करतां आलं असतं. निःसंशय मी त्याच्या बरोबर गेलें असतें. त्याच्या कोणत्याहि इच्छेला मीं हरकत घेतली नसती. माझ्या अविवेकाचा फायदा घेणें हें त्या क्षणीं त्याला अत्यंत सोपं होतं. त्या वेळीं माझं सारं भवितव्य त्याच्या हातांत होतं. माझ्या या बालिश उन्मादाचा जर त्यानं हलकटपणानं फायदा घेतला असता, किंवा स्वतःच्या अहंकाराला, वासनेला किंवा मोहाला तो बळी गेला असता तर माझं काय झालं असतं कुणास माहीत ? कसल्या संकटांत मीं स्वतःला घालून घेतलं होतं हें आज कुठं माझ्या लक्षांत येत आहे ! आतां कळतं कीं एक क्षण त्याचं चित्त द्विधा झालं. माझा देह त्याला बिलगला होता आणि माझे थरथरणारे ओंठ त्याच्या ओंठाशीं अगदीं जवळ होते त्यावेळचा तो क्षण होता. पण त्यानं स्वतःला आवरलं आणि हळूच तो दूर झाला. —'किल्चर बाई, जरा इकडे या' विळखा जोरानें सोडवून आणि दुसऱ्या दाराकडे जाऊन तो म्हणाला.

मला धडकी भरली. मला वाटलं तसाच पळ काढावा. ही म्हातारी घरवाली त्याच्या पुढं माझी धिंड काढायची कदाचित्. असा विचार माझ्या मनांत येत आहे तोंच ती आंत आली. तेव्हां तो तिला म्हणाला—

'किल्चरबाई, पाहिलीत किती गोड आहे ही मुलगी ! आपल्या शाळेच्या वतीनं हार्दिक निरोप द्यायला आली आहे मला. सद्गदित करणारी गोष्ट आहे. नाहीं ?'—नंतर माझ्याकडं वळून तो म्हणाला—'सगळ्यांना माझे मनस्वी आभार कळवा बरं. या जगांत सगळ्यांत चांगली गोष्ट जर कोणती असेल तर ती तरुणांनीं केलेली [illegible]..मा[illegible] आणि हेंच आमच्या पेशाचं खरं भाग्य[illegible] मीं नेहमींच मानलं. सौंदर्याचं चीज तरु[illegible] तरुणांनाच. मुली, तूं मला आज प[illegible]ल्या शेतक[illegible]धान दिलं आहेस'—त्यानं माझे हात [illegible]त ते आदरानें [illegible]णि म्हटलं, "मी हा तुझा लोभ क[illegible]रमिंदे झालेले दिर[illegible]."

माझीं आंसवं थांबलीं. त्यानं माझा पाणउतारा केला नाहीं. मला खालीं मान घालायला लावलं नाहीं. पण इतक्यानं त्याचा चांगुलपणा संपला नाहीं. कारण घरवालीकडे वळून तो म्हणाला—'आपणाला हीं इतकीं कामं आवरायचीं नसतीं तर या गोड मुलीशीं बराच वेळ बोलत रहाणं आवडलं असतं मला. तरीहि खालीं दारापर्यंत तिला सोबत करा-मुखानं रहा बरं......'

घरवालीला दारापर्यंत मला सोबत करायला लावून त्यानं माझ्या बाबतींत कोणती काळजी घेतली, मला कसं सांभाळलं आणि कसं पाठीशीं घातलें, हें मला बरेंच उशीरां समजलें. शहरांत मी सगळ्यांच्या ओळखीची होतें. माझ्यासारख्या एका तरुणीला एका प्रसिद्ध नटाच्या घरांतून एकटीच बाहेर पडतांना एकाद्या कुटाळ माणसानं पाहिलं असतं तर त्यानं पराचा कावळा करून गांव भरला असता ! या अपरिचित माणसानं मला काय घातक आहे ही मला मुलीला माहीत नसलेली गोष्ट जाणली होती. माझ्या अप्रबुद्ध तारुण्यापासून त्यानं माझं संरक्षण केलं होतं. या प्रसंगाची मला पुरती कल्पना यायला आणखी पंचवीस वर्षे गुदरावीं लागलीं. इतकीं वर्षे मीं हें सारं विसरून जावं—नव्हे शरमल्यागत मी मुद्दाम त्याचा विसर पाडून घ्यावा हें चमत्कारिक, लज्जास्पद नाहीं काय ? ज्या या माणसाच्या हातांत त्या संध्याकाळीं माझं सारं जीवन, माझं सारं भवितव्य होतं त्याचे अंतर्यामीं मीं कधीं उपकार मानले नाहींत किंवा त्याची कधीं विचारपूस केली नाहीं, ही शरमेची गोष्ट नाहीं काय ? आणि हाच माणूस बुडत्या, उपहसित आणि लाचार अवस्थेंत बीरचा पेला जवळ घेऊन खालीं बसलेला होता आणि तिथं माझ्याशिवाय कुणालाच तो कोण आहे आणि कोण होऊन गेला याचा पत्ता नव्हता. मलाच तेवढं हें माहीत होतं. त्याच्या नांवाची आठवण असलेली या जगाच्या पाठीवर मीच काय ती एक होतें आणि त्याचं ऋण लागत होतें. आतां कदाचित् तें फेडतां येईल ! या विचारासरशीं मला अकस्मात् शांति आली. आतां माझं भय राहिलं नव्हतं. माझ्या आयुष्याच्या एका आणीबाणीच्या वेळीं जो हा अपरिचित माणूस माझ्याशीं इतक्या उदारतेनं वागला,



अनुक्रमणिका

त्याला इतका काळ विसरून जाऊन आपण अन्याय केला या जाणिवेनं मला थोडं शरमल्यासारखं झालं.

पायऱ्या उतरून मी खाणावळीच्या दिवाणखान्यांत येऊं लागलें. फार तर दहा मिनिटं गुदरलीं असतील. बाल्कनीजवळ खाणावळकरीण शिवीत बसली होती. पेंगुळलेल्या डोळ्यांचे शेतकरी चिलीम ओढीत होते. तोहि आपल्या जागीं रिकामा पेला घेऊन मग्न दृष्टीनं तसाच निश्चल बसला होता. त्या विरूप चेहऱ्यांत केवढा विषाद भरलेला आहे हें फक्त तेव्हांच मला समजलं. त्याच्या डोळ्यांत थकवा दिसत होता. आणि वातानं वांकड्या झालेल्या तोंडामुळं चर्या कडवट दिसत होती. थकव्यामुळं पुढं झुकलेलं मस्तक सांवरण्यासाठीं कोपर मेजावर टेकून तो निर्विकारपणें बसला होता. पण हा झोपेमुळें आलेला थकवा नव्हता, तर जगण्याचा कंटाळा आलेल्या माणसाचा थकवा होता. कोणी त्याच्याशीं बोलत नव्हता. कोणी त्याची दाद घेत नव्हता. एकाद्या राखिया रंगाच्या, पिसं गळालेल्या, मोठ्या पक्ष्यानं अंग दुमडून पिंजऱ्याच्या काळोखांत फांकलेल्या पखांनीं आकाश व्यापण्याच्या आशेनं आपल्या एकेकाळच्या स्वातंत्र्याचीं स्वप्नें पहात बसावं तसा तो तेथें बसला होता.

पुन्हां एकदां दार उघडलं आणि तीन शेतकरी जड, ओढगस्त पावलांनीं आंत आले. त्यांनीं बीर मागवली. आणि जागा शोधण्यासाठीं सभोंवतालीं पाहूं लागले,

'ऊठ, जा तिकडे'— त्यांतला एकटा बोलला. ज्या तुच्छतेनं ते लोक त्याला वागवीत होते, तिनं त्याचा अपमान झाला होता हें मीं पाहिलं. पण तो आतां इतका थकला होता आणि इतका लाचार झाला होता कीं त्याला भांडण्याचं किंवा स्वसमर्थन करण्याचं त्राण राहिलं नव्हतं. कांहीं न बोलतां तो आपला रिकामा पेला घेऊन बाजूला झाला. खाणावळकरणीनं इतर गिऱ्हाइकांपुढें भरलेले पेले आणून ठेवले. त्यानें तान्हेल्या आणि अधाशी नजरेनं त्या पेल्यांकडे पाहिलं, हें माझ्या लक्षांत आलं. पण तिनें त्या मूक याचनेची दखल घेतली नाहीं. त्याला त्याची भिक्षा मिळाली होती. आतां तो निघून जात नसला तर तो त्याचा दोष होता. आणखी टिकाव धरण्याइतकी शक्ति त्याच्या ठिकाणीं राहिली नव्हती हें मीं ओळखलं होतं. वार्धक्यानं बिचाऱ्यासाठीं आणखी कोणकोणती अवहेलना अजून राखून ठेवली होती....

शेवटीं त्याची सुटका करण्याची कल्पना मला सुचली. त्याला खरंखुरं साहाय्य मला देतां येणार नव्हतं हें मला पुरेपूर माहीत होतं. त्या खंगलेल्या मोडक्या माणसाला पुन्हां तरुण करणं मला शक्य नव्हतं. मृत्यूचा लवकरच त्याच्यावर हात पडणार होता. तेव्हां आयुष्याचे त्याचे जे थोडे महिने राहिले असतील तेवढ्या काळांत तरी या तुच्छतेच्या जाचांतून त्याची थोडी सुटका करावी आणि त्या दूरस्थ गांवांत त्याला थोडं महत्त्व मिळवून द्यावं—निदान तसा प्रयत्न करावा असं मला वाटलं.

मी उठलें आणि शेतकऱ्यांमधें तो चेपून बसला होता त्या मेजाशीं शिष्टाचारपूर्वक जाऊं लागलें. मी जवळ येत आहे असं पाहून ते शेतकरी माझ्याकडे टकमक पाहूं लाग..

'—दरबारी नट स्टर्ज याच्याशींच का बोलायचं भाग्य मिळतंयू मला ?' मी विचारलं.

तो चमकला. जणूं काय विजेच्या धक्क्यानं त्याचं सर्वांग व्यापलं होतं. त्याची पडलेली डावी पापणी देखील वर झाली. तो माझ्याकडे टक लावून पाहूं लागला. जें नांव तिथं कुणाला माहीत नव्हतं आणि त्याच्याखेरीज बाकी सारे जे केव्हांच विसरून गेले होते त्या त्याच्या जुन्या नांवानं कुणी तरी त्याला संबोधलं होतं, एवढंच नव्हे तर दरबारी नट होण्याचं कधीं त्याच्या वांट्याला आलेलं नसतांना तशा तऱ्हेनं त्याचा उल्लेख देखील केला होता! त्याला एवढं मोठं आश्चर्य झालं होतं कीं त्याला जागेवरून उठतां येईना. अमळशानं त्याची दृष्टि शंकित झाली. त्याच्या मनांत विचार आला, हा देखील थट्टेचाच बनाव असेल कदाचित्.

'—निःसंशय...हेंच माझं नांव...हेंच नांव होतं माझं.'

मीं माझा ... धोका केला.

'वा! मोठ्... नव्हती.—मोठ्या भाग्याची गोष्ट!' मुद्दामच मी ... आणि शारीर...लें. या वेळीं असं बेधडक खोटं बोला... अपरिचित आ... कारण त्याशिवाय त्या लोकांत त्य... मी एक तरुण मुल... नसती.



अनुक्रमणिका








"—तुमचं काम पहाण्याचा सुयोग मला कधीं लाभला नाहीं. पण माझे पतिराज अनेकदां तुमच्याविषयीं मजजवळ बोलले आहेत. जेव्हां ते कॉलेजांत शिकत होते, तेव्हां अनेकदां म्हणे त्यांनीं तुमचं काम पाहिलं आहे. हो. मला वाटतं इन्स्त्रकला..."

"—बरोबर इन्सब्रकमधेंच. मी दोन वर्षे तिकडे होतों."

लगेच त्याची मुद्रा उजळूं लागली. मी त्याची थट्टा करीत नाहीं याविषयीं त्याची आतां खात्री झाली होती.

"—नटवर्य, तुम्हांला कल्पनाहि नसेल त्यांनीं मला तुमच्याबद्दल काय काय गोष्टी सांगितल्या आणि मला तुमच्या किती किती गोष्टी माहीत आहेत याची. इथं तुमच्या भेटीचं सद्‌भाग्य मला लाभलं हें मी त्यांना उद्यां लिहिलं तर त्यांना किती हेवा वाटेल माझा! त्यांची तुमच्या ठिकाणीं अजून केवढी भक्ति आहे याची कल्पनाहि नसेल तुम्हांला. 'पोजाचा उमराव' या तुमच्या भूमिकेंतलं तुमचं काम कोणालाहि साधणारं नाहीं. तेव्हढं कशाला? केंजचं देखील आणि मॅक्सीमियन पिकोलोमिनीच्या किंवा लियांद्रुच्या पार्टीत तर तुमचा हात धरणारा कुणी झालाच नाहीं असं ते सांगायचे. केवळ तुमचं काम पहाण्यासाठीं एकदां तें लिप्झिगला देखील जाऊन आले होते. पण त्या वेळीं तुमची ओळख करून घेण्याचं धाडस त्यांना झालं नाहीं. तथापि त्यांनीं तुमचीं त्या काळांतलीं सगळीं छायाचित्रं सांभाळून ठेवलीं आहेत. तीं किती काळजीपूर्वक ठेवण्यांत आलीं आहेत हें पहायला तुम्हांला आमच्याकडे येतां आलं असतं तर किती आवडलं असतं मला! तुमच्याविषयीं अधिक कांहीं ऐकायला मिळालं तर किती आनंद होईल त्यांना. तें तुम्ही मला सांगितलंत तर मोठीच मदत केल्यासारखी होईल तुम्हीं मला. आणि मग मी तें त्यांना खडानूखडा वर्णन करून सांगेन...माझा तुम्हांला उपद्रव होत नसेल तर चला ना, माझ्या मेजाशीं बोलत बसूं आपण..."

त्याच्याजवळ बसलेल्या शेतकऱ्यांनीं नजर वर केली आणि न कळत ते आदरानें बाजूला झाले. ते अस्वस्थ आणि शरमिंदे झालेले दिसले. आतांपर्यंत त्या म्हाताऱ्याला भिकाऱ्यासारखं त्यांनीं वागविलं होतं. केव्हां तरी त्याला एकादा बीरचा पेला द्यावा आणि त्याच्या जिवावर करमणूक करून घ्यावी हीच त्यांची त्याच्याकडे पहाण्याची दृष्टि होती. माझ्यासारख्या अज्ञात व्यक्तीला त्याला आदरानें वागवतांना पाहून पहिल्या प्रथम त्यांच्या मनांत अशी अस्वास्थ्यकारक शंका उद्‌भवली कीं हा कुणी तरी प्रसिद्ध आणि जगांत लौकिक असलेला माणूस आहे. त्याचं संभाषण हा मजवर एक मोठा अनुग्रह आहे असं भासविण्यासाठीं मी स्वरांत जी मुद्दाम लीनता आणली होती त्याचा त्यांच्यावर परिणाम झाला. त्याच्याजवळ बसलेल्या शेतकऱ्यानें त्याला म्हटलं, 'चला, जा ना.'

झोपेंतून उठल्याप्रमाणें डळमळत डळमळत तो उठला.

"—तर तर—मोठ्या आनंदानं...मोठ्या आनंदानं—" तो चांचरत उद्गारला.

आपल्या उत्साहाचा उमाळा तो किती कष्टानं आवरीत आहे आणि असली चहा आणि असल्या विनंत्या आपल्या बाबतींत रोजच्या सामान्य गोष्टी आहेत असें भासविण्यासाठीं आणि तो उत्साह बाहेर इतरांना दिसूं न देण्यासाठीं तो म्हातारा नट जिवाचा कसा आटापिटा करीत आहे तें मीं हेरलं होतं. आपल्या नटाच्या धंद्यांत पढलेल्या ऐटीनं तो सावकाश टेबलाशीं गेला.

मीं मोठ्या आवाजांत खाणावळकरणीला म्हटलं, "या दरबारी नटाच्या सन्मानार्थ एक दारूची—उत्कृष्ट दारूची बाटली आणा बरं."

जे खेळत होते त्यांनीं आतां नजर वर केली आणि ते एकमेकांत कुजबुजं लागले—'हं, हा स्टेंटलर, दरबारी नट अन् एवढा नामांकित माणूस काय? एवढ्या मोठ्या शहरांत आलेली ही अनोळखी बाई जर अशी याला ओळखते आहे तर तशाच महत्त्वाचा हा माणूस असला पाहिजे.' आतां त्या म्हाताऱ्या खाणावळकरणीनं पेला त्याच्यापुढं ठेवला तो अगदीं निराळ्या पद्धतीनं, अत्यंत अदबीनं.

एक तास त्याच्याबरोबर मोठ्या मजेंत गेला. मला त्याच्याविषयीं माहीत असलेल्या सगळ्या








गोष्टी मीं त्याला सांगितल्या. मात्र त्या मला माझ्या नवऱ्यानं सांगितल्या आहेत असं ढोंग करून. त्यानं केलेल्या एकूणएक भूमिका, त्याच्याविषयीं आलेल्या सगळ्या टीका आणि त्या लिहिणाऱ्या सगळ्यांचीं नांवं मला माहीत असलेलीं पाहून त्याला इतकं आश्चर्य वाटलं, कीं तें त्याला लपवतां येईना. आणि एका खेळांत मोआसी, सुप्रसिद्ध मोआसी एकटा रंगभूमीवर यायला तयार होईना, त्यानें त्याला बरोबर यायला भाग पाडलं आणि त्याच रात्रीं भावाप्रमाणं आपल्याशीं 'अरेतुरे' म्हणून बोलायची गळ घातली ही गोष्ट ज्या वेळीं माझ्या तोंडून त्यानें ऐकली तेव्हां तर आश्चर्याला सीमा राहिली नाहीं. स्वप्नांतून उठल्यासारखा तो वरचेवर आश्चर्योद्गार काढीत होता—

"हें सुद्धां ठाऊक आहे तुम्हाला अं!" इतके दिवस आपण विस्मृतींत पडलों आहों, गाडले गेलों आहोंत असं त्याला वाटत होतं. कुणाच्या तरी हातून आपल्या शवपेटीवरचं झांकण उडालं, आपण तिच्यांतून बाहेर काढले गेलों आणि प्रत्यक्षांत कधीं न लाभलेलं कीर्तीचं इंद्रजाल आपणांला प्राप्त झालं असं त्या वेळीं त्याला वाटलं आणि मनाला वंचना नेहमींच प्रिय असल्यामुळें थोरामोठ्यांत आपल्याला एवढा नांवलौकिक आहे ही गोष्ट त्यानें खुशाल खरी मानली. मुळींसुद्धां शंका घेतली नाहीं. —"हं ही गोष्ट देखील तुम्हांला माहीत आहे ना! मला देखील विसर पडला होता तिचा" तो पुन्हां पुन्हां पुटपुटत होता.

आपली भावना लपवणं त्याला मोठं कष्टप्रद जात होतं. हें मीं पाहिलं. दोनतीनदां त्यानं खिशांतून आपला मळका आणि भलामोठा हातरुमाल काढला आणि घाम पुसण्यासाठीं म्हणून त्यानं तोंड बाजूला वळाविलें; पण त्याचें खरं कारण असं होतं कीं आपल्या सुरकुतलेल्या गालांवरून ओघळणारीं आंसवं त्याला घाईघाईनं पुसून घ्यावयाचीं होतीं. मरायच्यापूर्वीं आणखी एकदां त्या वृद्ध, जर्जर जीवाला सुख झालेलं पाहून माझं हृदय भरून आलं.

याप्रमाणं अकरा वाजेपर्यंत कांहींशा भारावलेल्या अवस्थेंत आम्ही दोघं बोलत बसलों होतों. तोंच स्थानिक पोलिस अधिकाऱ्यानं दूर अत्यंत शालीनपणानें आणि सौष्ठवानें दारें बंद करण्याची वेळ झाली असल्याची समज दिली. तो म्हातारा चमकलेला दिसला. हा स्वर्गीय चमत्कार आतां आटोपता घ्यायचा? आपल्या भूतकाळाचं पारायण करीत आपल्या विषयींचं बोलणं असं तासन्तास बसून ऐकत रहाणं त्याला किती सुखाचं वाटत होतं! पण ही जी समज मिळाली होती त्यामुळं मला बरं वाटलं. शेवटीं त्याला सगळ्या वस्तुस्थितीचा उलगडा होईल अशी आतां मला धास्ती वाटूं लागली होती. तेव्हां मीं इतर गिऱ्हाइकांना उद्देशून म्हटलं,

"——मला वाटतं आपण या थोर नटाला त्याच्या घरापर्यंत सोबत कराल."

"——मोठ्या आनंदानें!" एकदम सगळे म्हणाले.

एकानं मोठ्या अदबीनं त्याची जीर्ण हॅट त्याला काढून दिली आणि दुसऱ्यानं त्याला उभं रहाण्यासाठीं हात दिला. एके काळीं ज्या या माणसामुळें आपणांला इतक्या सुखसंवेदना आणि इतक्या वेदना प्राप्त झाल्या त्या या गरीब बिचाऱ्या म्हाताऱ्याचा यापुढं कधींच कोणी उपहास करणार नाहीं, चेष्टा करणार नाहीं, त्रास देणार नाहीं याविषयीं माझी खात्री झाली. निरोप घेतांना मोठ्या कष्टानें त्यानं आणलेला रुबाब त्याला सोडून गेला होता, भावनेनं त्याच्यावर विजय मिळविला होता आणि मन आवरणं त्याला अशक्य झालं होतं. अकस्मात् त्याच्या थकलेल्या आणि सुस्तावलेल्या डोळ्यांतून टपोरीं आंसवं घळघळ वाहूं लागलीं आणि माझ्याशीं हस्तांदोलन करतांना त्याचीं बोटं थरथर कांपूं लागलीं.

"बाई, तुमच्या चांगुलपणाचे मी कोणत्या शब्दांत आभार मानूं? तुमच्या यजमानांना मुद्दाम माझं स्मरण द्या आणि सांगा कीं म्हातारा स्टर्ज अजून जिवंत आहे. कदाचित् अजून देखील एखादा दिवस मला रंगभूमीवर येतां येईल. कुणी सांगावं, माझी ही ढांसळलेली प्रकृति सुधारेलहि कदाचित्!"

दोघांनीं दोन बाजूंनीं त्याला आधार दिला. तरीहि तो ताठ चालत होता. त्या मोडक्या माणसांत आतां एक नवीनच ऐट आली होती आणि त्यामुळं त्याची चाल ताठ झाली होती. त्याचा आवाजहि आतां पूर्वींचा राहिला नव्हता. त्यांतहि असाच ऐटबाज झोंक आला होता. ज्याप्रमाणं







# उशीरां फेडलेलें ऋण

माझ्या आयुष्याच्या सुरुवातीला त्यानं मला मदत केली तशीच मदत या त्याच्या आयुष्याच्या अखेरीला मला त्याला देतां आली होती. मी त्याचं तें ऋण आज फेडलं होतं.

ती डोंगराळ हवा ह्या माझ्या प्रकृतीला फार उद्दीपक होती अशी सबब सांगून मला आतां इथं थांबणं शक्य नाहीं अशी दुसऱ्याच दिवशीं मी त्या खाणावळकरीणबाईशीं मखलाशी केली. यापुढं ज्या ज्या वेळीं तो तिथं येईल त्या त्या वेळीं त्याला त्या बीरच्या पेल्याशिवाय आणखी एकाद-दुसरा पेला अधिक मिळावा म्हणून तिच्याकडे कांहीं पैसे ठेवून देण्याची मीं खटपट करून पाहिली. पण गांवच्या स्वाभिमानाला माझा हा प्रयत्न सहन झाला नाहीं. खाणावळकरणीनें स्पष्टच सांगितलं कीं आपण माझी ही इच्छा पुरी करूं पण पैसे घेणार नाहीं. ती पुढं म्हणाली कीं 'स्टर्जेंटलर हा एवढा मोठा माणूस असेल याची गांवांत कुणाला कल्पना नव्हती. असा माणूस गांवांत असणं हें गांवाला भूषण आहे. ग्रामपालिकेच्या अध्यक्षानं हुकूम काढला आहे कीं या बिचाऱ्या माणसाला यापुढं मासिक मदत मिळत जावी. यापुढं जो तो आस्थेनं त्याची काळजी घेईल.' सुखाच्या कांहीं घटका देण्याचा चांगुलपणा दाखविल्या-बद्दल भरघोस आभार मानून मीं त्याला एक पत्र लिहिलं. आणि तें त्याच्यासाठीं ठेवून दिलं. तो हजार वेळां तें पत्र वाचील आणि ज्याला त्याला तें दाखवीत राहील आणि हें सुखद स्वप्न जिवाभावानें उराशीं बाळगील हें मी जाणून होतें. इतक्या लवकर मला परतलेली पाहून माझ्या नवऱ्याला फार आश्चर्य वाटलें. पण त्यापेक्षांहि त्याला नवल वाटलं तें अनुपस्थितीच्या या दोन दिवसांत माझी प्रकृति इतकी छानदार आणि उल्हसित झालेली पाहून. 'मोठी आश्चर्यकारक सुधारणा झाली म्हणायची तुझ्या प्रकृतींत !' तो म्हणाला. पण माझ्या या स्थित्यंतराचं मला मुळींच आश्चर्य वाटत नाहीं. कारण सुखामुळं जितकं आरोग्य लाभतं तितकं अन्य कशानंहि लाभत नाहीं आणि दुसऱ्याला सुखी करण्याइतकं महान सुख अन्य कशांतहि नाहीं.

या पत्रानं तुझंहि तारुणकालापासूनचं ऋण आज मीं फेडलं आहे. आपल्या पीटर स्टर्जे-संबंधीं सारं कांहीं आतां तुला कळलं आहे आणि तुझ्या या मैत्रिणीचं शेवटचं जुनं रहस्य कळून चुकलं आहे.

मार्गारेट

---

## नवीन वर्षाचा संकल्प

म्हणून आजच्या दिवशीं आपण व्यापकतेचा संकल्प करूं या. तुकारामाबरोबर म्हणूं या– "आमुचा स्वदेश, भुवनत्रयामध्यें वास।" "मायबापाची लाडकी, कळों आलें हें लौकिकीं।" दुनियेचे आम्ही रहिवाशी. परमेश्वर आमचा मायबाप आहे. खरोखर ह्याची कृपा आहे कीं आमचा देश एवढा विशाल आहे. त्यांत अपार विविधता आहे. ती जिरवून आम्ही एक आहोंत. माणसामाणसांत आम्ही काल्पनिक भेद रचणार नाहीं.

दुःखी मनुष्यास दुःखी म्हणून ओळखूं, सुखी मनुष्यास सुखी म्हणून ओळखूं. गुंडास गुंड म्हणूं. साधूस साधू म्हणूं. तो अमक्या भाषेचा, जातीचा, किंवा धर्माचा–असला विचार करणार नाहीं. ज्यामुळें सबंध मानवता पशुतेहून अलग पडते, तेवढा एकच भेद आम्ही ओळखूं. अर्थात् सत् आणि असत् हा विवेक राखूं. असा संकल्प करूं तर हिंदुस्थानांत मंगल नांदेल आणि त्यातून जगाचेंहि मंगल होईल.

—आचार्य **विनोबा**, प्रार्थना समयींच्या भाषणांतून १–१–४९

('स्वतंत्र भारत' धुळें)








श्री. ह. कृ. मोहनी

# जयपूर काँग्रेसची फलश्रुति

जयपूरची काँग्रेस होऊन गेली. आतां एकंदरींत जयपूर काँग्रेसची फलश्रुति काय ? असा प्रश्न विचारांत घेतल्यास हा प्रश्न विचारणाऱ्याच्या ह्या काँग्रेसच्या अधिवेशनाबाबत काय अपेक्षा होत्या असा प्रतिप्रश्न विचारणें भाग पडतें. या प्रतिप्रश्नाचें उत्तर शोधण्यापूर्वी काँग्रेसचें आतांपर्यंतचें कार्य, तिची सद्यःकालीन परिस्थिति, इतिहासक्रमानें तिच्यावर येऊन पडलेली जबाबदारी—यांबद्दलचे विचार मनांत येणें अपरिहार्य आहे.

काँग्रेस नवीन युगांत पदार्पण करीत आहे. काँग्रेसच्या जन्मापासून तों १९४७ ऑगस्टपर्यंत काँग्रेस ह्या महान् राजकीय राष्ट्रीय संस्थेचें एकच ध्येय किंवा उद्दिष्ट होतें. राजकीय, स्वातंत्र्यप्राप्तीसाठीं काँग्रेस निर्माण झाली होती; आणि काँग्रेसच्या ६० वर्षांच्या काळांतील उत्तरार्धांत परकीय सरकारशीं लढा, संग्राम किंवा युद्ध करणें हें काँग्रेसचें आवश्यक व क्रमप्राप्त असें कर्तव्य ठरलेलें होतें. काँग्रेसचें स्वातंत्र्यप्राप्तीचें हें उद्दिष्ट दीड वर्षांपूर्वी साध्य झालें आणि परकीय सरकारशीं युद्ध करण्याच्या परीक्षांतून काँग्रेस उत्तीर्ण झाली.

## अहिंसक लढ्याच्या तंत्राचें वैशिष्ट्य

गेल्या २७ वर्षांत महात्मा गांधीजींच्या आधिपत्याखालीं, परकीय सरकारशीं काँग्रेसचा लढा चालल्यामुळें, आणि त्यांनीं ह्या लढ्याचें तंत्र अहिंसामय ठरविल्यामुळें स्वातंत्र्यप्राप्तीचा हा लढा जगांतील कोणत्याहि स्वातंत्र्य-युद्धापेक्षां अत्यंत निराळ्या स्वरूपाचा राहिला. काँग्रेसच्या लढ्याचें हें अहिंसक तंत्र इतकें अभूतपूर्व, लोकविलक्षण, जागतिक इतिहासाच्या विपरीत राहिलें कीं ह्या तंत्राच्या विरोधी असणाऱ्या लोकांस व जनसमूहास, देशांतील स्वतःस विचारी समजणाऱ्या शिक्षितांस, ह्या लढ्याच्या प्रथमावस्थेंत तरी निदान, तें अनाकलनीय विचित्र, गूढ व हास्यास्पदहि वाटलें. आणि आतां हा लढा संपला आहे व स्वराज्य आपल्यास मिळालें आहे तरी देखील ह्या अहिंसक लढ्याच्या तंत्रानें जनतेच्या हृदयाची पूर्णपणें पकड घेतली आहे असें म्हणतां येत नाहीं.

जेव्हां दोन वर्षांपूर्वी काँग्रेसच्या हातावर स्वराज्याचें उदक परकीय सरकारनें सोडलें, त्या वेळीं मुस्लिम लीगलाहि परकीय सरकारनें स्वराज्याचे अंशभाक् केल्यामुळें, काँग्रेसच्या विरोधी लोकांस हें खरें स्वराज्य असूं शकेल कीं काय अशीहि भ्रांत पडली. ह्या स्वराज्यप्राप्तीच्या गौरवास्पद घटनेनें काँग्रेसविरोधी लोकांचें हृदय आंदोलित झालें नाहीं. उलट, ह्या अभूतपूर्व घटनेचा गौरव, तिचें महत्त्व, कमी करण्यास देशांतील कांहीं लोक धजले. ह्यावरून काँग्रेसनें उपयोगांत आणलेलें स्वराज्याच्या लढ्याचें तंत्र किती लोकविलक्षण होतें तें दिसून येण्यासारखें आहे. इंग्रजांनींच आपली राष्ट्रीय बिकट परिस्थिति पाहून हिंदुस्थानास हें स्वराज्याचें दान दिलें असेंहि कांहींस वाटलें. स्वराज्याचें दान घेतल्यानें राष्ट्राचा स्वाभिमान दुखविला जातो असें वाटून तेजोभंग झाल्याचें दुःखहि थोड्या विपरीत भावनांच्या लोकांस वाटलें.

## काँग्रेसची सार्वभौम सत्ता

महात्मा गांधींनीं जागतिक इतिहासांत प्रथमच उपयोगांत आणलेलें अहिंसक लढ्याचें तंत्र सूक्ष्म, सौम्य आणि नवीन इतिहास घडविणारें असल्यामुळें आणि म्हणूनच तें क्रांतिकारक असलें तरी कोणाहि सामान्य माणसाच्या स्थूल बुद्धीस सहज










समजेल अशा प्रकारचें तें नव्हतें. त्याचा परिणाम असा झाला आहे कीं जी हिंदुस्थानव्यापी संस्था ह्या अहिंसक लढ्याचें प्रभावी व परिणामकारक साधन बनली, ती स्वराज्यप्राप्ति करून देणारी, युद्धविजयी, सामर्थ्यसंपन्न अशी काँग्रेस हीच एकमेवाद्वितीय सार्वभौम राजकीय सत्ता (Sovereign political hower) राष्ट्रांत आहे आणि तीच सत्ता स्वराज्यप्राप्तीस मुख्यतः कारणीभूत आहे, ही ज्ञानयुक्त जाणीव देशांतील जितक्या लोकांस असावयास पाहिजे तितक्या प्रमाणांत ती आढळून येत नाहीं. ही ढळढळीत दिसणारी गोष्ट आहे. सध्यां भरत असलेली घटनासमिति (Constituent Assembly) सार्वभौम राजकीय सत्ता धारण करणारी एकमेवाद्वितीय अशा काँग्रेस-संस्थेची सारभूत सभा आहे व ती घटनासमिति आपलें स्वराज्य सांप्रत घडवीत आहे याचें ज्ञानयुक्त आकलन लोकांस जितकें असावें तितकें नाहीं.

स्वराज्य कोणीं मिळविलें? घटनासमिति कोणाची? सरकार कोणीं स्थापलें? सरकारच्या मागें कोणतें सामर्थ्य उभें आहे? ह्या प्रश्नांचीं उत्तरें इतकीं स्पष्ट असतांहि त्यांचें स्वारस्य शिक्षित समजल्या जाणाऱ्या लोकांच्याहि लक्षांत पूर्णपणें येत असेल असें म्हणतां येत नाहीं. स्वराज्य स्थापणारी, इंग्रजांकडून स्वपराक्रमानें स्वराज्य संपादन करणारी काँग्रेस हीच केवळ एक संस्था आहे. काँग्रेसचें इतकें महत्त्व राष्ट्रांत आहे. हें सहज कळण्यासारखें सत्य असूनहि काँग्रेसबद्दल आदर किंवा श्रद्धा ह्या भावनेची खोली किती आहे हा प्रश्न विचारणीयच झालेला आहे.

काँग्रेस ही अमूर्त अशी वस्तु (Abstract entity) बनलेली आहे. स्थूल मनावर इष्ट व हितकारक आघात करणारें साध्या डोळ्यास दिसणारें, असें काँग्रेसचें स्वरूप (Tangible Reality) सद्यःस्थितींत आढळून येत नाहीं.

## काँग्रेसबद्दल सत्ताधारी लोकांची अनास्था

आपल्या स्वराज्याची मूलभूत (Basic) शक्ति काँग्रेस ही असतांना, तिच्या स्थैर्याकडे, तिच्या सातत्याकडे किंवा सध्याच्या परिस्थितीस उपकारक होईल असें तिचें नवीन स्वरूप कसें बनवितां येईल ह्याकडे विचारी लोकांचें आणि आपल्या पुढाऱ्यांचेंहि जितकें लक्ष असावयास पाहिजे तितकें नाहीं. आपणांस स्वराज्य मिळालें, आपलें सरकार अस्तित्वांत आलें, आतां काँग्रेसचें विसर्जन करण्यास हरकत नाहीं अशी भाषा जबाबदार लोकांकडूनहि ऐकूं येऊं लागली. कारण त्यांची सर्व मदार सरकार व त्याच्यामागचें लष्करी सामर्थ्य ह्यावरच अवलंबित होती. सरकार बनविणारी शेवटची सत्ता म्हणजे जनता, तिच्यावरील त्यांचें लक्ष उडालेलें होतें.

अधिकारपदावर आरूढ झालेले, सरकार बनविणारे अग्रगण्य पुढारी काँग्रेसला दुय्यम किंवा गौणस्थान देऊं लागले. प्रथमश्रेणीचे पुढारी अधिकारपदावर आरूढ झाले आणि काँग्रेसमध्यें दुय्यम दर्जाचे पुढारी शिल्लक राहिले. कौन्सिलमध्यें आणि राज्यकारभारामध्यें काँग्रेसमधील निवडक लोक पाठविले गेल्यामुळें आणि ह्या संस्थांचें किंवा अधिकारपदांचें आकर्षण व्यक्तिदृष्ट्या त्यांस अधिक वाटल्यामुळें काँग्रेस ही संस्था देशव्यापी असली आणि तिचें महत्त्व पुष्कळ असलें तरी तिच्यामध्यें जनतेचीं मनें सहज वेधून घेतील असें कार्यकर्ते शिल्लक राहिले नाहींत. ह्यामुळें काँग्रेस ही जरी केंद्रीभूत राजकीय संस्था असली आणि स्वराज्याची सर्व सत्ता तिच्यांत सामावलेली असली तरी फक्त ज्याला समजेल त्यालाच तिचें महत्त्व कळूं शकतें, अशी आजची वस्तुस्थिति आहे. सरकार ह्या संस्थेंत मात्र प्रत्यक्षपणें सर्व सत्ता, अधिकार व फायदे अंतर्भूत झालेले असल्यामुळें स्थूल दृष्टीच्या कोणाहि मनुष्यास सरकारचा मोठेपणा सहज नजरेंत भरतो. परंतु जी संस्था खुद्द सरकार बनविते तिच्याकडे सध्यां दुर्लक्ष झालेलें आहे.

## स्वराज्य–सरकार व काँग्रेस

जनता, काँग्रेस व सरकार ही एक त्रयी आहे. काँग्रेस व सरकार ह्यांमध्यें जनक-जन्यासारखें नातें आहे. कर्तबगार व स्वावलंबी पुत्रानें वयांत आल्यानंतर जनकाची उपेक्षा केल्यास तें कदाचित् एखाद्यावेळीं परिणामापुरतें पाहिल्यास क्षम्य ठरण्यासारखें आहे; परंतु काँग्रेस व सरकार ह्यांमधील नातें सरकार कर्तबगार असलें तरी उपेक्षा करण्यालायक केव्हांहि ठरूं शकणार नाहीं. कारण प्रातिनिधिक सरकार हें नेहमीं बदलणारें सरकार असतें. त्याची







स्फूर्ति, वैभव व सत्ता ही परावलंबी आहेत. अशा सरकारचें जें उगमस्थान तें बलवान्, वैभवशाली व स्फूर्तिप्रद असलें तरच त्याचें प्रतिबिंब कांहीं काळ प्रातिनिधिक सरकार ह्या संस्थेंत उमटलेलें दिसून येतें. सध्यां हिंदुस्थानांत प्रतिबिंबास अकारण महत्त्व दिलें गेलें आहे. ही मूल्याची उलटापालट चिरस्थायी ठरूं शकणार नाहीं, एवढेंच नाहीं तर ती लवकरच हानिकारक ठरल्याशिवाय राहणार नाहीं. कॉंग्रेसचें महत्त्व ही एक राजकीय उपपत्तीची किंवा राज्यशास्त्र समजावण्याची गोष्ट ठरतां कामा नये. प्रत्यक्षपणें सर्वांस पटेल असें कॉंग्रेसचें महत्त्व असलें पाहिजे. कॉंग्रेस हें देशभक्तीचें स्फूर्तिस्थान अनेक वर्षे बनलेलें आहे. सरकार हें केव्हांहि देशाचें स्फूर्तिस्थान बनूं शकत नाहीं.

## मतदारांच्या नैतिक नेतृत्वाची जबाबदारी

हिंदुस्थानचें सरकार हें प्रातिनिधिक सरकार आहे व तें तसेंच राहणारहि आहे. ह्या सरकारानें वयांत आलेल्या प्रत्येक मनुष्यास मतदानाचा अधिकार दिलेला आहे. सार्वत्रिक मतदारांचा हा अफाट जनसमूह प्रातिनिधिक सरकार बनवीत असतो. परंतु हा अफाट सार्वत्रिक मतदार संघ म्हणजे एक प्रचंड वावटळ किंवा गगनभेदी सोसाट्याचा वारा आहे. निवडणुकीच्या वेळीं ह्या प्रचंड वावटळीस काबूंत ठेवणारें यंत्र किंवा संयमशक्ति प्रमुख अशा राजकीय संस्थांमध्यें अंतर्भूत झालेली असते. कॉंग्रेसाशिवाय दुसरी कोणतीहि राजकीय संस्था कोट्यवधि मतदारांची ही वावटळ ताब्यांत ठेवण्यास समर्थ आहे असें म्हणतां येत नाहीं. महात्मा गांधी ही एक व्यक्ति राष्ट्रांत अशी होती कीं, तिला ह्या वावटळीवर प्रभुत्व गाजविण्याची किमया साध्य झालेली होती. गांधीजींमुळें कॉंग्रेसलाहि महत्त्व प्राप्त झालेलें होतें. गांधीजींव्यतिरिक्त जी कॉंग्रेस आहे तिचें नैतिक प्रभुत्व राष्ट्रावर आज आहे असें कोणी म्हणूं शकणार नाहीं.

गांधीजी नसतांना निवडणुकीवर प्रभुत्व गाजविणारें कॉंग्रेसचें हें यंत्र जितकें प्रभावी, लोकाहिततत्पर, परिस्थितीवर काबू मिळविणारें कार्यक्षम करितां येईल तितकें करणें वास्तविक अत्यंत निकडीचें कार्य आहे. देशांतील पुढाऱ्यांचें जितकें लक्ष ह्या कामीं लागलें पाहिजे तितकें लागलेलें नाहीं हें दुर्दैव आहे.

आपल्यांतील पुढाऱ्यांच्या तोंडांमध्यें प्रातिनिधिक तत्त्वांची भाषाच फक्त आलेली आहे. ह्या तत्त्वांच्या व प्रातिनिधिक संस्थांच्या शिस्तीमध्यें त्यांचीं मनें कसलेलीं नाहींत. व्यक्तिनिष्ठता, अधिकारनिष्ठता, स्वार्थनिष्ठता आपल्या पुढाऱ्यांमध्यें देखील ओतप्रोत भरलेली आहे. प्रातिनिधिक राज्यसत्ता ही कार्यक्षम सत्ता तेव्हांच बनेल, जेव्हां प्रातिनिधिक तत्त्वाची ती प्रतिबिंबरूप बनेल. आपल्या समाजांत अमूर्त तत्त्वें ( abstract principles ) रूढ झालेलीं नाहींत. आपलीं मनें राजकारणदृष्ट्या अमूर्त तत्त्वांस पारखीं, प्रथमावस्थेंतील (primitive minds) अशीं आहेत.

आणि · म्हणूनच कॉंग्रेससंस्थेचें भवितव्य देशाच्या भवितव्याच्या दृष्टीनें चिंतेची बाब होऊन बसलेली आहे. देशांत कॉंग्रेसव्यतिरिक्त दुसरा कोणताहि राजकीय दृष्ट्या प्रभावी असा गट, संस्था, संप्रदाय, पक्ष, किंवा शक्ति नाहीं. जी शक्ति कॉंग्रेसच्या रूपानें आज अस्तित्वांत आहे, ती देखील दृढ व कणखर नाहीं.

## जयपूरची कसोटी

प्रांतानिहाय दिसणाऱ्या आजच्या कॉंग्रेसच्या विस्कळित, भुसभुशीत, बाजारबुणगेपणाच्या अवस्थेंतून आपले पुढारी जयपूरला आगामी काळांत कार्यक्षम होईल अशी संघटना कशी निर्माण करतात याबद्दलचें आपणांस साहजिक औत्सुक्य होतें. संस्थानांत कॉंग्रेस प्रथमच भरली आणि प्रातिनिधिक तत्त्वांच्या दृष्टीनें पाहतां संस्थानांचा प्रश्न अधिकच बिकट असा आहे. ह्या अवाढव्य देशांत सूत्रबद्धता निर्माण करण्याचें कार्य अत्यंत कठिण आहे. जयपूरला जनता व सरकार ह्यांच्यामधील प्रभावशाली दुवा महात्मा गांधींची परंपरा लक्षांत घेऊन कॉंग्रेसला कितपत साधतां येतो, यांत जयपूर कॉंग्रेसची कसोटी होती.

कॉंग्रेस ह्या कसोटीस उतरावयाची असल्यास तिला नुसते चांगले ठराव करून भागणार नाहीं. वर्किंग कमिटीनें तयार केलेले जे ठराव कॉंग्रेसमध्यें पास झाले त्यांची शब्दरचना, सुयोग्य व सद्-








# जयपूर काँग्रेसची फलश्रुति

भावनादर्शक नाहीं असें कोणी म्हणूं शकणार नाहीं. काँग्रेसच्या पुढील उद्दिष्ट दर्शविणाऱ्या ठरावांत गांधीजींबद्दलची खोल निष्ठा आणि गांधीजींनीं घालून दिलेली परंपरा चालविण्याबद्दलची काँग्रेसची उत्सुकता व्यक्त झालेली आहे. त्याचप्रमाणें ह्या ठरावांत शांततेचें धोरण परराष्ट्रीय राजकारणांत पुढें चालविण्याचा काँग्रेसचा निश्चय व्यक्त झालेला आहे. वर्गविरहित लोकशाहीच्या द्वारा आर्थिक समानता व सामाजिक स्वातंत्र्य स्थापण्याचा आपला बाणा काँग्रेसनें घोषित केला आहे. गांधी–विचाराची दृष्टि पुढें ठेवून आर्थिक प्रश्नांबाबत सद्यःस्थितींत हितकारक होतील असे अनेक ठराव काँग्रेसनें केले आहेत. पण जनता, काँग्रेस व सरकार ह्या त्रिदलामध्यें प्रभावशाली मार्गानें काँग्रेसला स्थितिस्थापकता ठेवावयाची असल्यास काँग्रेसचें नैतिक प्रभुत्व पुन्हां प्रस्थापित झालें पाहिजे. काँग्रेसपुढें मुख्य समस्या हीच आहे. परकीय कुटिल साम्राज्यशाही सरकारशीं लढा देतांना गुलामी नष्ट करणाऱ्या देशभक्तीच्या मूलगामी सद्गुणांत काँग्रेसची नैतिक श्रेष्ठता केंद्रीभूत झालेली होती. गांधीजींच्या अहिंसक सत्याग्रही मार्गानें ह्या नैतिक श्रेष्ठतेचा कळस गांठलेला होता. परंतु सध्यां काँग्रेसचें एक महत्त्वाचें अंग आणि काँग्रेसमधील बहुसंख्याक लोकांच्या दृष्टीनें पहातां काँग्रेसची मुख्य बाजू राज्यसंस्थेंत अंतर्भूत झाल्यामुळें, आणि राज्यसंस्थेमधून अधिकाराशीं संलग्न असलेल्या मूलभूत दोषांमुळें नैतिक श्रेष्ठता प्रतीत होणें केव्हांहि दुष्कर असल्यामुळें ही काँग्रेसची नैतिक श्रेष्ठता नव्यानें कशी प्रस्थापित करावयाची हाच प्रश्न काँग्रेसपुढें मुख्यतः उभा आहे. जयपूरची काँग्रेस तर संस्थानें हिंदी संघराज्यांत समाविष्ट झाल्यामुळें अधिक व्यापक बनलेली, त्यामुळें काँग्रेसच्या सांप्रतच्या थुलथुलीत शरीरामध्यें अधिक जडत्व प्राप्त झालेलें आहे. पुण्यपावन गंगेमध्यें अनेक गढूळ प्रवाह मिळाले तरीं गंगेचें पाणी पवित्र, स्वच्छ, व शांत राहतें. गांधीजींच्या असामान्य व्यक्तित्वामुळें काँग्रेसला गंगेचें शुचित्व प्राप्त झालेलें होतें. अधिकारग्रहण, अरेरावीपणाकडे नेणारी राज्यसत्ता आणि प्रातिनिधिक मंगलदायक तत्त्वांची अनभिज्ञता हे अत्यंत गढूळ प्रवाह काँग्रेसची शुचिता सांप्रत भ्रष्ट करीत आहेत. ही भ्रष्टता, हा विनिपात, ही अधोगति काँग्रेस कशी थांबविते, अधिकारावर मात करणारी निःस्वार्थता काँग्रेस कशी प्रभावी बनविते, कोणतें नवें लोकहितकारक तंत्र काँग्रेस निर्माण करते यावरच जयपूर काँग्रेसचें यशापयश अवलंबून होतें.

### देशप्रेमाची नवीन स्फूर्ति कशी निर्माण होणार

गेलीं पन्नास वर्षें देशभक्तीचें ध्येय आणि ह्या देशभक्तीमुळें परकीय सरकारशीं लढा किंवा आंदोलन–ह्या दोन क्रियांत सामावलेली जनता म्हणजे काँग्रेस, असें काँग्रेसचें स्वरूप होतें. स्वातंत्र्य मिळाल्यानंतर काँग्रेसचें स्वरूप समूळ बदललेलें आहे. काँग्रेस म्हणजे सरकार हेंच काँग्रेसचें सर्वांच्या नजरेंत भरणारें स्वरूप आज शिल्लक उरलेलें आहे. सरकार ह्या घटनेमध्यें अधिकार किंवा दंड, सुव्यवस्था किंवा सुस्थिति निर्माण करण्याची शक्ति आणि देशांतील निरनिराळ्या प्रकारच्या ध्येयांस मदत करण्याची ताकद ह्या गोष्टी अंतर्भूत झालेल्या असतात हें खरें; परंतु आजच्या काँग्रेसमध्यें ध्येयवादी लोकांचें प्रभुत्व दिसून येत नाहीं, सत्तावादी किंवा अधिकारवादी लोकांचेंच प्राधान्य काँग्रेस संस्थेमधून पुरेपूर भरून राहिलेलें आहे, आणि त्या अधिकाराच्या आकर्षणामुळें जनतेमधील बहुतांश लोक भारून गेलेले आहेत ही वस्तुस्थिति देखील निर्विवादपणानें खरी आहे.

अशा स्वरूपाच्या आजच्या काँग्रेसकडूनहि काँग्रेसबद्दल जिव्हाळा वाटणाऱ्या सामान्य विचारी मनुष्याच्या अपेक्षा खालीं दिल्याप्रमाणें आहेत.

गांधीजींची ध्येयवादी परंपरा काँग्रेस सद्यःस्थितींत कशी प्रस्थापित करणार? आजचें काँग्रेसचें सरकार ह्या परंपरेबद्दलची निष्ठा आपल्या आचरणांत किंवा कार्यक्रमांत कशी दिग्दर्शित करणार? आणि जनतेमध्यें ह्या गांधीवादी निष्ठेची उज्ज्वल भावना कशी निर्माण करणार किंवा सद्यःस्थितींत जनतेमध्यें देशप्रेमाची नवीन स्फूर्ति, पूर्वपरंपरा लक्षांत घेऊन कशी निर्माण करणार?

स्फूर्तीशीं अधिकार किंवा सत्ता ह्यांचें साहचर्य राहूं शकत नाहीं. स्फूर्तीचें साहचर्य प्रेमाशीं किंवा ध्येयाशीं राहूं शकतें. आजच्या काँग्रेस-सरकारांत कांहीं ध्येयवादी पुढारी सत्ताधिष्ठित झालेले आहेत.








ते पुढारी आपल्या पूर्वायुष्यांतील तपश्चर्येच्या जोरावर, देशांत नवीन स्फूर्ति किंवा नव्यानें सुव्यवस्था स्थापावयास लागणारा ध्येयवाद आपणांस निर्माण करतां येईल अशी अपेक्षा बाळगीत आहेत. परंतु ही त्यांची अपेक्षा अवास्तव असल्यामुळें ती फलद्रूप होऊं शकणार नाहीं. कारण कोणत्याहि समाजांत स्फूर्तिवादी लोक अल्पसंख्याकच असणार. उलट सरकाराधिष्ठित सत्तेमध्यें बहुसंख्याक लोक अधिकारलोलुपतेमुळें आपला हात गुंतविण्यास नेहमीं तयार व उत्सुक राहणार हें निश्चित आहे. आणि म्हणून स्फूर्ति किंवा ध्येय अशा अधिकारलोलुप लोकांपासून दूर पळणार हेंहि स्पष्टच आहे. आजच्या हिंदुस्थानांतील मूर्धाभिषिक्त पुढाऱ्यांचा ध्येयवाद, अधिकाराशीं तो संलग्न झाल्यामुळें, झांकाळलेला दिसूं लागला आहे. पूर्वायुष्यांतील तपश्चर्येच्या जोरावर, त्या तपश्चर्येमुळें प्राप्त झालेल्या अधिकारावर, देशांत सुस्थिति निर्माण करण्याचा ते प्रामाणिक प्रयत्न करीत आहेत ह्याबद्दल शंका नाहीं. परंतु बहुसंख्याक लोकांच्या आणि अनेक लहान-मोठ्या महत्त्वाकांक्षी पुढाऱ्यांच्या सत्तालोलुपतेमुळें हा प्रामाणिकपणा देखील लवकरच संशयित झाल्याशिवाय राहणार नाहीं अशीं चिन्हें दिसूं लागलीं आहेत. अर्थ व काम ह्यांवर धर्माचें प्रभुत्व असावें अशी आपल्या संस्कृतीची परंपरा आहे. पण प्रत्यक्ष आचरणांत किंवा सत्यसृष्टींत, विशेषतः सरकार ह्या संस्थेंत ही उज्ज्वल परंपरा उतरविणें फारच दुष्कर आहे. आपणांस राजकीय स्वातंत्र्य बहुतांश लोकांच्या खडतर तपश्चर्येवांचूनच मिळालेलें असल्यामुळें आणि देशांतील आजच्या पुढारी बनलेल्या मध्यमवर्गीय लोकांची रहाणी सारखी खालावलेली असल्यामुळें, अधिकाराबरोबर येणारी सुखासीनता आणि सरकाराधिष्ठित सत्ता ह्यांनीं त्यांचीं मनें लालचावलेलीं असणें स्वाभाविकच आहे असें म्हटलें पाहिजे. आणि म्हणून गेलीं २५ वर्षें गांधीजींनीं निर्माण केलेली अहिंसाप्रधान व सत्यवादी परंपरा व तिची शिस्त, सत्तेबरोबर साहजिकपणानेंच येणाऱ्या मदांधतेमुळें, केवळ पूर्वायुष्यांतील ध्येयवादी तपश्चर्येच्या जोरावर काँग्रेसच्या मंत्रिवर्गासहि टिकवून धरणें कठिणच जात आहे.

## जयपूरचें वैभव व काँग्रेसचा ध्येयवाद

खेड्यांत काँग्रेस भरवावी अशी गांधीजींनीं अलौकिक परंपरा घालून दिलेली असतांना जयपूरसारख्या इतिहासप्रसिद्ध सुंदर शहरीं काँग्रेस भरली. काँग्रेस सरकाराच्या अनेकविध मदतीमुळें व प्रोत्साहनामुळें पन्नास लक्ष रुपये काँग्रेसच्या ह्या संस्थानी अधिवेशनामध्यें खर्ची पडले. विधायक कार्यांत उपयोगांत आणावयाच्या गांधी-स्मारक-निधीसाठीं सर्व हिंदुस्थानभर अनेक महिने खटपट चाललेली असतांना देखील अद्याप दोन कोटींची रक्कम एकत्रित होऊं शकली नाहीं; पण जयपूरचें अधिवेशन वैभवशाली करण्यासाठीं अर्धा कोटी रुपयांचा ह्या कठिण परिस्थितींत सहजासहजीं चुराडा होतो ! ह्यावरून देशांतील वातावरण ध्येयवादाच्या मोजमापानें सहजच अजमावता येतें. तीन लक्ष लोकांचा अजस्र रंगीबेरंगी मेळावा, खाण्यापिण्याची रेलचेल, विस्तीर्ण मंडपाचा थाटमाट, चांदीच्या रथांत मिरवणूक, चौघड्यांचा दूरवर घुमणारा प्रतिध्वनि ह्या घटना सरकाराधिष्ठित काँग्रेसचें वैभव दिग्दर्शित करणाऱ्या असल्या, तरी काँग्रेसमधील बहुसंख्य लोकांच्या सद्यःकालीन आकांक्षांचा वारा कसा वाहत आहे ह्याचें अनुमान करण्यास पुरेशा आहेत.

ह्या अधिवेशनांत देशास संदेश देणारा एक महत्त्वाचा ठराव पास झाला आहे; आणि काँग्रेसमधील लोकांच्या सार्वजनिक चारित्र्याबद्दल व शीलाबद्दलच्या ठरावावर महत्त्वाची चर्चा ह्या अधिवेशनांत झाली आहे. सध्यांच्या सरकारास पाठिंबा देणारे, त्यांचें धोरण उचलून धरणारे, सरकारच्या कामगिरीचें वास्तवदर्शन करून देणारे अनेक ठराव जयपूरला पास झाले आहेत. हे ठराव अपवादरहित आहेत ह्यांत कांहीं शंका नाहीं. परंतु ह्या अनेक ठरावांवरचीं भाषणें वाचल्यानंतर किंवा तीं ऐकल्यानंतर काँग्रेसचें नैतिक प्रभुत्व, काँग्रेसची ध्येयवादी परंपरा, गांधीजींचें अलौकिक राजकारण ह्या ठरावांच्या चर्चेनें व भाषणांनीं पुनरुज्जीवित कसें करितां येईल हा मूलगामी प्रश्न शिल्लकच राहतो.

जयपूरची काँग्रेस म्हणजे पंडित जवाहिरलाल नेहरू व सरदार पटेल ह्या दोन पुढाऱ्यांची लोकप्रियता व त्यांची अलौकिक कामगिरी ह्यांचें प्रदर्श-








नच होतें, असें जयपूर काँग्रेसचें सार सांगतां येण्यासारखें आहे. परंतु पंडित जवाहिरलाल नेहरू व सरदार वल्लभभाई ह्यांचीच कांहीं केवळ काँग्रेस नाहीं; आणि ह्या दोन पुढाऱ्यांच्या महत्तमतेंत काँग्रेस-संस्थेची थोरवी सामावूं शकत नाहीं. आजच्या विलक्षण परिस्थितीमुळें व ह्या पुढाऱ्यांच्या अतुल कर्तबगारीमुळें ते हिंदुस्थानचे मूर्धाभिषिक्त राजे झालेले असले, आणि सध्यांची राजकारणी जनता त्यांच्या व्यक्तित्वामुळें भारून गेलेली दिसत असली, तरी आज राजेरजवाड्यांचें युग राहिलेलें नाहीं. पुढाऱ्यांना देव मानून प्रातिनिधिक सत्तेमधील देशोद्धारक तत्त्वें दृढमूल होऊं शकत नाहींत आणि देशाची नैतिक पातळी वर उचलली जात नाहीं, हेंहि तितकेंच खरें आहे. देशांतील मूर्धाभिषिक्त पुढाऱ्यांनीं नम्रता धारण करून आपली लोकप्रियता खर्ची घालून काँग्रेस ह्या एकमेव, राजकीय प्रभुत्व गाजवणाऱ्या, संस्थेचें नैतिक वजन वाढविलें तरच देशाचा उत्कर्ष साध्य होण्यास मदत मिळूं शकते.

## सर्वोदयी प्रदर्शनाचें वैशिष्टय

काँग्रेसला आज ध्येयवादाची किंवा नैतिक उन्नत विचाराची फार गरज आहे. ही गरज जयपूरची काँग्रेस पुरवूं शकली नाहीं, असा ग्रह विचारी मनावर झाला असला पाहिजे असें वाटतें. ही ध्येयवादाची गरज अल्पांशानें पुरवूं शकेल असें जयपूरला एकच दृश्य होतें. सर्वोदयी प्रदर्शन हेंच केवळ गांधीजींची उज्ज्वल परंपरेची साक्ष पटविण्यास कांहीं कांहीं प्रमाणांत समर्थ ठरूं शकत होतें. एका बाजूस अजस्त्र वैभवशाली देखावा, तर दुसऱ्या बाजूस सध्यांच्या आर्थिक दारुण परिस्थितींत हजारों खेड्यांचा संसार नटिनेटकेपणानें कसा चालवितां येईल ह्याबद्दलचें लहानसें नम्र चित्र!

हें चित्र काढणाऱ्या थोड्या संयमी, स्वार्थत्यागी सेवाधर्मी लोकांचें प्रभुत्व आजच्या काँग्रेसवर नाहीं. आजची काँग्रेस ही अधिकारी लोकांनीं भारलेला मेळावा बनलेला आहे. सर्वोदयी प्रदर्शन हा काँग्रेसचा लहानसा कोपरा आहे. ह्या लहानशा कोपऱ्यांत आपला मर्यादित संसार मांडणाऱ्या लोकांस हिंदुस्थानच्या अफाट राज्यांतील संसारांत कितपत महत्त्व आगामी काळांत प्राप्त होतें, ते आपल्या कर्तबगारीचें क्षेत्र कितपत पुढें वाढवूं शकतात, ह्यावर त्यांच्या गतीवर काँग्रेसचा परंपरागत ध्येयवाद अवलंबून आहे असें प्रस्तुत लेखकास वाटतें. जयपूरची काँग्रेस वैभवशाली झालेली असली, तरी हिंदुस्थानांतील खेड्यांचें वैभव कसें वाढवावयाचें, हें वैभव वाढविण्यासाठीं कोण कष्ट करणार, ह्या महान् उद्दिष्टासाठीं सेवारत कार्यकर्त्यांची सेना कशी उभारावयाची ह्या जरूरीच्या प्रश्नांचीं उत्तरें जयपूरची काँग्रेस देऊं शकली नाहीं. म्हणून गांधीजींच्या मृत्यूनंतर भरलेली ही अवाढव्य काँग्रेस गांधीजींची परंपरा जोमानें पुढें चालविण्याच्या दृष्टीनें यशस्वी झालेली नाहीं असें मोठ्या खेदानें म्हणणें प्राप्त आहे.

## ध्येयवादी सेवकांची गरज

आपल्या देशाचें तारूं स्वातंत्र्य मिळाल्यानंतर देखील अनेक सोसाट्याच्या विचारवाऱ्यांत सांपडलेलें आहे. परदेशांवरून युद्धविषयक व राजकीय उपपत्ति-(Ideology)-विषयक अनेक निरनिराळ्या विचारांचे झंझावात आपल्या देशावर धडक्या मारीत आहेत. त्यामुळें आपलें हें तारूं अधिकच डळमळत आहे. काँग्रेसचें सरकार असलें तरी तें काँग्रेसमध्यें एकविचार व एकतानता निर्माण करूं शकत नाहीं. काँग्रेसच्या बाहेर देशांत राजकीय विचारांचें थैमान सुरू आहे. आर्थिक बिकट परिस्थितीचे अनेक भोंवरे ह्या दुर्दशेंत भर घालीत आहेत. अशा अवस्थेंत ध्येयवादी पण शांतपणानें विचार करणारे व सेवाभावानें कार्य करणारे अशांची अधिकच गरज तीव्रतेनें भासत आहे. सर्व देशभर जिचें राजकीय प्रभुत्व आहे अशी काँग्रेस ध्येयवादास मदत करील अशी अपेक्षा करण्यावांचून गत्यंतर नाहीं. तरी ती अपेक्षा सफल होऊं शकत नाहीं हें देशाचें दुर्दैव म्हटलें पाहिजे.

जरी श्री. राधाकृष्णन् हे राजकीय पुढारी नसले व त्यांच्या भाषणाचा प्रस्तुत राजकारणावर फारसा परिणाम होण्यासारखा नसला तरी त्यांचा बौद्धिक अधिकार फार मोठा असल्यानें जयपूर काँग्रेसनंतर तिला अनुलक्षून त्यांनीं मद्रास येथील (२३-१२-४८) आपल्या भाषणांत व्यक्त केलेले विचार लक्षांत घेण्यासारखे आहेत—

"गांधीजींनीं आपणांस स्वातंत्र्याच्या दाराशीं







आणून सोडलें आणि ते स्वतः निघून गेले. ज्या तत्त्वांकरितां त्यांनीं आपलें आयुष्य समर्पिलें, त्या तत्त्वांबद्दल आपण सदैव जागरूक राहिलों नाहीं तर आपलें स्वातंत्र्य मृगजल ठरेल!

"काँग्रेसजनांच्या चारित्र्यासंबंधीं जयपूरच्या अधिवेशनांत आलेल्या ठरावाला जो पाठिंबा मिळाला, त्यावरून हें उघड आहे कीं, आज ज्या गोष्टी घडत आहेत, त्यांपैकीं अनेक गोष्टींविषयीं जनतेंत असंतोष वाढत आहे. या ठरावाला मिळालेला पाठिंबा म्हणजे इषाराच होय. देशाच्या राज्यकारभाराबद्दल जे श्रेष्ठी जबाबदार आहेत, ते या असंतोषाची जितक्या लवकर दखल घेतील तितकें चांगलें! आज तो असंतोष मुका आहे. पण एक दिवस त्याला खात्रीनें वाचा फुटेल. चीन, ब्रह्मदेश आणि मलाया येथें जे प्रकार आज घडत आहेत, त्या प्रकारांचा करडा इषारा आपण लक्षांत घेतला पाहिजे. बदल ज्या वेळीं अगदीं मंद गतीनें होऊं लागतो, त्या वेळीं क्रांति अपरिहार्य होऊन बसते. आर्थिक पुनर्घटनेच्या बाबतींत आपण जर गाफील आणि मंद राहिलों, कामगारांनीं पैदास वाढविण्याच्या कामीं सहकार्य द्यावें एवढीच फक्त एक घोषणा जर आपण सारखी घोकीत राहिलों आणि गरिबांच्या रक्तांतून नफा पिळून काढणाऱ्या काळाबाजारवाल्या पुंजीपतींना जर आपण हात लावला नाहीं, तर त्या विषमतेंतून असंतोष खात्रीनें उफाळेल. आम्ही कम्युनिस्टांना गाडून टाकणार आहोंत असा नुसता बकवा करण्यांत अर्थ नाहीं. जोंपर्यंत आपण आर्थिक पुनर्घटना जलद घडवून आणीत नाहीं, भांडवलदार आणि कामगार यांना देशासाठीं सारखीच झीज सोसावी लागेल अशी व्यवस्था जोंपर्यंत आपण करीत नाहीं, तोंपर्यंत कम्युनिझमला मदत करण्याची इच्छा नसतांनाहि आपण कम्युनिझमचा प्रचार करीत आहोंत, असेंच म्हणावें लागेल. आपलें आजचें सरकार हें भांडवलवाल्यांचें भांडवलवाल्यांनीं भांडवलवाल्यांसाठीं चालविलेलें सरकार आहे, असा जगांत आपल्या सरकारचा दुर्लौकिक होतां कामा नये. या प्रकाराला जोंपर्यंत आळा घातला जात नाहीं, तोंपर्यंत हिंदुस्थानांत खरी समाजवादी लोकशाही स्थापन करणें आपल्याला शक्य होणार नाहीं."

---

## संस्कृतीचा पाया

आपली संस्कृति महान् आहे. पण तिची महती व्यापार आणि उद्योगधंदे यांच्या वाढीवर अवलंबून नाहीं. आमच्या संस्कृतीचा पाया, मुख्य भर साधुत्वाच्या गुणांवर आहे. ज्या संस्कृतींत वर्तमानकाळांत थोर अशा साधुत्वगुणसंपदेचा वेळोवेळीं जीवनांत प्रादुर्भाव होत नाहीं, ती संस्कृति एकाद्या ओसाड, भग्न मंदिराप्रमाणें झाली आहे असें समजावें. म्हणूनच आतांच अगदीं या वेळीं आपणांत अशीं माणसें निर्माण झालीं पाहिजेत कीं, ज्यांच्या ठिकाणीं आपल्या या महान् देशाच्या साधुत्वगुणसंपन्न आत्म्याचा मूर्तिमंत आविष्कार दिसून येईल.

अपयशामुळें इतकें नव्हे पण यशामुळेंच आपले दोष कित्येक वेळां उघडकीस येतात. स्वातंत्र्यप्राप्तीपूर्वीं आपण स्वातंत्र्याकरितां झगडत असतांना आपणांमध्यें धैर्य, सेवाभाव आणि त्याग या गुणांचा कमालीचा असा उदात्त आविष्कार दिसून आला. पण आज हेच गुण आपणांस सोडून जात आहेत, असें दिसत आहे! गांधीजींना हेंच दिसून आलें. गोळ्यांनीं त्यांचें शरीर विदीर्ण होण्यापूर्वीं त्यांचें हृदय या वैफल्यभावनेनें विदीर्ण झालें होतें!

—डॉ. राधाकृ (मद्रास येथील भाषणांतून २३-१२-४८)








# गेले कोठें तरी........!

" यवनांच्या साऱ्या करा त्या मशिदी
उध्वस्त उध्वस्त
जमीनीचे दोस्त.
तयांच्या ठिकाणीं आपुलीं मंदिरें
मंदिरें भव्य उभारा तुंग
ऐसीं कीं जयाचे कळस सोन्याचे
आकाश भेदून स्वर्गात जातील—!"
गर्जले कट्टर श्रीकृष्णदेवाचे
कट्टर भक्त.

* * *

" चला पेटवा करा चटकन्
खाक खाक राख राखरांगोळी
खुनी काफिरांच्या साऱ्या देउळांची
अन् उभारा अस्मानचुंबी
आपुल्या मशिदी जयांचे घुमट
मक्केहुनी पण स्पष्ट दिसतील"
कडाडे कडवा महंमदीयांचा—
कडवा संमर्द.

* * *

पुन्या पाडण्या आपल्या प्रतिज्ञा
लागले कामाला एकाच वेळीं
कृष्णाचे प्रेमी अल्लाचे प्यारे
काळेबाजारी श्रीमंत कुबेर
तुंदिलतनू संपत्ति ओतती

महान् महान् पुढारी भाडोत्री
प्रचार-स्फुलिंग ओकती फेंकती
भुकेले दरिद्री अज्ञानी दरिद्री
—बालकें भाबडीं— गाळूं लागले
सांडूं लागले आपुला घाम
आपुले श्रम आपुलें रक्त
धर्मकार्यासाठीं!

* * *

सर्वत्र माजतां अग्नीचा डोंब
उडालीं त्वरित रक्ताचीं कारंजीं
जाहली राड कुजल्या मांसाची
असंख्य मशिदी जाहल्या माती.
असंख्य मंदिरें जाहलीं खाक.
कबरस्थानें स्मशानें स्मशानें!
धर्मकार्यासाठीं!

* * *

पाहुनि आपुल्या भक्तांच्या लीला
अल्ला नि कृष्ण
हातांत हात घालूनि बिचारे
गेले कोठें तरी
निघून, निघून
अश्रू ढाळीत!

—प्रा. य. द. भावे

———











प्रा. गं. व. ग्रामोपाध्ये

# ऐतिहासिक कादंबरी : कांहीं विचार

ऐतिहासिक कादंबरीची निर्मिति कांहीं एका विशिष्ट काळांतच होते असें आजवर लिहिल्या गेलेल्या ऐतिहासिक कादंबऱ्यांवरून दिसून येतें. समाजांत ज्या वेळीं गतेतिहासाबद्दल आदर, अभिमान, श्रद्धा इत्यादि वास करीत असतात, आणि वर्तमानाच्या तुलनेंत ऐतिहासिकाबद्दलची श्रेष्ठता ज्या वेळीं उत्कटतेनें जाणवत असते; तो काळ ऐतिहासिक कादंबरीला ( आणि कोणत्याहि ऐतिहासिक ललितकृतीला ) पोषक असतो; त्यांत ऐतिहासिक वीरपुरुषाबद्दल नितान्त आदर, त्याच्या शौर्यवीर्याबद्दलचा अभिमान, त्याच्या कर्तबगारीबद्दल लोकप्रिय असणाऱ्या अद्भुतरम्य आख्यायिका, इत्यादींचीहि भर पडते; आणि या साऱ्यांचा परिणाम जेव्हां तत्संवादी अशा कलावंताच्या म्हणजे येथें कादंबरीकाराच्या मनावर होतो, तेव्हां त्याच्या हातून ऐतिहासिक कादंबरी निर्माण होते. हरिभाऊंनीं जेव्हां ऐतिहासिक कादंबऱ्या लिहिल्या त्या वेळची महाराष्ट्रांतील मराठ्यांच्या इतिहासाबद्दलची प्रीति, खरा इतिहास जाणण्याची जिज्ञासा, रायगडच्या शिवप्रभूंच्या समाधीचा जीर्णोद्धार आणि पुनः विष्णुशास्त्री चिपळूणकरांनीं स्वधर्म, स्वदेश, नि स्वभाषा यांबद्दल उद्दीपित केलेला अभिमान आणि या सर्वांचा जनमनावर झालेला परिणाम याबाबत लक्षांत घेण्यासारखा आहे. ऐतिहासिक कादंबरीच्या निर्मितीला जी एक सामाजिक प्रवृत्ति कांहीं अंशीं कारण असते, आणि ज्या प्रवृत्तींतून कादंबरीकाराला प्रेरणा मिळते त्या गोष्टीचा मला प्रस्तुत विचार करावयाचा नाहीं, तर ऐतिहासिक कादंबरी म्हणून आपण जिला संबोधितों, तिचें निश्चित स्वरूप काय असतें, तिच्या मर्यादा काय असतात, आणि तिच्यांतून कोणत्या प्रकारच्या ऐतिहासिक सत्याचा वाङ्मयीन आविष्कार होतो इत्यादींचा विचार करावयाचा आहे.

## कादंबरींतील ऐतिहासिक सत्याभास

प्रथमतः इतिहास आणि ऐतिहासिक कादंबरी यांच्यांतील फरक स्पष्ट केला पाहिजे. अर्थात् हा फरक स्पष्ट करतांना, त्यांच्या तपशिलांत न शिरतां इतिहासांतील ऐतिहासिक सत्य आणि ऐतिहासिक कादंबरींतील ऐतिहासिक सत्य यांच्यांतला भेद स्पष्ट केला म्हणजे प्रस्तुत चर्चेला पुरेसा आहे.

सामान्यपणें इतिहास म्हणून ज्याला मानलें जातें तो गतकालीन घटनांच्या तपशीलानें भरलेला असतो. आपल्याकडे समाजाचा सर्वांगीण इतिहास लिहिण्याची पद्धति रूढ झालेली नाहीं. फक्त राजकीय इतिहासावरच इतिहासकारांचें लक्ष केंद्रित झालेलें आहे. परंतु इतिहास–मग तो राजकीय असो कीं धार्मिक असो–जें सत्य सांगतो, तें सत्य निर्भेळ वास्तव सत्य असतें. इतिहासकाराची वैयक्तिक दृष्टि, त्याला मिळालेली अपुरी किंवा एकांगी सामग्री, त्या सामग्रींतहि ऐकणाऱ्याच्या वा सांगणाऱ्याच्या मनानें नकळत केलेला बदल, त्याचे पूर्वग्रह–इत्यादिकांनीं सत्याच्या निर्भेळ स्वरूपांत कांहींच बदल होत नसेल असें मला म्हणावयाचें नाहीं. परंतु अशा तऱ्हेनें थोडेफार बदल झालेले असले तरी इतिहासकाराची दृष्टि गतकालांत जें जें घडलें असेल म्हणजे प्रत्यक्षांत घडलें असेल तें तें नमूद करण्याकडेच असते. त्यांत त्याच्या कल्पनेचे नि भावनांचे रंग मिसळलेले नसतात. फार तर तो आपल्या चिकित्सक बुद्धिमत्तेनें मिळालेल्या सामग्रीची सत्यासत्यता पारखील, त्याची चाळण करील, त्यांची संगति लावील, आणि त्यांतून उरलेलें खरेंखुरें








म्हणजे प्रत्यक्ष घडलेलें असें सत्य सांगेल. इतिहासकार मोठ्या चिकित्सेचा असूनहि तो देशाभिमानानें वा ऐतिहासिक वीरपुरुषाच्या आदरानें भारला जाणेंहि अशक्य नाहीं. आपला गतेतिहास किती उज्ज्वल होता हें दाखविण्याचाहि त्याचा हेतु असेल किंवा इतिहासापासून मार्गदर्शन करण्याचीहि इच्छा त्याच्या मनांत वसत असेल. म्हणजेच इतिहासलेखनामागें अशा प्रकारच्या कांहीं भावनाहि प्रेरक झालेल्या असतील. परंतु त्यामुळें फार तर तो इतिहास ऐतिहासिक सत्याच्या दृष्टीनें बिनचूक ठरणार नाहीं; किंवा तो अर्धसत्य सांगेल; किंवा त्यांतील सत्यावर कांहीं ग्रहाग्रहांचे लेपहि चढतील; पण म्हणून त्यांत काल्पनिकतेचा आणि भावात्मकतेचा कलात्मक स्पर्श झाला असेल असें खासच म्हणतां येणार नाहीं. किंबहुना खरा इतिहास या सर्वांपासून अलिप्त राहून खरें निर्भेळ ऐतिहासिक सत्य, वास्तव सत्य सांगण्याचाच प्रयत्न करील. या उलट ऐतिहासिक कादंबरींत किंवा कोणत्याहि ऐतिहासिक ललितकृतींत जें ऐतिहासिक सत्य असतें, तें कलात्मक असतें. काल्पनिकता आणि भावनात्मकता यांच्या मुशींतून तें उतरलेलें असतें; आणि त्याचा वाचकांच्या मनावर जो परिणाम होतो तोहि भावनात्मक असतो. इतिहासवाचनानें गतकालाचें ज्ञान होईल, पण ऐतिहासिक ललितकृतीनें गतकालाचा भावनात्मक अनुभव येईल. या अनुभवांत ऐतिहासिक सत्याचा आभास निर्माण होईल; आणि या आभासांत वाचक वर्तमानाला विसरून मनानें इतिहासकालांत जाईल, आणि तेथील ऐतिहासिक वातावरणांत, ऐतिहासिक जविनांत रंगून जाईल. यांतच त्याला ऐतिहासिक सत्याची अनुभूति लाभेल.

## ऐतिहासिक महत्त्वाच्या घटना कोणत्या ?

ऐतिहासिक कादंबरींतील वा कोणत्याहि ऐतिहासिक ललितकृतींतील ऐतिहासिक सत्याभास म्हणजे काय याविषयीं आणखी थोडा विचार केला पाहिजे. कलावंताला प्रतीत झालेला ऐतिहासिक सत्याचा भास हा केवळ इतिहासवाचनानें किंवा इतिहासज्ञानानें होत नसतो. इतिहासवाचनानें फार तर त्याच्या ज्ञानांत भर पडेल; परंतु त्याला भावनात्मक अनुभूति येणार नाहीं. ही भावनात्मक अनुभूति येण्यासाठीं त्याला तत्कालीन दंतकथा, लोकसमज, रम्याद्भुत अशा ऐतिहासिक प्रसंगांचें आकर्षण इत्यादींची मदत होते. ऐतिहासिक कलाकृति निर्माण करणाऱ्या कलावंतांची प्रकृतीहि त्याला अनुकूल अशीच असते. रम्याद्भुत गोष्टींनीं त्याचें मन थरारून जात असतें. गतकालीन शूरवीरांच्या पोवाड्यांनीं त्याचें रक्त उसळतें. लोकविलक्षण दंतकथांचा मनाला चटका लागतो. पण इतकेंच होत नाहीं, हें मात्र लक्षांत ठेवलें पाहिजे. कलावंताच्या कल्पनेनें त्या सर्वांतून एक विश्व उभें केलेलें असतें. अर्थात् तें गतकालीनच असतें; इतिहासानें निबद्ध असतें. परंतु त्याची रचना कलावंताच्या कल्पनेनें केलेली असते. मात्र त्याच्या कल्पनेनें ऐतिहासिक रूक्ष वास्तवाच्या तपशिलांतून एक मनोरम अशी सुंदर कलाकृति निर्माण झालेली असते.

वर्तमानाप्रमाणें भूतकालहि अनेक घटनांनीं, अनेक तपशिलांनीं बनलेला असतो. इतिहासानें अनेक व्यक्तींचे उल्लेख केलेले असतात. ती ती व्यक्ति आपलें वैयक्तिक आणि असल्यास सामाजिक वा राजकीय असें जीवन जगून गेलेली असते. या साऱ्या व्यक्ती आणि साऱ्या घटना यांनीं इतिहासाची इमारत रचलेली असली तरी त्या साऱ्यांचा ऐतिहासिक ललितकृतीला उपयोग होईलच अशी मात्र खात्री देतां येणार नाहीं. मग ऐतिहासिक ललितकृतींत कोणत्या घटनांचा आणि व्यक्तींचा उपयोग होतो, असा प्रश्न निर्माण होतो. म्हणजे कोणत्या घटनांना आणि कोणत्या प्रकारच्या व्यक्तींना ऐतिहासिक ललितकृतींच्या दृष्टीनें ऐतिहासिक म्हणतां येईल ? म्हणजे, इतिहासांतील सर्वच घटना आणि व्यक्ती यांना ऐतिहासिक म्हणतां येणार नाहीं काय ? याचें उत्तर स्पष्ट आहे. इतिहासकालांत अनंत व्यक्ती आणि असंख्य घटना घडलेल्या असल्या आणि त्यांची नोंद इतिहासानें केलेली असली तरी त्या साऱ्या ऐतिहासिक महत्त्वाच्या असतातच असें नव्हे; कारण इतिहास घडवावयाला त्यांचा उपयोग झालेला नसतो. इतिहासांत अशा फारच थोड्या व्यक्ती होऊन गेलेल्या असतात, आणि असे फारच थोडे प्रसंग घडलेले असतात कीं, त्यांचा इतिहासावर कायमचा परिणाम झालेला








असतो किंवा इतिहासाला त्यांच्यामुळें नवीन वळण लागलेलें असतें; किंबहुना अशाच थोड्या व्यक्तींच्या कृतीनें इतिहासाला गति मिळालेली असते. ही त्यांची कृति आणि त्यांनीं दिलेली गति ज्या कांहीं घटनांमध्यें सामावलेल्या असतात त्याच घटनांना ऐतिहासिक महत्त्व असतें. त्यांतच ऐतिहासिक सत्याचें अधिष्ठान असतें. ऐतिहासिक ललितलेखकाला ज्या कोण्या एका ऐतिहासिक सत्याचा शोध घ्यावयाचा असतो तें सत्यहि त्यांतच दडलेलें असतें. ऐतिहासिक ललितकृतींत ज्या ऐतिहासिक सत्याचा आविष्कार झालेला असतो असें मीं म्हटलें तें हेंच सत्य होय.

## पात्रें काल्पनिक पण प्रतिनिधिरूप

ऐतिहासिक कादंबरींतून ऐतिहासिक सत्याचा भावनात्मक आविष्कार झाला पाहिजे असें मीं जें वर म्हटलें आहे त्याचें आणखी थोडेसें स्पष्टीकरण करणें जरूर आहे. इतिहास-संशोधकाप्रमाणें इतिहासांतलि तिथि, वार, स्थळ, इत्यादींची चिकित्सापूर्वक पारख करणें निराळें आणि त्या साऱ्यांची साकल्येंकरून चाळण करून त्यांतील ऐतिहासिक सत्य शोधणें निराळें. ऐतिहासिक कादंबरीकाराला जणूं तारेवरची कसरतच करावयाची असते. काल्पनिकाच्या साहाय्यानें कल्पित सृष्टि तर निर्माण करावयाची पण पुनः तिची उभारणी इतिहासावरच करावयाची; आणि तीहि अशा कांहीं कलात्मकतेनें कीं, तींतून व्यक्त होणारें ऐतिहासिक सत्य हें केवळ ऐतिहासिक सत्य न राहतां त्यांतून तात्त्विक, शाश्वत सत्याचाहि साक्षात्कार झाला पाहिजे. यासाठींच त्याला इतिहासांतील तपशिलापेक्षां त्या साऱ्यांचा साकल्यानें जो भावनात्मक परिणाम होतो त्यावर लक्ष केंद्रित करावें लागतें. उदाहरणानें माझें म्हणणें स्पष्ट होईल. हरि नारायण आपटे यांच्या प्रसिद्ध 'उषःकाल' कादंबरीचेंच उदाहरण घेऊं. 'उषःकाल' कादंबरींत हरिभाऊंना महाराष्ट्रांतील स्वराज्याच्या सूर्योदयापूर्वीचा उषःकाल रंगवावयाचा होता. त्या उषःकालीं स्वराज्यस्थापनेसाठीं जे प्रयत्न झाले, त्या प्रयत्नांना जी प्रेरणा मिळाली, त्या प्रेरणेची शक्ति आणि योजिलेली युक्ति इत्यादींनीं तत्कालीन आबालवृद्ध स्त्रीपुरुषांवर जो परिणाम झाला त्याचें परिणामकारक चित्र हरिभाऊंना रंगवावयाचें होतें. त्यासाठीं त्यांनीं जीं पात्रें निवडलीं, त्यांपैकीं फारच थोडीं पात्रें इतिहासांत खरोखरी होऊन गेलेलीं आहेत; आणि अशीं जीं कांहीं थोडीं पात्रें आहेत त्यांच्याकडून फारच थोड्या—कादंबरींत महत्त्वाच्या असणाऱ्या—घटना घडल्या आहेत. कादंबरींतील बरींच महत्त्वाचीं पात्रें काल्पनिक आहेत. परंतु तीं काल्पनिक असलीं तरी तत्कालीन समाजांत वावरणाऱ्या व्यक्तींचींच तीं प्रतिनिधिरूप आहेत. शिवाय ज्या कांहीं प्रवृत्ती तत्कालीन समाजांतील स्त्रीपुरुषांत वास करीत होत्या त्यांचे ते नमुने आहेत. कादंबरींतील बऱ्याचशा घटना काल्पनिक असल्या तरी त्या सर्वांतून स्वराज्याच्या उषःकालीं महाराष्ट्रांत जें वातावरण होतें त्याचें प्रतिबिंब त्यांतून पाहायला मिळतें. शिवाजीनें केलेली उठावणी, त्याच्या तरुण सहकाऱ्यांनीं केलेली धाडसी मदत, वृद्ध सरदारनोकरदारांचा विरोध, मुसलमानांतील सुष्ट नि दुष्ट यांच्याशीं आलेले संबंध इत्यादींच्या मागें जें ऐतिहासिक सत्य आहे त्याचाच आभास कादंबरींत आढळतो हें लक्षांत ठेवलें पाहिजे. हा सत्याभास निर्माण करण्यासाठीं त्या साऱ्यांच्या मागची भावनात्मकता जशी कादंबरीकाराला अचूक टिपतां आली पाहिजे, तशीच ऐतिहासिकाची पारखहि त्याला करतां आली पाहिजे. किंबहुना ऐतिहासिक सत्यशोधनांतून त्याला शाश्वत अशा सत्याचें दर्शन झालें पाहिजे आणि कादंबरींत त्याचें भावनात्मक पुनर्दर्शन देतां आलें पाहिजे. मात्र ऐतिहासिक कादंबरींत भावनात्मकतेच्या दृष्टीनें काल्पनिकाचें, म्हणजे काल्पनिक पात्रांचें नि प्रसंगाचें कितीहि महत्त्व असलें, तरी त्यामुळें ऐतिहासिक महत्त्वाचीं पात्रें आणि प्रसंग यांच्यावर मात होतां कामा नये हें मात्र लक्षांत ठेवलें पाहिजे. कारण ती कादंबरी असली तरी ती ऐतिहासिक आहे.

सामाजिक ललितकृतींत ज्याप्रमाण शक्यता आणि संभवनियता या दोन कसोट्या पाळून सर्वच सृष्टि जशी कल्पनेनें रचतां येते—म्हणजे सर्वच पात्रें नि प्रसंग ज्याप्रमाणें काल्पनिक असूं शकतात—तशीं ऐतिहासिक ललितकृतींत रंगवितां येत नाहीं.








# ऐतिहासिक कादंबरी : कांहीं विचार

इतिहासाचीं बंधनें हीं पाळावींच लागतात. म्हणजे ज्या कांहीं ऐतिहासिक व्यक्तींचा आणि त्यांच्या जीवनांतल्या प्रसंगांचा उपयोग कलावंताला करावयाचा असतो त्यांच्या चित्रणांत इतिहासानें त्याचे हात बांधलेले असतात. शिवाजीच्या व्यक्तिचित्रणाचा उपयोग जर कादंबरीकाराला करावयाचा असेल तर इतिहासानें ज्या प्रकारचा शिवाजी आम्हांला दाखविला आहे तशाच प्रकारचा शिवाजी रंगवावा लागेल; शिवाय शिवाजीचा दुसरा कोणीहि प्रतिनिधि त्या ठिकाणीं चालावयाचा नाहीं. याच्या उलट त्याच्या आंवर्तीभोंवर्ती त्याच्या मदतीस जी अनेक तरुणबांड मंडळी होती त्यांपैकीं कोणताहि नानासाहेब ( उषःकाल ) चालेल, कुठलाहि सांवळ्या चालेल. कारण ती त्या अनेकांचे प्रतिनिधी म्हणून येतील, त्यांच्यांत त्यांच्यासारख्याच अनेकांचे स्वभावधर्महि एकवटतां येतील. म्हणजेच तीं पात्रें संपूर्णपणानें काल्पनिक असूं शकतील. मात्र या काल्पनिक पात्रांनाहि आपल्यामुळें मूळ ऐतिहासिकाला धक्का लागणार नाहीं अशी खबरदारी घ्यावी लागेल; किंबहुना मूळ ऐतिहासिकाला उठाव देण्यासाठीं, त्यांचें खरें स्वरूप जास्त स्पष्ट होण्यासाठींच त्यांची निर्मिति असते. ऐतिहासिक आणि काल्पनिक यांचें हें प्रमाण राखणें हा ऐतिहासिक कलाकृतीचा एक महत्त्वाचा निकष आहे.

## ऐतिहासिक वास्तवता

ऐतिहासिक ललितकृति ज्या कांहीं विशिष्ट सामाजिक प्रवृत्तींतून निर्माण होते असें मीं सुरुवातीला म्हटलें आहे, म्हणजे इतिहासाबद्दलच्या नि त्यांतील कांहीं व्यक्तींबद्दलच्या कुतूहलमिश्र आदरानें, ऐतिहासिक ललितकृति निर्माण होते त्या आदरानें, कुतूहलानें, त्यांच्या असामान्यत्वाच्या कल्पनेनें ऐतिहासिक ललितकृतींत आणखीहि कांहीं विशेष शिरणें शक्य असतें. ऐतिहासिक व्यक्तीचा असामान्यपणा, कर्तबगारीचा अचाटपणा, तिच्यावर आलेल्या संकटांची भीषणता आणि त्यांतून सहीसलामत पार पडण्यांत तिनें दाखविलेला अचाट धाडसीपणा, इत्यादींनीं तेथील सर्व वातावरण अद्भुत आहे असें वाटूं लागतें. हरिभाऊंच्या सुद्धां सुरुवातीच्या ऐतिहासिक कादंबऱ्यांत अशा गोष्टी दिसतात आणि त्यांच्या आधीं लिहिल्या गेलेल्या अद्भुतरम्य कादंबऱ्यांशीं तर त्यांचें नातें नाहीं ना, अशी शंका यावयाला लागते. अर्थात् ऐतिहासिक ललितकृतींत कांहीं एका प्रमाणांत रम्याद्भुतता येणें शक्य आहे आणि इष्टहि आहे असेंहि आपल्याला मान्य करावें लागतें. कारण इतिहासांतील तसल्याच कांहीं गोष्टींमुळें तर सामान्य वाचक इतिहासाकडे वळलेला असतो आणि म्हणून तर त्याला ऐतिहासिक ललितकृतीबद्दलचें प्रेम वाटत असतें; अर्थात् या अद्भुततेमुळें मूळ ऐतिहासिकाचें रम्यत्व वाढत असेल तर ठीक; नाहीं तर ऐतिहासिकाचें ऐतिहासिकत्वच नष्ट होईल.

यांतूनच ऐतिहासिक कादंबरीसंबंधानें किंवा कोणत्याहि ऐतिहासिक ललितकृतीसंबंधानें आणखी एक महत्त्वाचा प्रश्न निर्माण होतो. ऐतिहासिक कादंबरींत जे जे प्रसंग चित्रित केलेले असतात, जीं पात्रें रंगविलीं असतात, त्यांच्या करवीं ज्या कांहीं रम्याद्भुत अशा घटना निर्मिल्या असतात आणि या सर्वांच्या साठीं म्हणून ज्या कांहीं आख्यायिकांचा नि समजुतींचा उपयोग केलेला असतो त्या साऱ्यांमुळें निर्माण झालेली जी सृष्टि असते ती वास्तवतेच्या निकषावर घासून पाहतां येईल काय ? कलाकृतीची जेव्हां आपण वास्तवता पारखतों तेव्हां तिला आपण शक्यता आणि संभवनीयता यांच्या कसोट्या लावतों. ऐतिहासिक ललितकृतींतील कांहीं पात्रें आणि कांहीं घटना तर प्रत्यक्ष घडलेल्याच असतात. तेव्हां त्यांच्याबाबत वरचा प्रश्न उत्पन्नच होणार नाहीं. परंतु अशीं कांहीं पात्रें किंवा असे कांहीं प्रसंग त्यांत आढळतात कीं, त्यांचा उगम ऐतिहासिक पुरुषाबद्दलच्या कमालीच्या आदरांतून किंवा दंतकथांतील अद्भुतांतूनच झालेला असतो. हे जे रम्याद्भुताचे रंग कलाकृतीवर चढतात त्यामुळें तिची वास्तवता नष्ट होते कीं नाहीं ? वरवर पाहिलें तर नष्ट होते असें म्हणावें लागतें. कारण तींतील रम्याद्भुततेमुळें तिची जातकुळी अद्भुतरम्यतावादाकडेच जाते. परंतु येथें एक गोष्ट ध्यानांत घेतली पाहिजे कीं आजच्या वास्तव जीवनावर आधारलेल्या ललितकृतींतील वास्तवता आणि ऐतिहासिक ललितकृतींतील वास्तवता यांची गल्लत








होतां कामा नये. आजच्या जीवनाबद्दल आपल्याला जेवढें कुतूहल असतें त्याच्या अनेक पटींनीं ऐतिहासिक कालाबद्दल, निदान त्यांतील कांहीं विशिष्ट घटनांबद्दल आपल्या मनांत कुतूहल असतें. या कुतूहलापोटीं अनेक रम्याद्भुत अशा कल्पना दडलेल्या असतात, समजुती असतात, आणि त्यांनींच तर ऐतिहासिक वातावरण निर्माण झालेलें असतें. मग ऐतिहासिक कलाकृतींच्या दृष्टीनें त्या सर्व घटना वास्तवच म्हटल्या पाहिजेत. अर्थात् आजच्या दृष्टीनें जरी त्या अवास्तव वाटल्या तरी त्या ऐतिहासिक कलादृष्टीनें शक्य नि संभवनीय वाटल्या पाहिजेत हें मात्र खास आणि त्याच दृष्टीनें त्यांची वास्तवता किंवा अवास्तवता ठरविली पाहिजे. हवें तर त्याला आपण ऐतिहासिक वास्तवता म्हणूं या.

## ऐतिहासिक व सामाजिक यांमधील फरक

या ऐतिहासिक वास्तवतेनें युक्त अशी जी ऐतिहासिक ललितकृति असते—मग ती कथा कादंबरी असो वा नाटक असो—तिला आपण नुसतेंच ऐतिहासिक म्हणतों. परंतु ऐतिहासिक या नांवानें जी ललितकृति निर्माण होते ती बहुधा इतिहासकालीन राजपुरुषांवर किंवा राजकीय समरप्रसंगांवर. अर्थात् त्यांच्यामुळेंच इतिहास घडतो, इतिहासाला कलाटणी मिळते, देशाचें भवितव्य ठरतें इत्यादि कारणांनीं त्यांना ऐतिहासिक महत्त्व मिळतें आणि ऐतिहासिक सत्याच्या दिग्दर्शनाला त्यांचाच उपयोग जास्त होतो. मात्र या ठिकाणीं आणखी एक गोष्ट लक्षांत आल्यावांचून रहात नाहीं. आजवर इतिहासानें राष्ट्राची केवळ राजकीय बाजूच रंगविली असल्यामुळें आम्हांस त्याची महती पटते. परंतु इतिहासांत खरोखरी सामाजिक, धार्मिक इत्यादि इतरहि गोष्टी येत नाहींत का ? आणि त्या सामाजिकांत आणि धार्मिकांत कांहींच ऐतिहासिक महत्त्वाचे प्रसंग आले नसतील का ? जरूर आले असतील. आजवर धार्मिक क्रांत्यादि अनेक झाल्या आहेत. सामाजिक क्रांत्याहि झाल्या आहेत. बौद्ध धर्मानें वैदिक धर्माविरुद्ध केवढें प्रचंड बंड उभारून अहिंसामय बौद्ध धर्माचा प्रसार केला. त्यानंतर शंकराचार्यांनीं पुनः एकदां बौद्धाची पीछेहाट करून वैदिक धर्माचें पुनरुज्जीवन केलें. किती ऐतिहासिक महत्त्वाचे हे पुरुष आणि त्यांची कर्तबगारी ! मग त्यांच्या जीवनावर जर ललितकृति निर्माण झाली तर तिला फक्त ऐतिहासिक असेंच म्हणणार ? कीं ऐतिहासिक धार्मिक म्हणणार ? म्हणजे ऐतिहासिकाचे पुनः ऐतिहासिक धार्मिक, ऐतिहासिक सामाजिक, ऐतिहासिक राजकयि असे भेद करणार ? कीं त्यांना नुसतेंच राजकीय, सामाजिक, धार्मिक असें म्हणणार ? कारण ऐतिहासिक काल घेतला तरी त्यांत सामाजिक जीवन असणारच ! त्यांत कांहीं समस्याहि असणार ! संघर्ष असणार ! मग त्या सामाजिक संघर्षावर सामाजिक दृष्टीनें जर ललितकृति निर्मिली असेल तर ती मुख्यतः सामाजिकच म्हटली पाहिजे. वर्तमानकालीन सामाजिक असें जसें आपण म्हणत नाहीं तसेंच ऐतिहासिक सामाजिक म्हणण्याची काय जरूरी ? तीच गोष्ट धार्मिक किंवा राज्यनीतिव्यवहार यासंबंधींची ! पण ही गोष्ट मान्य केली तर या ठिकाणीं असा एक मूलभूत प्रश्न निर्माण होतो कीं मग ऐतिहासिक, ऐतिहासिक म्हणून आपण म्हणतों तें राहिलेंच कुठें ? ऐतिहासिकाचें निराळें अस्तित्वच कुठें उरलें ? त्याचें उत्तर असें कीं, जरूर उरतें. मात्र तितक्या तोलाचें ऐतिहासिक महत्त्व असलें पाहिजे. म्हणजेच मीं वर म्हटल्याप्रमाणें इतिहास जर विशिष्ट गोष्टीमुळें वा व्यक्तीमुळें घडला असेल तर ती गोष्ट वा व्यक्ति जरूर ऐतिहासिक होईल ! नव्हे, ऐतिहासिकच म्हणजे ऐतिहासिक महत्त्वाची होईल. त्या ठिकाणीं सामाजिक वा धार्मिक वा राजकीय अशा गोष्टी आल्या असल्या तरी त्या केवळ साधन म्हणून येतील, साध्य म्हणून नव्हे.

## ऐतिहासिक काळाची मर्यादा कोणती ?

ऐतिहासिक महत्त्व याचा अर्थ आपण एकदां स्पष्ट करून घेतला आणि त्या अनुरोधानें इतिहासावर ठसा उमटवील किंवा कलाटणी देईल तें ऐतिहासिक, इतर सारें केवळ गतकालीन वा भूतकालीन असें म्हटलें तर आणखी एक महत्त्वाचा प्रश्न उत्पन्न होतो. ऐतिहासिक काळ म्हणून आपण ज्याला म्हणतों त्याची मर्यादा आपण कांहीं गेल्या क्षणापर्यंत भिडवीत नाहीं. किंबहुना गेल्या सालापर्यंत किंवा गेल्या कांहीं दशकांपर्यंतहि भिडवीत नाहीं.








# ऐतिहासिक कादंबरी : कांहीं विचार

इतिहास कांहीं क्षणाक्षणाला घडत नसतो. इतिहास म्हटल्यानंतर आपण कांहीं एक मर्यादा घालतो आणि नंतरचा काळ आपण वर्तमानांतच गृहीत धरतो. अशा वर्तमानांत म्हणा वा अगदीं या घडीला म्हणा, इतिहासावर कायमचा ठसा ठेवला जाईल असा एकादा प्रसंग घडूं शकणार नाहीं का ? जर घडला आणि त्यावर जर एकादी ललितकृति आधारली तर तिला ऐतिहासिक म्हणतां येईल का ? उदाहरण द्यायचें झालें तर हिंदुस्थानचें स्वातंत्र्य नि स्वातंत्र्योत्तर फाळणी किंवा महात्माजींचें निर्वाण यांचें देतां येईल. या घटनांचें ऐतिहासिक महत्त्व लक्षांत घेऊन त्यावर त्या दृष्टीनें जर त्यांच्यावर ललितवाङ्मयकृति निर्माण झाली, तर तिला आपण ऐतिहासिक म्हणूं शकूं काय ? मला वाटतें म्हणूं शकूं. ऐतिहासिकाची मी जी वर व्याख्या केली आहे त्या अनुरोधानें त्यांना ऐतिहासिक ललितवाङ्मय असें आपण जरूर म्हणूं शकूं; कारण या घटना वर्तमानांत घडलेल्या म्हणजे नुकत्या आपल्या डोळ्यां देखत घडलेल्या असल्या, तरी त्या ऐतिहासिक महत्त्वाच्या आहेत. त्यांच्यांत ऐतिहासिक सत्य आहे. आणि या ऐतिहासिक सत्याचा आविष्कार करणारें वाङ्मय जर लिहिलें जाईल तर त्याला ऐतिहासिक वाङ्मय म्हणायला मुळींच हरकत पडणार नाहीं. आतां एक गोष्ट मात्र दिसून येते कीं आजवर ऐतिहासिक म्हणून ज्या ज्या ललितवाङ्मयकृती निर्माण झाल्या त्या सार्‍या गतकालीन ऐतिहासिक सत्यदर्शनार्थच लिहिल्या गेल्या; वर्तमानकालीन ऐतिहासिक सत्यदर्शनार्थ लिहिल्या गेल्या नाहींत. पण आजच्या एकाद्या कलावंताला आजच्या ऐतिहासिक सत्याची प्रचीति येणार नाहीं कशावरून ? आणि जर आली तर तो तशा प्रकारची कलाकृति जरूर निर्माण करूं शकेल आणि आपणहि मग तिला ऐतिहासिक असेंच म्हणूं शकूं.

---

## हिंदुस्थानची राष्ट्रभाषा : कांहीं मौलिक गोष्टी—

हिंदुस्थानच्या राष्ट्रभाषेविषयीं डॉ. राजेंद्रप्रसाद यांनीं ' हरिजन 'मध्यें दोन लेख लिहिले असून त्यांत त्यांनीं ( ५ व १२ डिसेंबर १९४८ ) खालीं दिलेले निष्कर्ष मांडले आहेत.

१. अखिल हिंदुस्थानाकरितां एका समान भाषेची आवश्यकता आहेच आहे.

२. देशांतील सर्व लोकांनीं त्यांची स्वतःची मातृभाषा कोणतीही असेना का, त्या मातृभाषेशिवाय या समान भाषेचा अभ्यास बर्‍याच प्रमाणांत केला पाहिजे.

३. ही समान भाषा इंग्रजी असणें शक्य नाहीं. ती हिंदुस्थानांतीलच एक असली पाहिजे.

४. हिंदुस्थानांतील भाषांमध्यें हिंदी किंवा हिंदुस्तानी हीच ती समान भाषा व्हायला अत्यंत योग्य आहे.

५. परंतु हिंदी–किंवा–हिंदुस्तानीला परकीय शब्दांवर बहिष्कार घालण्याचें धोरण सोडून द्यावें लागेल; इतर भाषांतील शब्दांचा समावेश करून घेण्यास मुक्तद्वार ठेवावें लागेल.

६. हे जे नवीन शब्द समाविष्ट करून घ्यायचे ते पहिल्यांदा प्रांतीय भाषांतून व बोलींतून घेतले पाहिजेत. हिंदुस्थानबाहेरील परकीय शब्दहि समाविष्ट करून घेण्यास हरकत नसावी.

७. वरील दृष्टीनें विचार करतां, हिंदी व हिंदुस्तानी यांमधील वाद व्यर्थ आहे.

८. इतर भाषांतील शब्दांची जी राष्ट्रभाषेच्या शब्दकोशांत भर पडेल त्याशिवायहि आधुनिक कल्पना व विचार–विशेषतः विज्ञान व यंत्रविषयांतील–व्यक्त करण्याकरितां किती तरी नवीन शब्द बनवावे लागतील. हे नवीन शब्द बनवून ज्यापासून घ्यायचे तें मूळ उगमस्थान संस्कृत भाषा असेल.

—डॉ. राजेंद्रप्रसाद



अनुक्रमणिका








श्री. पां. श्री. आपटे

# सेवेचा हिशोब

[ महात्मा गांधींची जीवनयात्रा अकस्मात् खंडित होऊन नुकतेंच एक वर्ष पुरें झालें आहे. त्या शोकजनक घटनेची आठवण होऊन आपल्या राष्ट्रपित्याचें जीवनकार्य, त्यांची विचारसरणि, सध्यांची एकंदर परिस्थिति, गांधीवादाचें भवितव्य वगैरेबद्दल विचारवंतांच्या मनांत विचार येणें अपरिहार्य आहे. गांधीजींचे अनेक निष्ठावंत कार्यकर्ते महाराष्ट्रांत ठिकठिकाणीं पसरलेले आहेत. गांधीजींच्या कार्याचा आढावा व विचारसरणीचें भवितव्य यांविषयीं विचार करीत असतांना, त्यांच्या या अनेक निष्ठावंत कार्यकर्त्यांचें याबाबतींत हृद्गत जर कळूं शकलें तर तें अत्यंत उद्बोधक होईल असें वाटलें. म्हणून कांहीं कार्यकर्त्यांना आपले विचार कळविण्याबाबत विनंति केली. त्यांच्या विचारांना विशिष्ट चालना देण्याच्या दृष्टीनें त्यांना अशा प्रकारची संक्षिप्त प्रश्नमालिका पाठविली होती :(१) सार्वजनिक कार्याची प्रेरणा आपणांस कशी व केव्हांपासून झाली ? त्या प्रेरणेंत गांधीजींचा किती भाग आहे ? (२) आपण आतांपर्यंत कोणकोणत्या क्षेत्रांत कार्य केलें आहे ? आपलें काम करीत असतांना त्याचे आपल्या मर्यादित क्षेत्रांतहि सार्वजनिक व राजकीय दृष्ट्या काय परिणाम घडून आलेले आपणांस दिसून येतात ? (३) आज साधारणतः दोन तपांच्या आपल्या कार्याचा विचार करतां, आपणांस समाधान वाटतें का ? आपल्या आशावादांत चढउतार येऊन गेले का ? आज आपला आशावाद पूर्वींइतकाच अभंग आहे का ? (४) आज देशामध्यें समाजाच्या अभ्युदयाच्या दृष्टीनें अनेक 'वाद' किंवा विचारसरणी प्रचलित आहेत. गांधीजींच्या निधनानंतर गांधीवादी विचारसरणि कोणत्या उपायांनीं प्रभावी होऊं शकेल ? (५) गांधीवादी विचारसरणी ही महाराष्ट्रीय मनोभूमींत तितकीशी रुजली नाहीं असा एक प्रवाद आहे, याबद्दल आपणांस कांहीं म्हणतां येईल का ?

आमच्या विनंतीला मान देऊन या प्रश्नाच्या उत्तराच्या अनुरोधानें श्री. आपटे गुरुजींनीं प्रस्तुत लेख पाठविला आहे त्याबद्दल आम्ही त्यांचे अत्यंत आभारी आहोंत. इतर कार्यकर्त्यांचे लेख जसजसे येतील तसे 'नवभारता'च्या पुढील अंकांतून येतील. —का. सं.]

'नवभारता'च्या संपादकांनीं महाराष्ट्रांतील जुन्या पिढीच्या सार्वजनिक सेवेंत ज्यांचीं १०-२० वर्षें गेलीं आहेत अशा कांहीं लोकांकडे पांच प्रश्न पाठवून त्यांचीं उत्तरें विचारलीं आहेत. मजकडेहि ही अशी एक पत्रिका आली आहे. या प्रश्नांचीं उत्तरें द्यावयाचीं म्हणजे आत्मचरित्र कथन करावें लागणार आहे. सर्व लेखनप्रकारांत माझ्या मतें आत्मचरित्रपर लेखन करणें हें अत्यंत दुर्घट काम आहे. गणपति करतां करतां अनवधानामुळें त्याचा जसा वानर होतो त्याप्रमाणें आत्मचरित्राचें पर्यवसान आत्मस्तुतिपर प्रबंधांत होतें. असें असलें तरी विचारलेल्या प्रश्नांचीं उत्तरें देण्याचें नाकारतां येत नाहीं. एका तऱ्हेनें 'नवभारता'च्या संपादकांनीं आमच्या जीवनाचा हिशोबच विचारला आहे. आणि सार्वजनिक कामांत पडलेल्यांना ज्याप्रमाणें हिशोब देण्याचें नाकारून चालत नाहीं त्याप्रमाणें विचारलेल्या प्रश्नांचीं उत्तरें देणें कठिण वाटलें तरी तीं देणें प्राप्तच आहे. म्हणून विचारलेल्या प्रश्नांचीं उत्तरें द्यावयास मी तयार झालों आहे.

१९०५ पासून १९०८ पर्यंत लो. टिळकांच्या व्यक्तिमत्त्वाची छाप त्या वेळच्या तरुणांवर चांगलीच पडली होती. मीहि त्यांच्या आकर्षणांत आलों








होतों. प्रथम त्यांच्याविषयीं माझ्या मनांत आदर उत्पन्न झाला. त्यांची भाषणें व लेख जसजसा वाचीत गेलों तसतसें मनांत आलें कीं, आपणहि त्यांच्याप्रमाणें आपलें आयुष्य देशसेवेंत घालवावें. त्यांनीं व्याख्यानांत उपदेश केल्याप्रमाणें आम्ही तरुणमंडळींनीं प्रथम परदेशी कपड्यांचा त्याग केला. नंतर परदेशी साखरहि खाण्याचें टाकून दिलें. च्हा तर घेतच नव्हतों. यामुळें कुटुंबांतील मंडळींस मी तऱ्हेवाईक मुलगा असा भासूं लागलों. पण टिळकांची वाणीच इतकी प्रभावी होती कीं घेतलेलें व्रत सोडण्याची आम्हांला कधीं बुद्धीच झाली नाहीं. घेतलेलें व्रत पालन करीत व टिळक, खाडिलकर, शिवरामपंत परांजपे यांच्या वाङ्मयाचा अभ्यास सतत करून मीं माझा देशसेवेंत आयुष्य घालविण्याचा उद्देश नजरेसमोरून हलूं दिला नव्हता. विद्याभ्यास पूर्ण होत आला त्या वेळींच लो. टिळक दिवंगत झाले. आणि महात्मा गांधींनीं असहकारितेची चळवळ राष्ट्रांत सुरू केली. या चळवळीस राष्ट्रसभेनें मान्यता देऊन लोकांना चळवळींत पडण्याचें निमंत्रण दिलें. राष्ट्रसभेचें निमंत्रण हीच तिची आज्ञा मानून मीं राष्ट्रीय शिक्षणास वाहून घेण्याचें ठरविलें. आणि येवल्यास टिळक विद्यालयांत येऊन १९२१ सालीं दाखल झालों.

## गांधींचें आकर्षण

महात्मा गांधींचें नांव मीं प्रथम १९१२ सालीं ऐकलें होतें. १९१५ सालीं ते हिंदुस्थानांत आले. आणि त्यांनीं सरकारशीं जे धैर्यानें सामने दिले ते पाहून मलाच केवळ नव्हे, तर टिळकांच्या अनेक अनुयायांना त्यांचें आकर्षण वाटलें; मात्र मधून मधून ते टिळकांना राष्ट्रसभेंत विरोध करीत, तें आम्हांला आवडत नसे. ब्रिटिश मालावर बहिष्कार घालण्याच्या चळवळीला नापसंती दर्शवून ते जेव्हां म्हणाले कीं, अशा बहिष्कारांत इंग्लिशांचा द्वेष प्रकट होतो त्या वेळीं आम्ही तरुण मंडळी बुचकळ्यांत पडलों. गांधी एक कोडें आहे असें आम्हांला वाटलें. मवाळाप्रमाणें गांधी एकीकडे सरकारला भीत नाहींत, तुरुंगवास आनंदानें पत्करतात आणि दुसरीकडे 'ब्रिटिशांचा द्वेष करूं नका' म्हणून सांगतात हें कसें, हें आम्हांला समजत नसे. शत्रु या शब्दाचा सहचारी भाव द्वेष हा आहे अशी आमची ठाम समजूत. शिवाजीमहाराज किंवा प्रभु रामचंद्र यांचीं चरित्रें वाचून आम्ही मनांत म्हणत होतों कीं, शत्रूचा द्वेष किंवा वैर त्याच्या मृत्यूपर्यंतच ठेवावें, त्याच्या मरणानंतर त्याच्या प्रेताची विटंबना करूं नये. पण आपलें अनहित करणाऱ्या लोकांचा द्वेष कां करावयाचा नाहीं हें कांहीं आम्हांला कित्येक वर्षें कळलेंच नाहीं. तरी पण आम्हांला निःस्वार्थी, धीट व त्यागी पुढाऱ्याच्या मार्गे जाण्याची आवड होती. म्हणून १९२१ सालीं गांधींचें पुढारीपण मान्य करून राष्ट्रसभेच्या एका कार्यक्रमांत मी अंशभागी झालों.

राष्ट्रीय शाळेंत आल्यानंतर 'यंग इंडिया' मी नेमानें वाचीत असें. त्यांतील विचारसरणी मला अभिनव वाटे. सर्वच विचार त्या वेळीं कळत नसत. गांधी त्यागाचे जे जे उपक्रम सुरू करीत ते मान्य करण्यांत आम्हांला विशेष अडचण वाटली नाहीं. कारण टिळकांच्या तालमींत आम्ही वाढलेलों होतों. खादी जाड आहे, ती महाग पडते अशी कल्पना सुद्धां मनाला शिवली नाहीं. हौसेनें लष्करांत गेलेल्या शिपायाला बंदूक कधीं अवजड वाटली आहे काय ? श्रमाच्या मानानें लष्करांतील पगार कमी असतो असें जसें लढवय्या मनास वाटत नाहीं, त्याप्रमाणें गांधींचा कार्यक्रम पार पाडतांना पडणाऱ्या कष्टाचें त्या वेळच्या तरुणांना कांहींच वाटत नव्हतें. आमच्या डोळ्यांपुढें स्वराज्य हें ध्येय होतें. हें ध्येय प्राप्त करून घेण्याकरितां गांधी सतत परिश्रम करीत होते. स्वराज्याकरितां ते वेडे झाले होते. हें पहात असल्यामुळें त्यांचा कार्यक्रम आम्हांला व्यवहार्य वा अव्यवहार्य याचा विचार करण्याची बुद्धीच कधीं झाली नाहीं. पुढारी निवडतांना मात्र आम्हीं खूप विचार केला. तो आमच्या परीक्षेंत उतरल्यावर मग पुन्हां पुन्हां नसत्या शंका उत्पन्न करणें हें आम्हांस पटत नव्हतें. "एकाचें अंगीं लावावें ठेवुनि" हा धडा आम्हांला पाठ होता. ह्याला कांहीं लोक अंधभक्ति म्हणत. परंतु मला कधींहि मी अंधभक्त आहे असें वाटलेंच नाहीं. गांधींच्या सत्याग्रहामागील भूमिका मला १९३२ पर्यंत नीट समजलीच नव्हती. इंग्रजांशीं










झुंज एवढीच गोष्ट समजली होती. आणि तेवढी गांधींच्या मागें जाण्याला मला पुरेशी वाटत होती.

१९३२ सालीं पूज्य विनोबाजी धुळें जेलमध्यें प्रथम पडले. दोन महिने त्यांचा सहवास मला मिळाला. विनोबांनीं मला विशिष्ट दृष्टि दिली. या दृष्टीनें मी गांधी-चरित्राचें अवलोकन करूं लागलों, तसतसें गांधी-कोडें मला उलगडूं लागलें आणि मग गांधींचें तत्त्वज्ञान समजून घेण्याची माझ्या अंगांत पात्रता येऊं लागली. लो. टिळक, देशबंधु दास, पं. नेहरू हे पुरुष असे आहेत कीं, त्यांच्या चारित्र्याचा धागा चटकन् आपल्या हातांत येतो आणि कोणत्या वेळीं ते काय करतील याचा अंदाज बांधणें कठिण जात नाहीं. पण गांधींचें तसें नव्हतें. यामुळें गांधींची विचारसरणी आणि जीवन-क्रमाचें रहस्य समजावून घेणें ही गोष्ट कठिण होऊन बसली. माझें सद्भाग्य कीं मला गांधी-चरित्राच्या बिकट अटवींतून हात धरून नेणारे थोर पुरुष मला भेटले! गांधींच्या आकर्षणांत मी आलों. त्यामुळें जीवनाचें विशाल, भव्य असें स्वरूप मला दिसून आलें. सद्गुणाची आवड लो. टिळकांनीं आमच्या मनांत उत्पन्न करून ठेवली होती. त्यामुळें कूपमंडूक वृत्ति आमची बनूं शकली नाहीं. लो. टिळकांनीं आम्हांला कौटुंबिक विहिरींतून राष्ट्रीय विहिरीच्या पवित्र गंगेंत नेऊन सोडलें आणि गांधींनीं राष्ट्रीय वृत्तीच्या प्रतिक्षणीं भव्य स्वरूप धारण करणाऱ्या गंगाप्रवाहांतून आम्हांला न कळत विशाल जीवनाच्या अद्भुत, अथांग सागरांत नेऊन सोडलें आहे.

## कार्यांतून कार्य

राष्ट्रीय शाळेंत ज्यावेळीं मी आलों त्या वेळीं मी माझ्या मनाशीं असा संकल्प केला होता कीं आपल्या सर्व शक्ती संस्थेच्या सर्वांगीण उन्नतींत खर्च करायच्या. राष्ट्रसेवक विद्यार्थी निर्माण करण्याची कल्पना आम्हीं मनाशीं बाळगली होती. पुढें काम करतां करतां असें आढळून आलें कीं राष्ट्रीय शाळा टिकवायची तर आपल्या भोंवतालचें वातावरण राष्ट्रीय असें तयार केलें पाहिजे. यामुळें गांवांतलि अनेक सार्वजनिक कार्यांत भाग घ्यावा लागत असे. काँग्रेस कमिटीचें काम, राष्ट्रीय शाळेंतील शिक्षकांकडेच बरेंचसें येऊं लागलें. पुढें पुढें गांवांतील अनेक चळवळींचें केंद्र, ही संस्था होण्यास वेळ लागला नाहीं.

१९२१–२२ सालीं मुळशी–सत्याग्रह चालू होता. या चळवळींत राष्ट्रीय शाळेंतील शिक्षकांनीं स्वयंसेवक म्हणून भाग घ्यावा अशी त्या वेळच्या महाराष्ट्रांतील थोर पुढाऱ्यांनीं आदेश दिला होता. म्हणून आम्हीं टिळक विद्यालयांतलि शिक्षकांनीं असें ठरविलें कीं आपण एक एक शिक्षक या सत्याग्रहाला पाठवूं. १९२२ च्या अखेर मी या सत्याग्रहासाठीं मुळशीला गेलों. येरवड्याच्या तुरुंगांत माझा अनेक थोर राष्ट्रसेवकांशीं परिचय झाला. चिंचवडच्या शाळेंतील शिक्षक मला आपला बंधु असें मानूं लागले. सेनापति बापटांचा सहवास मला दोन महिने मिळूं शकला. त्यांच्या थोरवीची कल्पना मला तेथें आली. मुळशी–सत्याग्रहामुळें माझा टिळकमहाराष्ट्रविद्यापीठांतील मंडळींशीं संबंध आला. लवकरच मी त्यांच्या नियामक–मंडळांत निवडला गेलों आणि आज २० वर्षें त्यांच्या कार्यकारी मंडळांत आहे.

मी ज्या कालाबद्दल लिहीत आहे त्या कालांत काँग्रेसच्या पदाधिकाराकरितां आजच्याइतकी स्पर्धा नव्हती. यामुळें तालुका, जिल्हा व प्रांत यांतील काँ. कमिट्यांत मी अनेक वर्षें राहूं शकलों. गांधी-सेवा–संघानें मला १९३६–३७ च्या सुमारास आपला सभासद म्हणून निवडलें. माझा मूळचा कल एकेजागीं बसून काम करण्याचा होता. त्यामुळें मी येवल्याबाहेर फारसा जात नसें. १९३० सालच्या कायदेभंगाच्या चळवळींत येवले–गांवचें धुरीणत्व मजकडे आलें. लोकांना शिस्तीचें वळण लावल्याशिवाय सत्याग्रह फोल होईल, म्हणून मी येवल्यास सुरू झालेल्या चळवळींत लोकांना कायदेभंग करूं न देतां दारूबंदी, परदेशी कापडावर निरोधन अशासारखीं विधायक कामें करायला सांगितलें. लोकांमध्यें शिस्त उत्पन्न झाल्यावर मग मी स्वतः कायदेभंग केला. माझ्यामागून अनेक लोक तुरुंगांत आले. ३२ सालीं चळवळ करण्यास सरकारनें अवसरच दिला नाहीं. आमची संस्था बेकायदा ठरली. शिक्षक आणि विद्यार्थी पुढील दोन वर्षांत पांगले. १९३४ सालीं तुरुंगांतून परत










आल्यावर 'विनयमंदिर' नांवाची संस्था काढली. राष्ट्रीय शाळेंतील पूर्वीचे दोन शिक्षक मला या कामांत मिळाले. विनयमंदिरानें दोन तऱ्हेचें काम करायचें ठरविलें होतें. एक ग्रामसेवा आणि दुसरें कॉंग्रेस कमिटीला हरप्रकारें साहाय्य देणें. येवल्यापासून ५ मैलांवर चिचोंडी या नांवाचें एक खेडें आहे. तेथें आमचा आश्रम ४।५ वर्षें होता. या आश्रमाचा मला जो अनुभव आला त्याचें कथन 'खेड्यांची सेवा' या पुस्तकांत मीं केलें आहे. कॉंग्रेसनें निवडणुका लढविण्याचें ठरविल्यावर कॉं. कमिटीचें काम वाढलें आणि पुष्कळसा वेळ अध्यक्ष या नात्यानें मला द्यावा लागला.

## माझीं कांहीं पुस्तकें

१९४० आणि ४२ च्या चळवळींत भाग घेऊन ४३ सालीं ज्या वेळीं मी परत आलों त्यावेळीं माझी प्रकृति बरीच खालावली होती. त्यानंतर मला कोणच्याहि दगदगीच्या कामांत पडणें अशक्य झालें. मग मला जो सार्वजनिक कार्यांत अनुभव आला होता, तो निरनिराळ्या पुस्तकांतून लिहावयाचें ठरवून त्याप्रमाणें पुस्तकें लिहिलीं. राष्ट्राचें नेतृत्व स्वीकारायचें म्हणजे काय व त्याला काय लायकी लागते व अनुयायांचीं कर्तव्यें कोणतीं हें 'पुढारी व अनुयायी' या पुस्तकांत दाखविलें आहे. हल्लींच्या लहान दुय्यम पुढाऱ्यांनीं खेड्यांत जावयाचें ठरविलें तर तेथील परिस्थिति काय आहे व तेथें काय काम करतां येईल हें 'खेड्याच्या सेवे'त दाखवून दिलें आहे. आपलें कुटुंबजीवन निर्मळ, उजळ व ध्येयवादी झाल्याशिवाय राष्ट्रोद्धार होणार नाहीं हें लोकांनीं ओळखावें म्हणून 'कुटुंबजीवन' हें तिसरें पुस्तक लिहिलें. सार्वजनिक जीवन सोयीचें व आल्हादकारक व्हावें म्हणून कोणत्या शिष्टाचारांचें पालन व्हावें हें 'शिष्टाचार' पुस्तकांत दाखविलें. अशा रीतीनें हीं चार पुस्तकें एकांतून एक निर्माण झालीं आहेत. सेवादलाशीं माझा निकट संबंध होता. सेवादलाला मी राष्ट्रीय शाळाच समजत आलों व त्याच्याकरितांच वर उल्लेखिलेलीं पुस्तकें लिहिलीं व दलानें तीं आपल्या सैनिकांना वाचण्यास पाठविलीं होतीं.

## कांहीं सामाजिक परिणाम

अशा रीतीनें माझा ज्या थोड्या संस्थांशीं संबंध आला त्याबद्दल आतांपर्यंत लिहिलें. आतां या माझ्या सेवेचा परिणाम काय झाला असा प्रश्न मला विचारण्यांत आला आहे. याचें उत्तर देणें मला कठिण आहे. माझ्याबरोबर अनेक थोर गृहस्थ काम करीत होते. आम्हीं सर्व आणि कॉंग्रेस संस्था यांचा परिणाम सांगावयाचा तर असें सांगतां येईल कीं, येवल्यांतील लोकांना शिस्तीनें काम करण्याची संवय लागली. कार्यक्रम वक्तशीर करण्याबद्दल येवल्यानें चांगलाच लौकिक संपादन केला. विशेष महत्त्वाची गोष्ट म्हणजे १९४६ अखेरपर्यंत कॉंग्रेस कमिटीमध्यें भांडणें अशीं मुळींच झालीं नाहींत. कॉं. कमिटींतच केवळ नव्हे तर गांवांतील पक्षोपपक्षांतहि कोणी वर्दळीवर येऊन बोलत नव्हते. येवल्यांत कॉंग्रेसप्रमाणें हिंदुसभा, सनातनी पक्ष, ब्राह्मणेतर पक्ष असे पक्ष होते. पण सार्वजनिक जागेवर एका पक्षानें दुसऱ्या पक्षाची नालस्ती केली असें कधींच घडलें नाहीं. तेथील टिळक मैदानाचें पावित्र्य सर्वांनींच पाळलें. क्वचित् कोणी वावगा शब्द उच्चारला तर जनता तें सहन करीत नव्हती. १९२१ पासून तों ४६ पर्यंत हिंदुस्थानांत अनेक ठिकाणीं हिंदु-मुस्लिमांचे दंगे झाले. पण येवल्यांत सहा हजार मुसलमानांची वस्ती असून देखील २५ वर्षांत एकदांहि दंगा येवल्यांत झाला नाहीं. रमझान-ईदच्या दिवशीं गांवांतील प्रतिष्ठित हिंदु-मुसलमान एकत्र येत, आणि दोन ज्ञातींच्या एकोप्याची महती गात. विशेष सांगण्याची गोष्ट म्हणजे या संमेलनांत हिंदुसभेचे लोकहि भाग घेत असत.

## गांधीवादी विचारसरणी आणि महाराष्ट्र

एक प्रश्न असा विचारण्यांत आला आहे कीं, महाराष्ट्राच्या मनोभूमींत गांधीवादी विचारसरणी तितकीशी रुजली नाहीं असा एक प्रवाद आहे. त्याबद्दल माझें मत काय आहे ? याबद्दल असें म्हणतां येईल कीं गांधीवादी विचारसरणी जितकी इतर प्रांतांत रुजली आहे तितकीच महाराष्ट्रांतहि रुजली आहे. फक्त फरक इतकाच कीं, इतर प्रांत गांधींना उघड व कसून विरोध वर्तमानपत्रांतून करीत नाहींत. आणि महाराष्ट्रानें मात्र आपलें वाक्चातुर्य गांधींची विचा-

रसरणी सोडून काढण्यांत खर्ची घातलें. यामुळें महाराष्ट्राचा विशेष बोभाटा झाला. खुद् गुजरातचीच गोष्ट घ्या ना. गुजरात हा गांधींच्यामागें होता असा लोकांचा समज आहे. परंतु वस्तुस्थिति अशी आहे कीं, गुजरात वल्लभभाईच्यामागें आहे. १९४० सालीं ज्या वेळीं गांधी व काँग्रेस यांच्यांत मतभेद पराकाष्ठेला गेले आणि वल्लभभाईंना गांधींच्या प्रतिपक्षानें आपल्यांत ओढलें त्या वेळीं गुजरात प्रां. काँ. कमिटीनें वल्लभभाईच्याप्रमाणें मत दिलें. गांधीवादी विचारसरणी जर इतर प्रांतांत रुजली असती तर उत्तर हिंदुस्थानांत जे रक्तपात झाले ते झाले नसते! गांधीवधानंतर महाराष्ट्रांत बरीच जाळपोळ झाली खरी; परंतु रक्ताच्या नद्या येथें वाहल्या नाहींत. गांधीवादी विचारसरणी तितकीशी महाराष्ट्रांत रुजली नाहीं याचें कारण आमचे पूर्वसंस्कार हे होत. गांधींची विचारसरणी ही अभिनव होती. सात्त्विक मनुष्याला ती पटली तरी ती आत्मसात् करणें सोपें नाहीं. अनेक पिढ्यांचे संस्कार २०, २५ वर्षांत कसे पालटणार? लोक गांधींच्या बरोबर धावूं शकले नाहींत याचा अर्थ गांधींची विचारसरणी त्यांना पटली नाहीं असें नाहीं. तसें असतें तर गांधींच्या पाठीमागें २५ वर्षें राहून काँग्रेस कमिट्यांना अलौकिक यश मिळालेंच नसतें. हिंदुसभेचा किंवा लोकशाही पक्षाचा सोपा, विनासायासाचा मार्ग सोडून महाराष्ट्रानें खडतर तुरुंगवास भोगलाच नसता. धारासनाच्या सत्याग्रहांत घोडे अंगावर नाचत असतां सत्याग्रहींनीं हूं कीं चूं केलें नाहीं! तुरुंगांत फटके मुकाट्यानें खाल्ले. मुंबईच्या आझाद मैदानावर लाठीचे तडाखे खाऊन रक्तबंबाळ होणाऱ्या स्त्रीपुरुषांना गांधींची विचारसरणी मान्य नव्हती असें कसें म्हणतां येईल? १०० टक्के गांधी होणें ही गोष्ट कोणालाहि आज अशक्य आहे. आम्हीं महाराष्ट्रीयांनीं गांधींच्या मागें जाण्याचा आटोकाट प्रयत्न केला कीं नाहीं एवढाच प्रश्न आहे. या प्रश्नाचें उत्तर आम्हीं अत्यंत समाधानकारक दिलें आहे यांत शंका नाहीं. श्री. शंकरराव देव, श्री. अण्णासाहेब दास्ताने, श्री. अप्पासाहेब पटवर्धन, आचार्य भागवत, आचार्य जावडेकर, श्री. हरिभाऊ फाटक, पूज्य विनोबाजी, आचार्य धर्माधिकारी, श्री. बाळूभाई मेहता, श्री. नानासाहेब ठकार, श्री. बाळासाहेब खेर इत्यादि कर्तबगार, बुद्धिमान् मंडळी गांधींच्या मागें आहेत यावरून गांधींची विचारसरणी महाराष्ट्रांत जेवढी रुजूं शकते तेवढी रुजली आहे असें विनदिक्कत म्हणतां येतें. महाराष्ट्रानें आरंभ चांगला केला व भविष्यकालीं ही विचारसरणी चांगली रुजवून ती पुष्पफलान्वित झालेली दिसेल यांत शंका नाहीं.

## गांधीवादाचें भवितव्य

गांधीवादी विचारसरणी टिकविण्याचे मार्ग दुसरे विशेष कांहीं नसून विधायक कार्यक्रम ज्यांनीं अंगीकारला आहे त्यांनीं तो निष्ठापूर्वक चालविला म्हणजे गांधींची विचारसरणी यथाकाल पूर्णांशानें प्रभावशाली झालेली दिसेल. मला वाटतें कीं राष्ट्रावर प्रथम समाजवादी विचारसरणीची छाप बरीच पडेल. मोठमोठ्या धंद्यांचें राष्ट्रीयीकरण झाल्यावरहि देशांत सुखशांति नांदत नाहीं असें दिसून आल्यावर मग लोक गांधी–विचारसरणीचा आजच्यापेक्षां विशेष कटाक्षानें व आस्थेनें विचार करूं लागतील. त्या वेळीं गांधी–विचारसरणीचा अग्नि जिवंत राहिलेला त्यांना दिसला पाहिजे. प्राचीन काळीं अग्निहोत्री ज्याप्रमाणें अग्नि सतत जिवंत ठेवण्याचें काम करीत, त्याप्रमाणें विधायक कार्यकर्त्यांनीं विधायक कामें करीत राहून गांधी–विचारसरणी प्रत्यक्ष स्वरूपांत भविष्यकालीं लोकांना दाखविण्याची तजवीज केली पाहिजे. हें कार्य केवळ गांधी–वाङ्मयाच्या प्रसारानें व्हावयाचें नाहीं. आज आपण मंत्र व योगविद्या यांच्या प्रभावाबद्दल पुष्कळ वाचतों. पण मंत्राचें अलौकिक सामर्थ्य दाखविणारी आचारशील माणसें आपणांला दिसत नाहींत; यामुळें मंत्र आणि योगविद्या यांवर आपला विश्वास बसणें कठिण जातें; त्याप्रमाणें गांधी–विचारसरणी आचरणांत आणणारे भविष्यकाळीं लोकांना दिसत राहिले पाहिजेत. तरच त्या विचारसरणीचा प्रभाव चांगला पडेल. म्हणूनच वर सांगितल्याप्रमाणें विधायक कार्यक्रम अंमलांत आणून तो जतन करणाऱ्यांवर जबाबदारी विशेष पडते.

## कार्याचें समाधान

आणखी एका प्रश्नाचें उत्तर अगदीं थोडक्यांत आणि स्पष्टपणें देणें मला शक्य वाटतें. प्रश्न आहे कीं, मागील कार्याबद्दल मला समाधान वाटतें का?

होय, मला पूर्ण समाधान वाटतें. आपला पुढारी निवडण्यांत माझी चूक झाली नाहीं. मी ज्यांना पुढारी मानलें त्याला अखिल जगानें मानवंदना दिली. जगांतले तत्त्वज्ञ, सेनानायक व शास्त्रज्ञ यांनी गांधींची विचारसरणी जगाचें कल्याण करील अशी ग्वाही दिली. तेव्हां गांधींच्या मार्गे जाण्याचें ठरविलें यांत मला सहर्ष समाधान कां वाटूं नये? ज्या कार्यांत मी पडलों त्यांत मला माझ्या भाग्यानें उत्तम सहकार्य मिळालें. इतरांच्या मानानें माझा जीवनमार्ग सुकरच होत गेला. जनतेनें अनेक प्रकारें मीं सुरू केलेल्या उपक्रमाला उचलून धरलें. यामुळें कटु अशा स्मृती मला जवळजवळ नाहींतच. मला जो अल्पस्वल्प विरोध झाला तो जखमाच्या स्वरूपाचा झाला नसून कांटे टोंचण्याच्या स्वरूपाचा होता. यामुळें मला त्याचें विशेष कांहीं वाटलें नाहीं. देशाच्या स्वातंत्र्याच्या लढ्यांत माझ्यासारख्या दुर्बल शरीराच्या माणसास भाग घेतां आला हें महत् भाग्य नाहीं काय? दुर्बल माणसासहि स्वातंत्र्याच्या लढ्यांत भाग घेतां येण्याची योजना ज्या महापुरुषाकडून केली गेली त्याला नित्य अभिवादन करीत असतां समाधानाचे श्वास आपोआप सुटल्याशिवाय रहात नाहींत.

माझ्या आशावादास चढउतार असा कधींच झाला नाहीं. गांधी तुरुंगांत गेल्यावर केसरी–पक्ष जोरांत होता. गांधींच्याबद्दल पुष्कळांची निष्ठा कमी होऊं लागली होती. अशा वेळीं देखील गांधींच्या विचारसरणीचा जय झाल्याशिवाय रहाणार नाहीं याबद्दल मला केव्हांच शंका वाटली नाहीं. राष्ट्रीय शाळेचा फंड संपुष्टांत आला तरी देखील माझा आशावाद कमी झाला नाहीं. याचें कारण मला वाटतें एकच होतें. तें म्हणजे टिळक व गांधी हे जे दोन गुरू ते पूर्ण आशावादी होते. कच्च्या गुरूचे आम्ही चेले नव्हतों म्हणूनच आमचा आशावाद टिकून आहे. टिळक म्हणत, "संकट न येतां कार्य तडीस गेल्यास मग त्यांत पुरुषार्थ तो काय राहिला?" टिळक एकदां असेंहि म्हणाले कीं मजवर संकट कधीं येईल व माझी परीक्षा कधीं उतरेल असा ध्यास मनाला लागला पाहिजे. हीं वाक्यें ज्यांच्या हृदयांवर कोरलीं गेलीं त्यांच्याजवळ नैराश्य कसें बरें येईल? १९२१ सालीं मी जितका आशावादी होतों, तितकाच आज २८ वर्षांनंतरहि आहे. हिंदुस्थानचें भवितव्य सदैव उज्ज्वलच रहाणार. याचें कारण हिंदुस्थानच्या आध्यात्मिक वैभवाची वाढ करण्यांत थोर थोर महात्म्यांची पुण्याई खर्ची पडली आहे. ज्या राष्ट्रांत टिळक व गांधी जन्मले त्या राष्ट्राच्या भवितव्याविषयीं शंका तरी कां बाळगावी?

---

## क्षयरोगनिवारणाचे प्रयत्न—

ग्रेटब्रिटनमधील क्षयरोगनिवारक राष्ट्रीय संस्थेला ५० वर्षें पूर्ण होऊन त्या संस्थेचा सुवर्णमहोत्सव डिसेंबर १९४८ मध्यें नुकताच साजरा झाला. ७ वे एडवर्ड यांच्या हस्तें ही संस्था सुरू झाली. सुरुवातीचें भाषण करतांना एडवर्ड यांनीं त्या वेळीं जो संस्मरणीय प्रश्न समाजाला केला होता कीं, '–(If preventible why not prevented?') जर या रोगाचें निवारण करणें शक्य आहे, तर मग कां तें निवारण होत नाहीं?'–त्या प्रश्नाची तीव्रता आजहि तितकीच आहे.––१८९८ सालीं जेव्हां ही संस्था सुरू झाली, त्या वर्षी ब्रिटनच्या ३ कोट ६० लक्ष लोकसंख्येपैकीं क्षयरोगानें मेलेल्या माणसांची संख्या सत्तर हजार होती. आज ५० वर्षांनंतर ब्रिटनची लोकसंख्या ४ कोट ८० लक्ष आहे. त्यापैकीं गेल्या वर्षी क्षयरोगाला बळी २७ हजार पडले.

हिंदुस्थानमध्यें दरवर्षी ५ लक्ष लोक क्षयरोगाला बळी पडतात. १९३९ सालीं येथेंही क्षयरोगप्रतिबंधक संस्था स्थापन झाली आहे.

हिंदुस्थानांत खरोखरी चारहजार क्षयरोगचिकित्सालयांची आवश्यकता आहे, परंतु आज प्रत्यक्ष सुमारें १५० च आहेत.








श्री. अच्युतराव पटवर्धन

# समाजवाद व गांधीवाद यांचा सहयोग?

[ प्रस्तुत लेख हा महाराष्ट्र ग्रंथभांडार, कोल्हापूर, यांच्या तर्फे लवकरच प्रसिद्ध होणाऱ्या 'गांधीवाद–समाजवाद' या पुस्तकांतून लेखक व प्रकाशक यांच्या कृपेनें घेतला आहे. —का. सं. ]

हिन्दुस्थानमध्यें समाजपरिवर्तनाची जी परंपरा गेल्या वीस वर्षांत रूढ झाली आहे त्या पद्धतीवर महात्मा गांधींच्या व्यक्तिमत्त्वाची असामान्य छाप पडली आहे. या परंपरेचें स्वरूप केवळ परकीय सत्तेचा विनाश करणें असें मर्यादित व नकारात्मक कधींच नव्हतें. स्वराज्य सुद्धां इंग्रजी सत्तेमुळें गुदमरलेल्या कोटयवधि जनतेच्या जीवन-विकासाचें साधन म्हणून मानण्यांत येत असे. पण या साधनाचें महत्त्व इतकें होतें कीं कांहीं काळपर्यंत साधन हेंच साध्य होणें अपरिहार्य होतें. हिन्दुस्थान स्वतंत्र झाल्यानंतर या साधनाचा उपयोग जनतेचें जीवन समृद्ध करण्यासाठीं कसा करावा हा प्रश्न उभा राहिला. हिन्दुस्थानांत आजच्या घटकेला शंभर टक्के भांडवलदारी समाजपद्धति व्यवहार्य नाहीं. समाजाच्या विकासाचें साधन म्हणून अशी अर्थव्यवस्था आवश्यक आहे असाहि आग्रह कोणी उघडपणें धरूं शकत नाहीं. हिन्दी भांडवलदार सुद्धां आपल्या सोयीप्रमाणें गांधीवादाच्या आड आपला वर्गस्वार्थ झांकण्याचा प्रयत्न करतात. सत्ता काँग्रेसच्या हातीं आहे आणि आपली गांधी–तत्त्वज्ञानावर निष्ठा आहे असा दावा काँग्रेस करते. परंतु संपूर्ण सत्ता काँग्रेसच्या हातीं आल्यापासून देशांतील भांडवलदार-वर्ग अधिक प्रबळ झाला का, किंवा त्याचें प्रभुत्व व आर्थिक जीवनावरील त्याची पकड अधिक मजबूत झाली का, याचा बारकाईनें विचार केला पाहिजे. जर भांडवलदारी, नफेबाजी अधिक फोफावली असेल तर आपल्या गांधीवादी निष्ठेच्या आचारप्रणालीमध्यें कांहीं तरी गंभीर न्यून राहिलें आहे असें मान्य करावें लागेल; व तें न्यून निश्चित कुठलें आहे याची स्पष्ट चिकित्सा करावी लागेल.

## गांधीवादानें समाजवाद साध्य होईल का?

या दृष्टीनें विचार करितांना असें दिसून येईल कीं गांधीवाद समाजवादाप्रमाणें समाजाच्या पुनर्रचनेचें नवें 'दर्शन' सध्यां तरी बनूं शकत नाहीं. जोंपर्यंत मोठमोठे कारखाने, शस्त्रसज्ज सेना इत्यादि साधनांवर राज्यसत्ता अधिष्ठित आहे तोंपर्यंत गांधीजींच्या विचारसरणीशीं सुसंगत अशी समाजव्यवस्था निर्माण होऊं शकत नाहीं. उलट सर्व उत्पादन–साधनांचें स्वामित्व वैयक्तिक मालकशाहीच्या हातून हिरावून घेऊन हीं उत्पादन-साधनें व्यक्तिस्वार्थाच्या दृष्टीनें वापरलीं जाऊं नयेत हा समाजवादाचा आग्रह आहे. विकेंद्रित उत्पादनपद्धति तूर्त अमलांत आणणें व्यवहार्य नाहीं असें मान्य केलें तर वर्गविहीन समाज निर्माण करण्यासाठीं समाजवाद हेंच एकमेव साधन उरतें. इंग्रजी सत्तेचा विनाश–ज्याला आपण स्वराज्य असें म्हणत असूं– हें साधन असून साध्य बनलें, त्याचप्रमाणें भांडवलदारी पद्धतीचा विनाश हेंहि साधनच आहे; परंतु तूर्त तें साधन उपलब्ध करणें हेंच साध्य बनतें. स्वराज्यनिर्मितीसाठीं गांधीवादानें परिणामकारक प्रयत्नप्रणाली दिली. हीच कार्यपद्धति समाजवाद निर्माण करण्यासाठीं कितपत उपयुक्त होईल हा प्रश्न विचारार्ह आहे.

वर म्हटल्याप्रमाणें आजच्या परिस्थितींत मोठमोठे कारखाने आर्थिक जीवनाचा आधार बनलेले आहेत. आणि जोंपर्यंत ग्रामीण जीवनाच्या विकासा-








## समाजवाद व गांधीवाद यांचा सहयोग ?

मधून उत्पन्न झालेल्या विकेन्द्रित अर्थव्यवस्थेचे स्वयंपूर्ण घटक आस्तित्वांत येत नाहींत, निदानपक्षीं तोंपर्यंत तरी या कारखान्याचा विनियोग वर्गस्वार्थ व वैयक्तिक नफेबाजी यांसाठीं केला जाऊं नये इतकें तरी गांधीवादी–समाजवादी विचारसरणीस मान्य झालें पाहिजे. जोंपर्यंत कारखाने खासगी मालकीचे आहेत तोंपर्यंत ग्रामीण जीवनाच्या विकासाला त्यांचें खग्रास ग्रहण लागणें अपरिहार्य आहे. ग्रामीण जीवनाच्या विकासाच्या आड शहरी उत्पादन येऊं नये हा हेतु असला तर त्यासाठीं एकमेव उपाय योजनाबद्ध उत्पादन, नियंत्रण व राष्ट्रस्वामित्व हाच आहे. खासगी मालकी कायम राखून हा हेतु साध्य व्हावा असें कोणाला वाटत असेल तर त्यानें गेल्या पंधरा महिन्यांत कापड–नियंत्रण–व–वांटप-प्रयोगाचा बोजवारा कसा उडाला याचें परिशीलन करावें.

तूर्त तरी गांधीवाद हें साध्य बनूं शकत नाहीं. ती समाजपरिवर्तनाची एक पद्धति बनते. कारण वरील विवेचनानुसार आमचें तात्कालिक साध्य समाजवाद आहे असें मान्य केलें तरी समाजवादी समाज निर्माण करण्यासाठीं जी संघटना उभी करावयाची तिच्या तंत्रांत पाश्चात्य योजना व हिंदी परिस्थितीचें वैशिष्ट्य यांचा तुलनात्मक विचार केल्यावर नवीन बदल आवश्यक वाटतील. या दृष्टीनें समाजवादाच्या ध्येयसिद्धीसाठीं गांधीवादी आचारतंत्र कितपत उपयुक्त ठरेल याबद्दल आस्थापूर्वक विचार करणें आवश्यक आहे.

परंतु हा प्रयत्न यशस्वी होण्यासाठीं गांधीवादाच्या नांवाखालीं स्वतःला विकणारा एक नवा भांडवलदारीचा पर्याय प्रचारिला जात आहे. त्याचा परामर्ष घेतला पाहिजे. कॉंग्रेस व गांधीजी यांचें जवळजवळ तीस वर्षांचें तादात्म्य विचारांत घेतां आजच्या कॉंग्रेसचें राजकीय धोरण हेंच व्यवहार्य गांधीवादी धोरण आहे असा समज पसरविणें सोपें जातें. परंतु या प्रयत्नामधून गांधीवादी परंपराच वर्गविग्रहाच्या तीव्रतेंत विरून जाण्याची भीति आहे. गांधीवादी विचारसरणी प्राधान्यतः मितपरिग्रहाच्या तत्त्वावर उभारली आहे. या दृष्टीनें महात्मा गांधींच्या हिंदी राजकीय जीवनांतील पदार्पणाचा प्रसंग मननीय आहे. हिंदु–विश्वविद्यालयाच्या वार्षिकोत्सवाचा समारंभ; रत्नजडित मुकुटांनीं, आभरणांनीं आणि अलंकारांनीं मढविलेले अनेक राजेमहाराजे व्यासपीठावर बसलेले; अशा प्रसंगीं दक्षिण आफ्रिकेंतील लढ्यांतून सत्याग्रहाचें शस्त्र संपादन करून आलेला हा कार्यकर्ता, महात्मा गांधी, हिंदी भाषेंतून आपले विचार सांगूं लागला: ‘प्रामाणिकपणें जगणाऱ्या माणसाजवळ हा द्रव्यसंचय कसा होऊं शकेल ? अशा ऐतखाऊ लुटारूंचा आदर्श का आपण तरुण पिढीपुढें ठेवणार ? ’. आज हेच राजेमहाराजे व त्यांचीं लक्षावधि रुपयांचीं वर्षासनें सरदार वल्लभभाई हे वंशपरंपरा कायम करीत आहेत. एक ना दोन अनेक दाखले देऊन हेंच सिद्ध करतां येईल कीं कॉंग्रेसच्या राजवटींत बेलगाम नफेबाजीच्या प्रवृत्तीला मूठमाती मिळालेली नाहीं. उलट राजाश्रय मिळाला आहे.

### अन्योन्याश्रयी अर्थसत्ता व राज्यसत्ता

समाजवादी विचारसरणीकडून गांधीवादी विचारसरणीला शिकण्यासारखा कांहीं सिद्धान्त असला तर प्रथम त्याचें विवेचन, परिशीलन केलें पाहिजे. म्हणजे उभयप्रवृत्तींच्या लोकांना परस्परांची विचारसरणी समजणें अधिक सोपें जाईल. हा सिद्धान्त अर्थसत्ता व राज्यसत्ता यांच्या अन्योन्याश्रयाचा आहे. बिरला शेट नुसत्या कारखान्यांची मालकी घेऊन बसते व फक्त नफा खाते तर तीहि एक अपरिहार्य आपत्ति म्हणून मान्य करण्याची तयारी पुष्कळ लोकांनीं दाखविली असती. परंतु भांडवलदारीचें हेंच वैशिष्ट्य आहे कीं अर्थसत्तेचा उपयोग राजसत्तेला आपल्या अंकित करण्याकरितां ती करते व तसें करण्यासाठीं भांडवलदारांजवळ अमर्याद साधनें असतात. गरीब बिचारे कॉंग्रेसवाले पंचवीस पंचवीस वर्षें तुरुंगवास भोगून, त्याग करून, हातीं राज्यसत्ता घेऊन बसले. भांडवलदार किती उलट्या काळजाचा आहे याची त्यांना शास्त्रीय कल्पना नाहीं; राज्यव्यवहाराची (administrationची) पकड पक्की नाहीं; सरकारी धोरण तेच ठरविणार पण त्यासंबंधीं निःसंदिग्ध योजना हातीं नाहीं. अशा अनिश्चित परिस्थितींत भांडवलदारीला फोफावण्याला मुबलक वाव मिळतो;



अनुक्रमणिका







व भांडवलदारीची मायावी नीति अनेक मोहक रूपें घेऊन काँग्रेसजनांना विचलित करूं लागते. काँग्रेसजनांना म्हणण्याचें कारण इतकेंच कीं हातीं सत्तातर आहे, पण विनियोगाचें कणखर व्रत त्यांना अवगत झालेलें दिसत नाहीं. हातीं आलेल्या अल्पस्वल्प राज्यसत्तेचा विनियोग अर्थसत्ता वाढविण्याकडे करण्याचा मोह होतो. आंधळी राज्यसत्ता अर्थसत्तेच्या आहारीं जाते, पांगळी अर्थसत्ता आंधळ्या राज्यसत्तेच्या मानगुटीवर बसते. अशी ही नवी अंधपंगु–युति परिस्थितीमधून निर्माण होते. बिचारा मानव असहायपणें ती पहात राहतो. ही प्रक्रिया गांधीवादी परंपरेला अतिशय हानिकारक आहे हें प्रथम मान्य करणें आवश्यक आहे; तेव्हां कोठें ज्या धोरणामधून काँग्रेसची राज्यसत्ता भांडवलदारांच्या हातचें बाहुलें बनते तें धोरण मुळांतच बदलण्याची गरज सहज मान्य होईल. यावर उपाय म्हणजे राज्यसत्तेचा विनियोग निर्धारपूर्वक खासगी भांडवलदारांच्या अर्थसत्तेच्या मुसक्या बांधण्यासाठीं करणें, विशेषतः ज्या ज्या मार्गानें अर्थसत्ता राज्यसत्तेला वश करून घेते ते सर्व मार्ग बंद करणें हा होय.

गेल्या वर्षात साखरेचे कारखानदार व गूळ तयार करणारे शेतकरी या दोघांच्या नफ्यांच्या प्रमाणांत जें अतिशय मोठें अंतर दिसून आलें तें नाहींसें करण्यासाठीं राज्यसत्तेचा उपयोग केला गेला नाहीं; इतकेंच नव्हे, तर साखर–कारखान्यांतील भरमसाट नफ्याचा प्रमाणशीर वांटा मिळविण्यासाठीं धडपडणाऱ्या अनेक कामगारांना राज्यसत्तेचें साहाय्यहि मिळालें नाहीं. ही घटना आमचा सिद्धान्त अगदींच मानीव नाहीं हें प्रस्थापित करण्यास पुरेशी होईल. ही परिस्थिति म्हणजे धोक्याचा इशारा आहे.

## राज्यसत्तेचें हलाहल पचविणारी शिवशक्ति

प्रस्थापित समाजांतील बद्धमूल अर्थसत्ता व काँग्रेसची नवोदित राज्यसत्ता यांच्या परस्पर संबंधामधून समाजपरिवर्तनाच्या समस्येकडे पाहण्याचा थोडासा प्रयत्न वर केला आहे. आजच्या परिस्थितींचें समाजवादाचें भौतिक उद्दिष्ट गांधीवादी व समाजवादी या दोघांनाहि आपापल्या कल्पनेचें समाज निर्माण करण्यासाठीं कसें आवश्यक आहे याचाहि आपण विचार केला. परंतु स्वराज्यनिर्मितीनंतर महात्मा गांधींच्या महाप्रयाणाची दुःखद घटना ज्या कारणामुळें घडून आली त्या कारणाचाहि विचार केला पाहिजे. भांडवलदारी पद्धत नष्ट केल्यानंतर समाजवाद आपोआप निर्माण होणार नाहीं. फार तर एक नवी हुकुमशाही निर्माण होईल, अशी भीति आहे व ती साधार आहे. यासाठीं समाजवादाच्या भौतिक उद्दिष्टाच्या साधनेसाठीं जी प्रयत्नप्रणाली ठरवावयाची तिच्यांत नवीन मूल्यें दाखल करण्याची गरज आहे. नाहीं तर लोकराज्याचें 'गुंडराज्य' कितीं जलद होऊं शकतें या गेल्या वर्षाच्या इतिहासांतून उपलब्ध झालेला अनुभवाचा आपल्याला कांहींच फायदा होणार नाहीं.

गांधीवादाचा भर रचनात्मक कार्यावर म्हणजे नवीन उदय पावणाऱ्या सत्तेच्या अन्तःशुद्धिवर आहे. कामगार-संघटना बलशाली करण्यासाठीं जो प्रयत्न करावयाचा त्यांत गुंडप्रवृत्तीला वाव देऊन चालणार नाहीं. समाजपरिवर्तन कल्याणकारक व्हावें म्हणून राज्यसत्तेचें हलाहल पचवूं शकेल अशी प्रभावशाली शिवशक्ति जनसंघटनेमध्यें हृदयमंथनांतून निर्माण करणें हा गांधीवादाचा महनीय सिद्धान्त आहे. सत्तासक्ति तर मानवाचा स्वभावदोष आहे. सत्तेमधून निर्माण होणारी धुंदी हा सत्तेचा स्वभावदोष आहे. ही सत्तेची नशा कोणच्याहि नव्या व क्रांतिकारी राज्यसत्तेला जनहिताविषयीं बेदरकार बनवील. स्वातंत्र्यानंतर हिन्दी समाज-जीवनामध्यें ज्या अमंगळ प्रवृत्ती वाढल्या आहेत त्या नवसमाजनिर्मितीच्या मार्गात विघ्नरूप होत आहेत. यासाठीं भांडवलदारी व सरंजामदारी अर्थव्यवस्था नाहींशी करून लोकतंत्र व लोकहित हीं दोन्ही साधावयाचीं म्हटलीं तर श्रमजीवी समाजाला नव्यानें सांस्कृतिक दीक्षा द्यावयास पाहिजे. हिन्दी संस्कृतीचा अधःपात जर प्रामुख्यानें कोणच्या एका गोष्टीमुळें झाला असेल तर ती ही कीं समाजाचा सर्वांत खालचा थर केवळ आर्थिक दृष्ट्याच नव्हे तर सांस्कृतिक दृष्ट्याहि उपाशी राहिला. समाजजीवनाचीं मूल्यें या वर्गाला कोणी दिसूं देखील दिलीं नाहींत. या वर्गाचें वैचारिक जीवन रूढीच्या यांत्रिक सांच्यांत दडपून ती बंड करणार नाहीं इतकीच खबरदारी घेतली गेली.












# समाजवाद व गांधीवाद यांचा सहयोग ?

असा चिपाड झालेला समाज अहिंसेच्या तत्त्वाची कदरच करूं शकणार नाहीं. संस्कृति ही केवळ शब्द-प्रधान नसून मुख्यतः आचारप्रधान असते; मात्र केवळ आचाराचें प्रस्थ माजवून नवें निर्जीव कर्मकांड निर्माण होऊं देतां कामा नये. या दृष्टीनें सध्यांची सहकारी चळवळ आचारविचारांच्या ऐक्याचें सुंदर माध्यम बनूं शकेल.

## अपरिग्रहाच्या दोन बाजू

गांधीवादाचा भर लहानलहान स्वयंपूर्ण प्रादेशिक घटकांच्या आंखणीवर आहे. तो फारच उत्तम आहे खरा, परंतु समाजांतील प्रत्येक व्यक्तीला स्वाभिमानानें जगतां येईल इतक्या प्रमाणांत अन्न, वस्त्र व आश्रय यांची तरतूद अगोदर केली पाहिजे. लोकसंख्येच्या मानानें ही व्यवस्था पुरेशी व्हावी म्हणून आवश्यक तीं यंत्र-साधनें उपयोगांत आणलींच पाहिजेत. याच मुद्द्यावर गांधीवादी व समाजवादी दृष्टिकोनांत मतभेदाला वाव आहे. परंतु तो इतक्यापुरताच कीं एका विशिष्ट कालखंडांत उत्पादनाचा व्यवहार्य आराखडा कसा तयार करावयाचा या बाबतींत दोन्ही विचारसरणींच्या भौतिक भूमिकेंत फरक आहे. सदैव सुखवस्तु वर्गाला परिमित परिग्रहाचा नियम लावणें जितकें योग्य आहे तितकेंच ज्यांना किमान प्राथमिक गरजाहि पुऱ्या करतां येत नाहींत अशा लोकांच्या बाबतींत आवश्यक परिग्रहाचा आग्रह राखणेंहि जरूरीचें आहे. अपरिग्रहाच्या अशा या दोन बाजू आहेत. जो परिग्रही असेल त्याला अपरिग्रह शिकविला पाहिजे आणि जो दीन, दरिद्री असेल त्याला निर्वाहापुरता परिग्रह शिकविला पाहिजे. अर्थात् व्यक्तिमात्राला आपल्या आवश्यक गरजा भागविण्याइतकी क्रयशक्ति तिच्या श्रमांतून म्हणजे वेतनांतून लाभेल इतकी खबरदारी समाजनायकांनीं घेतली पाहिजे. आणि हें सर्व करीत असतांना वर्तमान समाजांतील परवशता दूर करून आपणच समाज चालवतों आहोंत आणि राज्यकर्ते, पोस्ट ऑफिस किंवा रेल्वेच्या गाड्या जें काम करतात, तितकेंच काम करीत आहेत अशी व्यापक जाणीव उत्पादक या नात्यानें प्रत्येक नागरिकाला व्हावयास पाहिजे.

## गांधीजींनीं प्रचारिलेलीं जीवनमूल्यें

आतां माझें समाजवादी समाजाचें चित्र मी संक्षेपानें रेखाटतों म्हणजे समाजवादाचीं भौतिक उद्दिष्टें व गांधीवादाचीं जीवनमूल्यें मानवी संवेदनेंत कशीं एकवटूं शकतात याची कल्पना येईल. एकाद्या मंदिरांत भक्तगण येऊन भाविकपणें देवतेच्या पावलांवर भक्तिरसाचें तीर्थ अर्पण करतात. तें पाणी मंदिराच्या पुष्करणींत वाहात जाऊन त्याच्या ओलाव्यामुळें बागेंत फुलांच्या ताटव्यांत मधुर सुगंध दरवळतो. हीं भक्तिसुमनें पुन्हां त्याच देवतेच्या चरणांवर अर्पिलीं जातात. ज्या चरणांच्या भक्तिरसांतून पुष्पवाटिकेला जीवन मिळतें त्याच भक्तिरसांत त्या वाटिकेचें ऐश्वर्य तद्रूप होतें. व्यक्तिमात्राचाहि समाजाशीं असाच संबंध नाहीं का ? आपला हा देह व चरितार्थ चालण्यासाठीं सहस्रावधि अज्ञात मानवांचे श्रम कामाला येतात. आपण खातों, कपडे वापरतों, घरांत राहतों; ना आपण सर्व शेतकरी, ना विणकर, ना गवंडी ! ज्या समाजाच्या परिश्रमावरती म्हणजे ज्या असंख्य अज्ञात मानवांच्या परिश्रमावरती आपला हा पिंड पोसतो, त्या समाजाचें जीवन समृद्ध करण्यासाठीं आपल्यामध्यें आहे नाहीं तें सर्व आपण ओतावें आणि समाजाचें जीवन समृद्ध करावें ही जीवनाची सार्थकता आहे. या जाणीवेमधून व्यक्तिमात्राच्या कर्तृत्वाला केवढी उदात्त प्रेरणा मिळते ! कल्पना करवत नाहीं एवढी थोरवी प्रत्येक मानवाच्या जीवनाला या भावनेमधून मिळेल. मग ' मी पोटाचा गुलाम आहे, मी हुकमाचा ताबेदार आहे ' अशी दीनवाणी अमंगळ लाचारी मानवाला अधोवदन करणार नाहीं. वारकरी पंथांतील विविध भक्तराजांच्या जीवनांत या उदात्ततेचा उन्माद आपल्याला नाहीं का पहायला मिळत ? ज्या समाजांत व्यक्तिस्वार्थाच्या, नफेबाजीच्या तंत्रानें मानवी व्यवहार चालत नसतील, मानवी व्यवहार व आर्थिक जीवन केवळ समाजाच्या श्रमशक्तीच्या व साधनसामग्रीच्या नियोजित विनियोगामधून जास्तींत जास्त समाजकल्याण साधण्याकडे हेतुपूर्वक कसोशीचा प्रयत्न होत असेल त्याच समाजांत सर्व लहान-थोर व्यक्तिमात्रांना स्वाभि-



अनुक्रमणिका






मानानें जगतां येईल, त्याच समाजांत झाडूवाला काय किंवा भंगी काय, कारकून काय किंवा पट्टेवाला काय—सर्व उद्योगी व प्रामाणिक स्त्री-पुरुषांना असा आत्मस्फूर्तीचा साक्षात्कार होईल कीं माझें व्यक्तित्व समाजाच्या अनिर्देश्य सेवेमधून विकास पावलेलें आहे! समाजाच्या भक्तिभावनेमधून जीवन-वृक्षाला चैतन्य मिळत आहे. तेव्हां आपलें सर्व कर्तृत्वहि त्याच समाजाचें जीवन समृद्ध करण्यासाठीं कारणीं पडलें पाहिजे. तरच मानवजन्माचें सार्थक होईल. या भावनेमधून कर्तव्याच्या विविधतेला साम्य-वृत्तीची जोड लाभेल. वर्गविहीन, जातिविहीन, उच्च-नीचभाव—विहीन असा समाज जर निर्माण व्हायचा असेल तर हा सामाजिक मानव्याचा प्रत्यय व्यक्तिमात्राचा जीवनधर्म बनला पाहिजे. या प्रत्ययाला आवश्यक असणारें, आवश्यक असें भौतिक अधिष्ठान समाजवादी रचनाच पुरवूं शकेल. जीवन-मरणामध्यें गांधीजींनीं जीवनद्वारें व मरणद्वारेंहि प्रचारलेलीं जीवनमूल्यें या भावनेंतून पूर्णत्वानें विकसतील. समाजवाद आणि गांधीवाद या दोहोंचा आधार मानवाचें जीवन आहे. या दृष्टीनें जर समाजवाद आणि गांधीवाद यांचेकडे आपण पाहूं शकलों तरच नवसमाज-रचनेचा मार्ग सध्यांच्या निराशाजनक परिस्थितींत निदान अस्फुटपणें तरी दिसूं लागेल.

———

## विधायक कार्यकर्त्यांच्या मर्यादा

विधायक कार्यक्षेत्रांत अखिल भारतीय स्वरूपाच्या आज अनेक संस्था काम करीत आहेत. दाक्षिण-भारत—हिंदी-प्रचार—समितीचे चौदा-पंधराशें कार्यकर्ते आज हिंदीचा प्रचार करीत आहेत. चरखासंघांतहि पांच-सहा हजारांचेवर कार्यकर्ते आज काम करीत असावेत. इतर विधायक स्वरूपाच्या सर्व संस्था जमेस धरल्यास कमींत कमी आणखी तितकेच कार्यकर्ते काम करीत आहेत असें आपणांस म्हणावें लागेल. या दहा-बारा हजार कार्यकर्त्यांपैकीं अनेकांशीं माझा संबंध आला आहे. एकच एक काम करण्यामुळें त्या कामांतील त्यांची कार्यशक्ति खूप वाढते; परंतु व्यापक जीवनाच्या दृष्टीनें थोडीफार संकुचितता निर्माण होते. सामाजिक जीवनमूल्याचाहि विसर पडूं लागतो. अनेकांच्या ठिकाणीं तर, हीं जीवनमूल्यें उत्पन्नच झालेलीं दिसत नाहींत व त्या संस्थेंतून बाहेर पडून दुसरें कांहीं काम करण्यास त्यांना सांगितल्यास अनेकांची बावरल्या-सारखी स्थिति होते. विधायक कार्यातून त्यांची शक्ति वाढवण्यालाहि मर्यादा उत्पन्न होऊं लागते व त्यामुळें ते समाजाची शक्ति वाढविण्याला हळूहळू नालायक होऊं लागतात. एका बाजूला त्या त्या धंद्यांतील ते तज्ज्ञ बनतात, तर दुसऱ्या बाजूस सर्वांगीण जीवनाच्या दृष्टीनें त्यांची दृष्टि संकुचित होत जाते. विधायक कार्य-कर्त्यांच्या जीवनांतील हा दोष कसा टाळावा हा प्रश्न माझ्यापुढें अनेक वर्षें आहे. तो आजहि सुटलेला नाहीं. या कार्यकर्त्यांचा अपरंपार त्याग, सेवाभाववृत्ति, वाहिलेल्या कामाला रात्रंदिवस चिकटून रहाण्याची शक्ति हीं पाहिलीं म्हणजे आपली मान त्यांचेपुढें नमते. पण त्याचबरोबर त्यांच्या जीवनांत दुसऱ्या बाजूला उत्पन्न होत असलेली व वाढत असलेली संकुचितता अनुभवाला आली म्हणजे विधायक कार्याची मांडणी करतांना कोठें तरी चुकलें आहे असें वाटल्याखेरीज रहात नाहीं. या दोहोंचा समन्वय कसा घातला जाईल हा महत्त्वाचा प्रश्न आहे. सेवादल ही समस्या सोडवूं शकते काय ? राष्ट्रसेवादलाच्या शिक्षणांतून बाहेर पडणारे कार्यकर्ते जीवनमूल्यांचें पुरेसें दर्शन झालेले निघतील व त्याचप्रमाणें एखादी विधायक प्रवृत्ति यशस्वी चालविण्याची शक्तीहि यांनीं संपादन केलेली असेल या दृष्टीनें मी राष्ट्रसेवादलाकडे पाहतों.

—**श्री. अण्णासाहेब सहस्त्रबुद्धे**, 'साधने'तील लेखांतून— ( २५–१२–४८ )









आचार्य दादा धर्माधिकारी

# सर्वोदयाचीं मूलभूत प्रमेयें

[ प्रस्तुत लेख हा महाराष्ट्र ग्रंथ-भांडार, कोल्हापूर, यांच्यातर्फे लवकरच प्रसिद्ध होणाऱ्या 'गांधीवाद-समाजवाद' या पुस्तकांतून लेखक व प्रकाशक यांच्या कृपेनें घेतला आहे. —का. सं. ]

प्राचीन काळीं अनेक धर्म, पंथ व संप्रदाय अस्तित्वांत आले. त्यांच्यामध्यें अहमहमिका, चुरस व लढेहि उत्पन्न झाले. 'आम्ही मानवाला त्याच्या सुखाचा अचूक मार्ग दाखवितों' असा त्यांच्यापैकीं दरेकाचा बाणा आणि दावा. मानवाला काय पाहिजे याबद्दलहि कांहीं अति शाहण्यांनीं वाद घालण्याचा घाट घातला. पण माणसाला काय पाहिजे हा फक्त वस्तुमीमांसेचा प्रश्न आहे; तो वादाचा मुद्दा होऊं शकत नाहीं.

माणसाला जीवनांत सुख पाहिजे याबद्दल सामान्यतः एकवाक्यता आहे. कारण माणसाला जें नको असेल तें त्याच्यावर लादतां येईल; पण त्याविषयीं त्याच्या मनांत आकांक्षा किंवा अभिरुचि उत्पन्न करतां येणार नाहीं. म्हणून जुन्या काळच्या सर्वच धर्मसंस्थापकांनीं व संप्रदाय-प्रवर्तकांनीं 'आम्ही तुला शाश्वत सुखाचा लाभ करवून देतों, तूं आमच्या मार्गाचा स्वीकार कर' असें आश्वासन दिलें. अर्थात् काय पाहिजे याबद्दल फारसा मतभेद नाहीं. जें पाहिजे तें कशा रीतीनें प्राप्त होईल याविषयींच काय तो मतभेद असतो. यांतूनच निरनिराळे मार्ग, संप्रदाय व मतें उत्पन्न होतात आणि त्यांच्यांत चुरस लागते.

## दुजेपणाचा निरास व आपुलकीचा विकास

आधुनिक शास्त्रीय परिभाषेंत यालाच साध्य-साधनवाद म्हणतात. साध्याविषयीं जवळजवळ एकवाक्यता आहे. इहलोकांतील आपलें आयुष्य परिमित आणि क्षणभंगुर असल्यामुळें या लोकांत शाश्वत जीवन लाभणें शक्य नाहीं आणि जेथें शाश्वत जीवन लाभणें शक्य नाहीं तेथें शाश्वत सुखाचा लाभ कसा होणार? असा ज्यांचा दृढ विश्वास आहे त्यांना परलोकवादी म्हणतात. या परलोकवाद्यांना सर्वसंगपरित्याग करून एकान्तांत, ईश्वरचिंतनांत काळ घालवून अमरत्वाची साधना करावयाची असते. त्यांच्यापैकीं पुष्कळांना धार्मिक कर्मकांडाचें व विधींचें महत्त्व समाजकल्याणाच्या कार्यापेक्षां अधिक वाटतें. आणि अशा रीतीनें धर्म व व्यवहार यांच्यांत विरोध उत्पन्न होतो.

माणसाला पारलौकिक सुख कशानें प्राप्त होईल याविषयीं दरेकाची उपपत्ति वेगवेगळी राहणें अपरिहार्यच आहे. पण परलोक हा परोक्ष असल्यामुळें त्या निरनिराळ्या उपपत्तींच्या सत्यतेचें परीक्षण करणें दुरापास्त आहे. म्हणून तो वाद आपल्या कक्षेंत येत नाहीं असेंच आपण नम्रपणें मानलें पाहिजे. पण माणसाला परलोकांत जसें सुख पाहिजे तसें इहलोकांतहि हवें आहे. तें सुख कशा रीतीनें प्राप्त होईल हा मूलभूत प्रश्न आहे. या प्रश्नाला जीं निरनिराळीं उत्तरें देण्यांत येतात त्यांतून सर्व आधुनिक वादांची उत्पत्ति झालेली आहे.

माणसाला सुख कशांत वाटतें? या प्रश्नाची थोडीशी सूक्ष्म मीमांसा करावयास हवी. घटकाभर अशी कल्पना करूं कीं एका माणसाला एक आयतें सोयीवार व सुंदर घर मिळालें. घरालासुद्धां बाग आहे. आणि त्या माणसाला लागणाऱ्या सर्व वस्तू इच्छामात्रेंकरून त्याला प्राप्त होतात. पण घरांत दुसरें कुणीहि नाहीं. अगदीं चिटपाखरूं नाहीं. बाहेर कुठेंहि दुसरें घर नाहीं, दुसरें माणूस नाहीं,








दुसरा प्राणी नाहीं. स्वतःपुरती ददात कशाचीच नाहीं. सृष्टि हीच त्याची कामधेनु बनलेली आहे. सोबतखेरीज करून त्याला सगळें कांहीं उपलब्ध आहे; अशा स्थितींत त्या व्यक्तीला सुख लाभेल का ? म्हणजे त्याला जीवनांत धन्यता व प्रसाद यांचा अनुभव येईल का ?

या प्रश्नाचें उत्तर उघड आहे; आणि मूलभूत गोष्टी नेहमीं उघड असतात. म्हणूनच त्यांच्या विषयीं वाद होत नाहीं. रॉबिन्सन् क्रूसोला संगतीच्या अभावीं जीव नकोसा झाला आणि त्याला निर्वाहाचीं साधनें जर स्वतः निर्माण करावीं लागलीं नसतीं तर त्यानें आत्महत्याच केली असती. श्रुतींत एक वाक्य आहेः 'एकाकी न रमते' 'एकट्याला बरें वाटत नाहीं!' एकट्याला बरें न वाटणें हा माणसाचा मूळ स्वभाव आहे. त्याला दुकटें कोणी तरी पाहिजे. सोबत्याची किंवा संगतीची ही जी आकांक्षा तिलाच मनुष्यस्वभाव किंवा माणुसकी असें म्हणतात. या मनुष्यस्वभावाला जें जें अनुकूल असेल त्यानें माणसाला सुख व स्वास्थ्य लाभेल. जें जें प्रतिकूल असेल त्यानें क्लेश बहुधा प्राप्त होईल.

सारांश, माणसाला दुसऱ्यावरोबर जगण्यांत मौज वाटते. सुखाचीं साधनें संपादन करण्याकरितां तो इतरांवर आक्रमण करील, जुलूम करील. पण एकदां तीं साधनें प्राप्त केल्यानंतर त्यांच्या उपभोगांत कुणी जर सामील नसलें तर त्याला तीं विषासारखीं वाटतील. वाटमाऱ्या देखील इतरांना लुबाडून, इतरांचा जीव घेऊन जी साधनसामग्री मिळवितो तिचा आस्वाद घ्यायला त्याचीं बायकापोरें आणि इतर वाटमोरे मित्र नसले तर तो स्वतःलाच गळफांस लावून घेईल. जेथें दुसऱ्याबद्दल दुजाभाव किंवा परकेपणा असतो तेथें दुसऱ्यापासून भीति वाटते. आणि जेथें दुसऱ्याबद्दल आत्मीयता किंवा आपुलकी असते तेथें दुसऱ्याच्या सहवासानें जीवन व जीवनाची गोडी द्विगुणित होते. म्हणून दुजेपणाचा निरास व आपुलकीचा विकास ही जीवन व्यापक बनविण्याची प्रक्रिया आहे.

## भांडवलशाही अनिष्ट कां ?

मुद्दा आतां आधुनिक परिभाषेंत मांडता. आर्थिक परिस्थितीवर माणसाचें समाधान अवलंबून आहे ही गोष्ट मान्य. पण आर्थिक संपन्नता हें साध्य नसून साधन आहे हीहि गोष्ट आतां मान्य झाल्यासारखी दिसते. माणसानें सुखाचीं सर्व साधनें मिळविल्यानंतरहि तीं साधनें इतरांबरोबर वांटून उपभोगिल्याखेरीज त्याला मौज वाटत नाहीं. इतरांबरोबर जगण्याची माणसाची ही जी सहजप्रवृत्ति तीं सांस्कृतिक जीवनाचा पाया आहे, आणि आर्थिक संयोजन या सांस्कृतिक जीवनाच्या विकासाचें साधन आहे.

अर्थात् जें आर्थिक संयोजन माणसाला इतरांबरोबर राहावयाला सोय निर्माण करून देत असेल तें इष्ट आणि जें त्याला तशी सोय करून देत नसेल तें अनिष्ट व त्याज्य. भांडवलशाही अनिष्ट कां ? तर ती माणसाची सहजीवनाची वृत्ति परिमित आणि संकुचित करते म्हणून. आप्पलपोटे व कंजूष हे स्वतःपुरतेच जगतात म्हणून त्यांच्या जीवनांत धन्यताहि येत नाहीं व प्रसादहि उत्पन्न होत नाहीं. हा नैतिक सिद्धान्त नव्हे, हें जीवनांतील अनुभवसिद्ध सत्य आहे.

एका कृपणाची गोष्ट प्रसिद्ध आहे. एक कवडी खर्च करण्याचा जीव होईना. बायका-पोरें रोगानें व पुरेशा सुखसोयींच्या अभावीं मरूं दिलीं, स्वतः-करितांहि पैसा खर्च करण्याचा जीव होईना. तेव्हां एक दिडकीहि खर्च होऊं नये म्हणून स्वतःच्याच आयुष्याचा अंत करण्याचें त्यानें ठरविलें. आयुष्य खुंटलें कीं खर्च खुंटला ! जीव द्यायला देखील विष विकत घ्यावयाच नाहा हें त्याचें शील. म्हणून नदींत बुडून मरावयाचें ठरविलें. आपण मेल्यानंतर पैसा कुणी घेईल ही मनाला सारखी रुखरुख. म्हणून मोहरांचें गाठोडें बरोबर घेतलें. पोटाशी चदरा (थैली) बांधूनच देह गंगार्पण करण्याचें ठरविलें. पैशाकरितां जीव नकोसा झाला तरी तो खरोखर नकोसा होत नाहीं. म्हणून एका परोपकारी गृहस्थाजवळ मागणी केली कीं 'बाबा, मला फुकटांत मरण-दान दे ! मला बुडविण्याबद्दल मी तुला एक मोहोर दिली असती ! पण तिच्यांत माझे प्राण अडकून राहतील. पिंडाला कावळा शिवणार नाहीं. म्हणून तूं एवढें पुण्यकार्य कर.'

# सर्वोदयाचीं मूलभूत प्रमेयें

कार्पण्याचा हा परिपाक आहे. ही नीतिकथा असली तरी तिचें तात्पर्य सांगून मी स्वारस्य कमी करीत नाहीं. कवीनें ' कृपणकरगतानां संपदां दुर्विपाकः। ' असा निष्कर्ष काढला आहे. आणि त्याचें कारण ' उपकृतिरहितानां सर्वभोगच्युतानाम् ' असें दिलें आहे. माणसाच्या आत्मीयतेचें क्षेत्र जितकें संकुचित तितकें त्याचें जीवन कृपण होत जातें आणि कृपणतेमुळें अविश्वास व भीति यांचा प्रादुर्भाव होतो. पोटच्या मुलाचा सुद्धां भरंवसा वाटत नाहीं. अविश्वासांत व भीतींत सुखाचा व शांतीचा लवलेशहि नसतो हाहि अनुभव आहे. म्हणून संपन्नता जर मूठभर माणसांपुरती परिमित झाली तर त्या माणसाचें जीवन नित्य अविश्वासानें व निरंतर भीतीनें कलुषित झाल्यावांचून राहात नाहीं. वर्गनिष्ठ साधनसंपन्नतेंत हा स्वभावगत दोष आहे. यालाच समाजवादी भांडवलशाहींतील आंतरविरोध म्हणतो.

## समाजव्यवस्था व सहजीवन

सहजीवनाचा विकास संविभागाखेरीज होणें शक्य नाहीं. संविभागाचें तत्त्व आर्थिक संयोजनाचा आधार व उद्दिष्ट दोन्हीं असलें पाहिजे. तें यंत्रीकरणानें साधेल कीं यंत्रविरोधानें साधेल, केन्द्रीकरणानें साधेल कीं विकेन्द्रीकरणानें साधेल, याबद्दल वाद असूं शकेल. पण तें हिंसक प्रक्रियेनें साधणार नाहीं याबद्दल वाद असण्याचें कारण नाहीं. कारण हिंसा सहजीवनाच्या मुळावरच कुन्हाड घालणारी आहे.

या मुद्द्याची थोडी फोड करणें आवश्यक आहे. माणूस हा परिस्थितीचा बनलेला असतो. त्यामुळें परिस्थितीचा अंत करावयाचा झाल्यास त्याचाहि अंत केला पाहिजे. जुनी परिस्थिति—जुना माणूस यांचा अंत झाल्यानंतर नवीन परिस्थितींतून नवीन माणूस निर्माण होईल असा हा अंमळ गुंतागुंतीचा मुद्दा आहे. कर्ता वस्तुतंत्र आहे कीं वस्तु कर्तृतंत्र आहे कीं दोघेहि दैवतंत्र आहेत हा वाद जुनाच आहे आणि यावच्चंद्रदिवाकरौ त्याचा निर्णय होण्याचें लक्षण दिसत नाहीं. वस्तुपरिवर्तनवादी फक्त साम्यवाद्यांत व समाजवाद्यांतच आहेत असें नाहीं. सर्वच वादांचा तो एक महत्त्वाचा भाग आहे. लोकांना दारूपासून परावृत्त करावयाचें असलें तर ताडीचीं झाडें तोडा, द्राक्षांच्या वेली जाळा, मोहाच्या झाडांचा समूळ नायनाट करा असें प्रतिपादन कमीअधिक प्रमाणांत आपण सरेच करीत असतों. माणसाच्या ठिकाणीं ज्या वृत्तीचा परिपोष करावयाचा असेल तशा प्रकारची परिस्थिति निर्माण करणें हा साधनेचा एक महत्त्वाचा भाग आहे. पण यालाहि एक मर्यादा आहे. ब्रह्मचर्यपालन करतां यावें म्हणून समाजांतून स्त्रीजातीचें निर्मूलन करावें अशी सूचना करण्याचें धाडस आज मोठ्याहून मोठा कर्तव्यबहाद्दरहि करणार नाहीं. परिस्थितीप्रमाणें वृत्ति बनते हें जितकें खरें तितकेंच माणूस आपल्या वृत्तीप्रमाणें परिस्थिति घडवितो हेंहि खरें आहे. परिस्थिति-परिवर्तनाकरितां माणसानें माणसाचा संहार करणें यांत मानव्याचा पराजय आहे.

तें कसें? याचा विचार थोडक्यांत करूं. मूठभर माणसांनीं इतरांना पिळून काढून त्यांच्या जिवावर जगावें हें आपल्याला अनिष्ट कां वाटतें? वर सांगितल्याप्रमाणें त्यामुळें सहजीवनाच्या तत्त्वाला बाध येतो म्हणून. ज्या योजनेनें सहजीवनाला बाध येतो ती अन्यायमूलक. हा संकेत आपल्या संस्कृतीमध्यें इतका बद्धमूल झालेला आहे कीं त्याबद्दल वाद करणें आतां कोणाच्या मनांतहि येत नाहीं. भांडवलशाहीला जो इतका सार्वत्रिक विरोध दिसून येतो त्याचेंहि मूळ हेंच आहे. भांडवलशाहीचें समर्थन करतांना देखील तिचे अभिमानी आमच्या पद्धतींत सर्वांना जास्तींत जास्त सुख मिळण्याची सोय आहे असाच युक्तिवाद करतात. म्हणजे चोरीचें व शोषणाचें समर्थन देखील लोककल्याणाच्या मुद्द्यावरच करावें लागतें. आणि लोककल्याण म्हणजे सर्व लोकांना सुखानें राहतां येण्याची स्थिति. सर्वांना जेव्हां सुखप्राप्तीची सारख्या प्रमाणांत संधि असेल तेव्हां अर्थातच चोरीला किंवा शोषणाला वाव उरणें शक्य नाहीं. म्हणून चोरी किंवा शोषण यांच्यावर आधारलेली समाजव्यवस्था सहजीवनाला पोषक ठरूं शकत नाहीं. त्यामुळें तिचा अंत करणें आवश्यक होऊन बसतें.

## सर्वोदयाची प्रतिकारपद्धति

पण ज्या पद्धतीनें त्या व्यवस्थेचा अंत कराव-

याचा ती पद्धति देखील माणसाच्या माणुसकीला म्हणजे सहजीवनाच्या आकांक्षेला पोषक अशीच असली पाहिजे. घरांत माणूस आजारी असलें म्हणजे त्याला आपल्याबरोबर राहतां येत नाहीं आणि आपल्या सुखांत सामील होतां येत नाहीं म्हणून आपण त्याचा आजार नाहींसा करावयास धडपडत असतों. त्याचप्रमाणें भांडवलदारांच्या भांडवलदारीचें निवारण करून त्यांना समाजाच्या जीवनांत बरोबरीच्या नात्यानें भाग घेण्यास पात्र बनविलें पाहिजे. त्यासाठीं तशी परिस्थिति निर्माण केली पाहिजे, आणि ती परिस्थिति निर्माण करण्याच्या आड जर भांडवलवाले येऊं लागले, तर त्यांचा प्रतिकारहि केला पाहिजे. हा प्रतिकार माणसाच्या माणुसकीला अनुरूप असा असावा इतकाच गांधींचा आग्रह.

वर्गविग्रहाचें तत्त्व बरोबर आहे कीं चुकीचें आहे हा वाद आतां जुना झाला. संविभागाला आणि सहजविनाला आवश्यक अशा अर्थरचनेला जो कोणी विरोध करील त्या माणसाचा किंवा त्या वर्गाचा प्रतिकार केलाच पाहिजे. ज्या पद्धतीचें जीवन तो जगतो त्या पद्धतीचें जीवन अशक्य व्हावें असाहि प्रयत्न केला पाहिजे. पण तो प्रयत्न करीत असतांना त्यालाहि आपल्या नवीन जीवनांत सामील करून घ्यावयाचें आहे ही बुद्धि कायम असली पाहिजे. सर्वोदय प्रतिकारपद्धतीची ही अपरिहार्य अट आहे.

ज्या प्रतिकार-पद्धतींत उभयकल्याणकारितेची शक्ति असेल तीच श्रेयस्कर ठरेल. सर्वोदयांत सर्वांचा उदय अभीष्ट आहे. भांडवलदाराचा उदय भांडवलदारीच्या सर्वनाशांत आहे. कारण जीवनाचा विकास सहजीवनाच्या प्रगतींत आहे हें प्रमेय आपण वर मांडलेलें आहे. भांडवलशाहीमुळें भांडवलदाराच्या जीवनाचा विकास खुंटतो हें कृपणकथेवरून दर्शविलें आहे. संकुचिततेंत जीवनाचा ऱ्हास आहे, अपक्षय आहे. व्यापकतेंत जीवनाचा विकास आहे, संवृद्धि आहे.

## 'ट्रस्टीशिप'चें खरें रहस्य

भांडवलवाल्यालाहि संपूर्ण व समृद्ध जीवन लाभावें अशी आमची इच्छा आहे म्हणून भांडवलशाहीच्या पाशांतून त्याला मुक्त करणें हेंच त्याच्या हितकर्त्यांचें कर्तव्य आहे. तो आपल्या स्वतःच्या कल्याणाकरितां स्वतःचे पाश तोडायला मदत करील तर अहं विशेष आणि करणार नाहीं तर ते पाश आम्हांला तोडावे लागतील. स्वतःचे पाश तोडायला मदत करणें म्हणजे भांडवलदारानें भांडवलदार या नात्यानें आत्मविसर्जन करणें. यांतच त्याचा उद्धार आहे. याला गांधींनीं ट्रस्टीशिप असें नांव दिलें. ऐतिहासिक परंपरेमुळें प्राप्त झालेली संपत्ति शक्य तितक्या लवकर समाजाला अर्पण करून मोकळें होणें हा ट्रस्टीशिपच्या वृत्तीचा अर्थ आहे. संपत्तीच्या रक्षणाची व विनियोगाची जबाबदारी समाजानें स्वतःच्या शिरावर घेतों म्हटलें तर त्यांत त्या ट्रस्टीला समाधानच वाटलें पाहिजे. असा ट्रस्टी असला तर, तो समाजाला म्हणेल, 'हें ओझें तुम्ही सांभाळा' आणि समाज म्हणेल, 'आम्ही तुलाच व्यवस्थापक नेमतों.' याचा परिणाम म्हणून एका पिढीनंतर खासगी संपत्ति ही संस्था नाहींशी झाली पाहिजे. कारण ट्रस्टीशिप ही संक्रमण-काळापुरतीच राहूं शकते. व्यक्ति-स्वामित्वाकडून समाजस्वामित्वाकडे जाण्याची ती एक अहिंसक प्रक्रिया आहे. या दृष्टीनेंच त्या सिद्धान्ताचा विचार करायला पाहिजे. या अर्थानें जो भांडवलदार स्वतःला ट्रस्टी मानायला तयार नसेल त्याला संपत्तीच्या पाशांतून सोडविण्याकरितां प्रतिकारात्मक उपाय योजावे लागतील. सर्व प्रतिकारात्मक उपायांच्या बाबतींत सर्वोदयाची एक मात्र अट एवढीच कीं प्रतिकार माणसाला वांचविण्याकरितां असल्यामुळें प्रतिकार करतांना माणूस दगावणार नाहीं आणि माणुसकीहि नाहींशी होणार नाहीं इतकी काळजी घेतली पाहिजे.

सर्वोदयाची भूमिका मूलभूत तत्त्वाच्या दृष्टीनें मांडली आहे. तपशिलावर किंवा तिच्या विशिष्ट अंगावर पुष्कळ लिहितां येण्यासारखें आहे. पण त्या मानानें तो भाग गौण आहे. आर्थिक संयोजन सांस्कृतिक जीवनाच्या विकासाकरितां आहे, सांस्कृतिक विकास सहजीवनाच्या कलेंत आहे, सहजीवनाचा आधार आर्थिक संविभाग आहे. म्हणून आर्थिक संविभागाची प्रस्थापना करणें आमचें आजचें उद्दिष्ट असलें पाहिजे. जो जो वर्ग संवि-












भागाच्या आड येईल त्याचा प्रतिकारहि दोन्ही पक्षांच्या हितबुद्धीनें केला पाहिजे. सर्व प्रकारचा प्रतिकार, ज्या व्यक्तीच्या विरुद्ध तो करण्यांत येतो, तिच्याहि कल्याणाकरितां आहे ही मर्यादा दृष्टीआड होतां कामा नये यांत जें जें बसत असेल तें सर्वोदयांत येतें, जें बसत नसेल तें येत नाहीं. याचाच अर्थ सर्वोदय हा एक विशिष्ट वाद किंवा संप्रदाय नव्हे.

---

## द ण विषाचा पेला

[ खालील गीत रवीन्द्रनाथ टागोर यांनीं १९३९ सालीं खास ख्रिस्तमसकरितां प्रार्थनागीत म्हणून रचिलें. त्याच ख्रिस्तमसमध्यें चार्ल्स अँड्र्यूज हे प्रार्थनाप्रसंगीं मुख्य प्रवचनकार होते. शांतिनिकेतनांतील विद्यार्थी ही प्रार्थना गात असतांना श्री. अँड्र्यूजना किती गहिंवरून आलें याचें 'विश्वभारतीचे' संपादक श्री. क्षितीश रॉय यांनीं वर्णन केलें आहे. हें गीत व त्याचें श्री. अमिया चक्रवर्ती यांनीं केलेलें इंग्रजी भाषांतर 'हरिजन' २६–१२–४८ मध्यें प्रसिद्ध झालें आहे. —का. सं. ]

**एक दिन यारा मेरे छिल तारे गिये**
**राजार दोहाई दिये,**
**ए युगे ताराई जन्म निये छे आजि**
**मन्दिरे तारा ऐसे छे भक्त साजि !**
**घातक सैन्ये डाकि,**
**"मारो मारो" उठे हाँकि**
**गर्जन मेशे स्तव अंत्रेर स्वर ।**
**मानवपुत्र गंभीर व्यथाय**
**कहेन "हे ईश्वर !**
**ए पान पात्र निदारुण विषे भरा**
**दुरे फेले दाओ**
**दुरे फेले दाओ त्वरा ।**

[ " ज्यांनीं एके दिवशीं आपल्या राज्यकर्त्यांचा जयघोष करीत त्याला मारलें तेच आज या युगांत पुन्हां जन्म घेऊन आले आहेत; भक्त म्हणून सजून आपआपल्या मन्दिरांतून जमले आहेत.

मारेकरी सैनिकांना ते हांका मारीत आहेत. " मारा, मारा " अशा गर्जना, आरोळ्या उठत आहेत. स्तोत्रमंत्रांचा स्वर या गर्जनांमध्यें मिसळून, बुडून जात आहे.

गंभीर व्यथेनें व्याकुळ असा मानवपुत्र धांवा करीत आहे—" हे परमेश्वर', हा अत्यंत दारुण विषानें भरलेला पेला दूर फेंकून दे, सत्वर दूर फेंकून दे. " ]

**—रवीन्द्रनाथ टागोर**



अनुक्रमणिका






डॉ. हेन्री टॉमस् : अनुवादक : श्री. साने गुरुजी

# गांधीजींचें अभिनव युद्धशास्त्र

[ प्रस्तुत लेख हा सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेचें आगामी प्रकाशन 'मानवजातीची कथा' या ग्रंथामधील एका प्रकरणांतील कांहीं भाग आहे. 'मानवजातीची कथा' हा ग्रंथ डॉ. हेन्री टॉमस् याच्या The Story of the Human Race या ग्रंथाचा अनुवाद असून तो अनुवाद श्री. साने गुरुजी यांच्या सरस लेखणींतून उतरलेला आहे. मूळ इंग्रजी ग्रंथाची प्रथम आवृत्ति १९३५ सालीं बाहेर पडली. मानवेतिहासाच्या पार्श्वभूमीवर ग्रंथकारानें चौदा वर्षांपूर्वी केलेलें गांधीजींचें मूल्यमापन आजच्या संदर्भांतही अर्थपूर्ण व उद्‌बोधक ठरेल असा विश्वास वाटतो. —का. सं. ]

## लेनिन आणि गांधी

लेनिन १९२४ सालच्या जानेवारीच्या एकविसाव्या तारखेस मरण पावला. त्या वेळीं त्याचें वय फक्त त्रेपन्न वर्षांचें होतें. सोव्हिएट–कॉंग्रेसनें काढलेल्या जाहीरनाम्यांत त्याला जवळजवळ देव बनविण्यांत आलें होतें. सदर जाहीरनामा म्हणतो, "लेनिनची दूरदृष्टि निःसीम होती. बहुजनसमाजाची संघटना करण्याची त्याची बुद्धि कल्पनातीत होती; तो सर्व देशांचा, सर्व लोकांचा सर्वकालीन व परम महान् पुढारी होता. तो नव्या मानवजातीचा प्रभु होता, जगाचा तारनहार होता." लेनिन महापुरुष होता यांत शंकाच नाहीं. तो अति महान् विभूतींपैकीं एक होता. पण त्यानें एक दुःखद चूक केली–हिंसेनें जागतिक क्रांति घडवून आणण्याचा यत्न केला. त्यानें झारचा जुलूम नष्ट केला; पण त्या जागीं कामगारशाहीचा जुलूम आणला. अग्नीनें अग्नि विझावितां येत नाहीं. लेनिननें द्वेषाशीं द्वेषानेंच लढण्याची खटपट केली. जगाची लष्करशाहीपासून सुटका करण्यासाठीं त्यानें स्वतः एक सामर्थ्यशाली लष्करी यंत्र उभें केलें. लेनिनच्या कार्यक्रमांतील मोठा दोष म्हणजे हिंसेवरील–लष्करी सामर्थ्यावरील–त्याचा विश्वास. हा त्या योजनेंतील दुबळेपणा होता. तो फ्रेंच क्रांतीचा धडा विसरला. डान्टन्, रॉब्सपेरी, मराट यांनींहि लेनिन व ट्रॉट्स्की यांच्याप्रमाणेंच जगाला मुक्त करण्यासाठीं प्रचंड सैन्य उभें केलें होतें. पण तें सैन्य नेपोलियनच्या हातीं पडलें व त्या सैन्यानें फ्रान्सचें स्वातंत्र्यहि अस्तास नेलें.

लष्करशाहीच्या संरक्षक पंखांखालीं खरें स्वातंत्र्य कधींहि टिकणार नाहीं, जगणार नाहीं. मला एकादे वेळेस वाटतें कीं लेनिननें कांहीं केलें असेल तर तें इतकेंच कीं भावी रशियन नेपोलियनसाठीं त्यानें सैन्य निर्माण करून ठेवलें! लेनिनच्या त्याचप्रमाणें झारच्या लष्करशाहीपासून मुक्त झाल्याविना रशिया पूर्णपणें स्वतंत्र झाला असें म्हणतां येणार नाहीं.

जगाला गांधींचें हृदय असलेला लेनिन खरोखरीं हवा आहे अगर लेनिनची बुद्धि असणारे गांधी हवे आहेत. कांहीं बाबतींत गांधींचें मन जुन्या काळांतील आहेसें वाटतें, त्यांची बुद्धि प्राचीन काळांत वावरत आहेसें वाटतें. विवाहितांना संततीची इच्छा नसेल तर त्यांनीं ब्रह्मचारी राहावें असें ते म्हणतात. ते 'यंत्रें नकोत' असें म्हणतात. ते चरखा हातीं घ्यावयास सांगतात. ते वैद्यकशास्त्राच्याहि विरुद्ध आहेत. ते संन्यस्त वृत्तीचे आहेत. ते शेळीचें दूध व खजूर यांवर राहतात. ते फळें खातात. गाय हिंदुमात्रास पूज्य असल्यामुळें तें गायीचें दूधहि पीत नाहींत. तें हिंदुधर्मांतील अनेक रूढी मानतात. पण या अशा कांहीं गोष्टी सोडून दिल्या तर मानवी रंगभूमीवर गांधींसारखा दिव्य स्फूर्ति देणारा महापुरुष क्वचितच झाला असें



अनुक्रमणिका






आपणांस निःशंकपणें व निःपक्षपातिपणानें म्हणावें लागेल. जगांत होऊन गेलेल्या अत्यंत प्रभावी व स्फूर्तिदायी व्यक्तींपैकीं गांधी एक आहेत.

## अपूर्व युद्धशास्त्रज्ञ

गांधींना महात्मा म्हणतात महात्मा म्हणजे ज्याचा आत्मा मोठा आहे तो, ज्याचें मन मोठें आहे तो, महापुरुष. गांधी केवळ शांतात्मे आहेत असें कित्येक म्हणतात तें केवळ असत्य आहे. सीझरला ज्याप्रमाणें शांततावादी म्हणतां येणार नाहीं, त्याचप्रमाणें गांधींनाहि शांततावादी म्हणतां येणार नाहीं. आज जिवंत असणाऱ्यांत गांधी हे अत्यंत जोरदार लढवय्ये आहेत. खरोखरच त्यांना इतिहासांतील सर्वांत मोठी विभूति असें म्हणावें लागेल. असा युद्धशास्त्रज्ञ पूर्वी कधीं झाला नाहीं. गांधींनीं जें नवें शस्त्र शोधिलें आहे त्याच्याशीं तुलना करून पाहतां तुमच्या या पाणबुड्या, तुमचीं हीं झेपलिनें, तुमचीं हीं आरमारें, तुमच्या या तोफा म्हणजे लहान मुलांचीं खेळणीं वाटतात. गांधींनीं शोधलेलें हें कोणतें शस्त्र ? अहिंसेचें सर्वशक्तिमान् शस्त्र. रक्तपाताशिवाय लढाया कशा जिंकाव्या हें गांधींनीं शिकविलें आहे.

गांधी हे लढवय्ये आहेत. त्यांनीं आयुष्यभर अन्यायाशीं सतत युद्ध चालविलें आहे. कर्मशून्य प्रतिकारहीन शांतिव्रताशीं त्यांना कांहीं एक करावयाचें नाहीं. एखादा सेनापति स्वतःच्या फौजांना जसें शिक्षण देतो, तसेंच तितक्याच दक्षतेनें गांधी आपलें सैन्य तयार करीत असतात. ते लिहितात, " दुसऱ्यास न मारतां स्वतः मरण्याचें शांत, दान्त, धैर्य मी माझ्या सैनिकांत उत्पन्न करण्याचा यत्न करीत असतों. माझी श्रद्धा आहे कीं अहिंसा हिंसेपेक्षां अनंतपट श्रेष्ठ आहे. क्षमा शिक्षेपेक्षां अधिक प्रभावी आहे. क्षमा शूराला भूषविते. " हे शब्द कांहीं नवे नाहींत. असे शब्द पुनःपुनः उच्चारले गेले आहेत. हे शब्द पुनः उच्चारण्यांत गांधींनीं बुद्धाचें अनुकरण केलें आहे. पण गांधींनीं हे शब्द प्रत्यक्ष कृतींत आणून त्या महात्म्याच्या पुढें पाऊल टाकलें आहे. शांतिप्रिय महात्म्याचे ते शब्द बरोबर होते असें अश्रद्ध जगाला गांधींनीं आज पटविलें आहे. त्यामुळें सारे 'सिनिक' चकित झाले आहेत !

गांधींनीं एक मोठा विजय आधींच मिळविला आहे. हिंदुस्थानांत त्यांनीं जें युद्ध मांडलें आहे तें अपेशी होणार असें भविष्य पुष्कळ लोक वर्तवीत असतात व हिंदुस्थानांतील या अहिंसक युद्धाची टिंगल करीत असतात. पण आफ्रिकेंत गांधी अशीच एक लढाई लढले होते व तींत विजयी झाले होते ही गोष्ट हे टीकाकार विसरत असतात. लंडन-विद्यापीठांत कायद्याचा अभ्यास करून ते हिंदुस्थानांत आले व १८९३ सालीं वकिली करूं लागले. पण एका महत्त्वाच्या खटल्यासाठीं दक्षिण आफ्रिकेंत प्रिटोरिया येथें त्यांना बोलावण्यांत आलें. या वेळीं गांधींचें वय फक्त चोवीस वर्षांचें होतें.

थोड्या महिन्यांतच ते आफ्रिका सोडून जाणार होते; पण एकवीस वर्षे ते तेथें राहिले. आफ्रिकेंत दीड लक्ष हिंदी लोक होते. तेथें त्यांचा अपमान करण्यांत येई, त्यांच्यावर जुलूम करण्यांत येई, त्यांना गुलाम म्हणून वागविण्यांत येई. गांधींनीं या सर्वांची संघटना करून शक्ति उत्पन्न केली व अहिंसक लढा सुरू केला. इतिहासांतील ही असली पहिलीच लढाई. रक्तहीन क्रांति करून आपल्या या अहिंसक सेनेला गांधींनीं विजय मिळवून दिला. कोणतें तत्त्व डोळ्यांसमोर ठेवून गांधी वागत होते ? शत्रूला न मारतां त्याला जिंकून घ्यावयाचें असें गांधींचें धोरण होतें. सामान्य शिपाई शत्रूवर विश्वास ठेवीत नसतो. पण गांधीजी शत्रूवरहि नेहमीं विश्वास ठेवीत; म्हणून शत्रूविरुद्ध अहिंसा, अक्रोध व असहकार हीं तीनच शस्त्रें ते वापरत. दुसऱ्यावर जुलूम करणाऱ्या माणसाकरतां किंवा माणसाबरोबर कांहींहि करावयाला ते तयार नसत. संपूर्ण असहकार हें त्यांचें धोरण असे. दक्षिण आफ्रिकेंतील सर्व हिंदी जनतेला अन्यायाविरुद्ध सार्वत्रिक संप करण्याला त्यांनीं प्रवृत्त केलें. 'शत्रूला शारीरिक अपाय करूं नका' ही त्यांनीं आपल्या सैनिकांना शिकविलेली दुसरी गोष्ट. कारण, त्यांचा लढा व्यक्तीविरुद्ध नसून व्यक्तीच्या हृदयांत लपून बसलेल्या पशुतेविरुद्ध होता. 'शत्रू संकटांत असतील तेव्हां त्यांना साह्य करीत जा' ही त्यांनीं आपल्या सैनिकांना शिकवलेली तिसरी गोष्ट. दक्षिण आफ्रिकेंत सत्याग्रह-संग्राम सुरू असतां जोहान्सबर्ग येथें प्लेग उद्भवला. गांधींनीं लगेच लढा थांबविला. आपल्या शत्रूंना मदत करण्यासाठीं व सुखशांति







देण्यासाठीं त्यांनीं आपल्या सैनिकांचें शुश्रूषापथक बनविलें.

## शत्रूंनाहि लाजविलें !

या अभिनव व विचित्र युद्धपद्धतीशीं कोणत्या रीतीनें लढावें हें गांधींच्या शत्रूंना प्रथम कळेचना. त्यांनीं हिंदी लोकांची कत्तल केली, हजारोंना तुरुंगांत डांबलें, गांधींचा छळ केला. एकदां तर ते गांधींना दगडांधोंड्यांनीं ठार करणार होते. तरीहि गांधी व त्यांचे अनुयायी शांतच राहिले. त्यांनीं हातहि उगारला नाहीं. त्यांनीं अन्यायाची परतफेड क्षमेनें, अत्याचाराची करुणेनें व द्वेषाची परतफेड प्रेमानें केली. आणि गांधींचीं शस्त्रें प्रभावी ठरलीं ! गांधी व त्यांचे अहिंसक सैनिक यांनीं शत्रूला लाजविलें ! पराभूत केलें. जनरल स्मट्स्‌चा एक सेक्रेटरी या सत्याग्रह्यांशीं निर्दयपणें लढत होता. तो शेवटीं गांधींना म्हणाला, "मला तुमचे लोक आवडत नाहींत. त्यांना साह्य करावेंसें मला मुळींच वाटत नाहीं. पण मी करूं काय ? आम्हीं अडचणींत असतों तेव्हां तुम्ही साह्यास येतां. तुमच्यावर हात कसा टाकावा? तुम्हीं हिंसेचा अवलंब करावा असें मला कितीदां तरी वाटतें. इंग्रज संपवाले असें करतात. तुम्हींहि हिंसक बनाल तर तुमचा प्रश्न कसा मिटवावा हें आम्हांस माहीत आहे. पण तुम्ही शत्रूलाहि अपाय करीत नाहीं, आत्मक्लेशानेंच विजय मिळवूं इच्छितां. स्वेच्छेनें घालून घेतलेल्या सुजनतेच्या व उदारतेच्या मर्यादा तुम्ही कधीं उल्लंघीत नाहीं. त्यामुळें आम्ही केवळ अगतिक व किंकर्तव्यमूढ होऊन गेलों !"

शांतिमय अहिंसक प्रतिकारानें हिंसेवर पूर्ण विजय मिळविला. जनरल स्मट्स् गांधींना शरण आला. १९१४ सालीं दक्षिण आफ्रिकेंतील हिंदी लोक मुक्त झाले.

## हिंदुस्थानांतील प्रयोग

१९१९ सालीं गांधींनीं दक्षिण आफ्रिकेंत विजयी झालेला हा दिव्य प्रयोग हिंदुस्थानांत सुरू केला. या वेळीं तीस कोटी लोकांचें सबंध राष्ट्र त्यांनीं अहिंसक झगड्यासाठीं उभें केलें. स्त्रिया, पुरुष, मुलें, सर्वच अहिंसक बंडासाठीं उठलीं. १९१४ सालच्या महायुद्धांत हिंदुस्थाननें नऊ लक्ष पंचाऐंशीं हजार सैनिक दिले. या राजनिष्ठेचें बक्षीस म्हणून स्वराज्य देण्याचें इंग्रजांनीं दिलेलें अभिवचन युद्ध संपतांच ते विसरले व हिंदुस्थानला स्वातंत्र्य देण्याऐवजीं असलेलें पारतंत्र्यच त्यांनीं अधिक दृढ केलें. त्यामुळें हिंदुस्थान संतापला. १९१९ सालच्या फेब्रुवारीच्या अठ्ठाविसाव्या तारखेस सात्त्विक संतापाचा अहिंसक संग्राम सुरू झाला. प्रिन्स ऑफ वेल्स हिंदुस्थानला भेट देण्यास आले. पण ते कलकत्त्यांत आले तर सारे रस्ते निर्जन होते ! जिकडे तिकडे शुकशुकाट ! त्यांच्या स्वागतासाठीं एकहि मनुष्य बाहेर आला नाहीं.

देशभर सार्वत्रिक धरपकड झाली. पंचवीस हजार स्त्री–पुरुषांची तुरुंगांत रवानगी करण्यांत आली ! ते तुरुंगांत जातांना आनंदानें गाणीं गात होते. शेवटीं गांधींनाहि अटक झाली. 'ब्रिटिश सरकारविरुद्ध बंड पुकारून मीं जाणूनबुजून उघडपणें कायदा मोडला आहे !" असें गांधींनीं कबूल केलें. खटल्याच्या वेळीं ब्रूमफील्ड हे न्यायाधीश होते. गांधी म्हणाले, "मी दयेची याचना करीत नाहीं, केलेलीं कर्में सौम्यहि करून दाखवूं इच्छीत नाहीं. मीं कायद्याप्रमाणें जाणूनबुजून गुन्हा केला आहे. पण नागरिक या नात्यानें तसें करणें हें माझें परमोच्च कर्तव्यच होतें. म्हणून देतां येईल ती जास्तींत जास्त शिक्षा मला द्या, ती मी आनंदानें स्वीकारीन व भोगीन. न्यायाधीश महाराज, तुमच्यासमोर दोन मार्ग आहेत : न्यायाधीशाची जागा तरी सोडा, नाहीं तर मला कठोरतम शिक्षा तरी फर्मावा."

न्यायाधीश ब्रूमफील्डहि उदारतेंत हटणारे नव्हते. ते म्हणाले, "तुमच्या लक्षावधि देशबांधवांच्या दृष्टीनें तुम्ही एक मोठे देशभक्त व थोर पुढारी आहां ही गोष्ट लक्षांत न घेणें अशक्य आहे. राजकीय मतांच्या बाबतींत तुमच्याशीं मतभेद असणारे लोकहि 'तुम्ही एक उदात्त ध्येयाचे पुरुष आहां, संत आहां,' असें मानतात."

तें बंड तात्पुरतें थांबलें; पण त्या अहिंसक बंडानें ब्रिटिश सरकारला बराच विचार करावयाला लावलें यांत शंकाच नाहीं. मुंबई प्रांताचे गव्हर्नर सर जॉर्ज लॉइड म्हणतात, "जागतिक इतिहासांत





गांधींचा हा प्रयोग अत्यंत मोठा, भव्य व प्रचंड होता व तो यशाच्या अगदीं जवळ आला होता.''

१९२२ सालची ही गोष्ट. पुढें गांधीजी सुटले. आजारी असल्यामुळें त्यांना प्रत्यक्ष राजकारणांत कांहीं वर्षें भाग घेतां आला नाहीं. ब्रिटिशांना वाटलें कीं हिंदी चळवळ थांबली, सत्याग्रह बंद पडला, मेला. पण गांधी योग्य वेळेची वाट पाहत होते. अहिंसक असहकाराच्या प्रयोगासाठीं ते राष्ट्राला निरनिराळ्या रीतींनीं सारखी शिकवण देत होते. १९२९ सालीं त्यांची शक्ति पुनः आली. शत्रूंना मित्र करण्याच्या कलेचें बरेंचसें शिक्षण त्यांच्या सैनिकांना मिळालें होतें. त्यांनीं ब्रिटिश सरकारविरुद्ध शेवटचें व फार मोठें बंड सुरू केलें. त्यांना पुनः तुरुंगांत घालण्यांत आलें. त्यांच्या साठ हजार अनुयायांनाहि तुरुंगांत डांबण्यांत आलें. पण तुरुंगांत जाण्यास शत्रूवर हात न टाकतां स्वतः कष्ट भोगण्यास सारें राष्ट्र शिस्तींत उभें होतें. जुलमी सरकारचा द्वेष न करतां त्याचे कायदे मोडण्याला, जंगली सत्ताधीशांच्या हिंसक उद्दामपणाला सुसंस्कृत लोकांच्या शांत स्वाभिमानानें उत्तर द्यावयास सारें राष्ट्र सज्ज होतें. तेथें साठ हजार म्हणजे वास्तविक मूठभरच लोक तुरुंगांत गेले!

हिंदी राष्ट्राचा विजय झाला. १९३१ च्या जानेवारीमध्यें गांधींना मुक्त करण्यांत आलें. ब्रिटिश सरकारनें हिंदुस्थानला स्वराज्य दिलें; पण गांधींचें पूर्ण समाधान झालें नाहीं. त्यांना संपूर्ण स्वातंत्र्य हवें होतें आणि कां हवें असूं नये? ब्रिटिशांना हिंदुस्थानवर राज्य करण्याचा काय अधिकार? बेकायदा आक्रमणाच्या जोरावर ते सत्ताधीश आहेत. हिंदुस्थानांतील इंग्रज हे जेते नसून पाहुणे आहेत असें गांधी मानीत. ते प्रसंगीं इंग्रजांचे हुकूम मानीत नसत; पण इंग्रज संकटांत पडले, त्यांना अडचण आली, तर गांधी लगेच त्यांच्या मदतीला धांवत. पाश्चिमात्यांच्या पाणचटपणाला गांधी पौर्वात्यांच्या सुजनतेनें सुसंस्कृतपणें उत्तर देत. आपल्या सहनशीलतेनें, हालअपेष्टांनीं, दयेनें, क्षमेनें, सौजन्यानें, कार्यकुशलतेनें ते इंग्रजांना सभ्य माणसें बनविण्याची महत्त्वाकांक्षा बाळगीत. त्यांनीं जगाला सिद्ध करून दाखविलें कीं शस्त्रास्त्रांचीं युद्धें आतां जुनाट झालीं, मोठ्यांत मोठ्या लढायाहि रक्तपाताशिवाय लढतां येतात आणि प्रेम हेंच पृथ्वीवरील अत्यंत प्रभावी व प्रबळ शस्त्र होय. त्यांचें जीवनकार्य पुरें झालें आहे.

---

## लेनिनचें हास्य

लेनिनचें एक अपूर्व वैशिष्ट्य म्हणजे त्याचें हास्य. त्याच्या सान्निध्यांत येणाऱ्या प्रत्येकावर त्याच्या हास्याचा जादूसारखा परिणाम होई. कोणाकोणाला त्याच्या त्या हास्यांत कठोरता आहेसें भासे, तर कित्येकांना त्यांत सुस्वभाव व आनंद यांचें प्रतिबिंब दिसे. ब्रॅडफर्ड लिहितो, ''तें हास्य मला तरी कोडेंच होतें. मी तरी तें समजूं शकलों नाहीं!'' पण मला वाटतें कीं, त्याचें हंसें समजून घेणें सोपें आहे. लेनिन हंसे तें तो कठोर होता म्हणून नसे, अगर आनंदी होता म्हणूनही नसे; तर तो दुःखी होता म्हणून. त्यानें इतकें दुःख इतक्या उत्कटपणें सोसलें होतें कीं, तो आतां पोटभर हंसावयास शिकला होता. या मानवी नाटकाला नवीन स्वरूप देण्यासाठीं तो धडपडत होता; पण हा सारा विश्वव्यापक फार्स आहे हें त्याला दिसत होतें. त्याचें हास्य स्विफ्टच्या किंवा मार्क ट्वेनच्या हास्याप्रमाणें होतें. त्यानें मानवजातीसाठीं स्वतःच्या होम केला; पण मानवजात तिच्यासाठीं इतका होम करण्याच्या लायकीची नाहीं हें तो जाणत होता. स्वतःच्या कम्युनिस्ट-बंधूंतहि त्याला असा अनुभव येत असे कीं, ''शेंकडा एक प्रामाणिक असला तर एकोणचाळीस गुंड व साठ टोणप्ये असतात.'' गटेप्रमाणेंच त्यानें मानवाची मूर्खता व त्याचें दुःख ही तळाशीं बुडून पाहिलीं होतीं, समजून घेतलीं होतीं. 'अश्रूंत हास्य असतें' हें एका लॅटिन कवीचे शब्द त्यालाहि नीट समजले होते. लेनिनच्या हंसण्यांत अश्रू असत.

—डॉ. हेन्री टामस








प्रा. दि. धों. कर्वे

# अलाहाबाद येथील भारतीय शास्त्रीय परिषद्

अलाहाबाद येथील यंदांचें ३ जानेवारी १९४९ ते ८ जानेवारी १९४९ पर्यंत भरलेलें भारतीय शास्त्रीय परिषदेचें अधिवेशन ३६ वें होय. ही परिषद १९१३ सालीं प्रो. मॅक्‌मोहन् व प्रो. सायमन्सन् ह्या दोन इंग्रज प्राध्यापकांच्या प्रयत्नानें सुरू झाली. प्रथम प्रथम तिचीं अधिवेशनें व कारभार कलकत्ता येथील 'एशिॲटिक सोसायटी ऑफ बेंगाल' ह्या संस्थेच्या विद्यमानें चालत असे. पण पुढें 'इंडियन सायन्स कॉंग्रेस असोशिएशन' नांवाची स्वतंत्र संस्था स्थापन झाली व तिच्या विद्यमानेंच हीं वार्षिक अधिवेशनें भरत आहेत. पहिल्या वर्षींच्या कलकत्ता येथील अधिवेशनाला हिंदुस्थानांतील ४०–५० सभासद आले होते, तर गेल्या कांहीं वर्षांतील अधिवेशनांना हजार–दीड हजार बाहेरचे सभासद सहज येत असले पाहिजेत. प्रथम परिषदेचे रसायनशास्त्र, भौतिक शास्त्र, प्राणिशास्त्र, वनस्पतिशास्त्र, भूस्तरशास्त्र व मानवशास्त्र एवढेच विभाग होते; ते आतां वाढत वाढत वैद्यक, गणित व संख्याशास्त्र, शरीरव्यापारशास्त्र, मानसशास्त्र, कीटकशास्त्र, कृषिशास्त्र इत्यादि विभागांची भर पडून विभागांची संख्या तेरांवर आली आहे.

प्रथमच परिषदेच्या घटनेची स्थूल कल्पना दिली म्हणजे वाचकांस तिचें सर्वसाधारण स्वरूप कळण्यास मदत येईल. दर वर्षीं १२ रु. देणारे असे सुमारें २००० सभासद आणि कांहीं सन्मान्य व आजीव सभासद ह्यांनीं निवडलेलें कार्यकारी मंडळ ह्या परिषदेचा कारभार पहातें. ह्या मंडळांत दोन चिटणीस, खजिनदार, अध्यक्ष इत्यादि पदासिद्ध सभासदहि समाविष्ट असतात. परिषेद्ची मुख्य कचेरी कलकत्ता येथें असते व कार्यकारी मंडळाच्या सभाहि तेथेंच भरत असल्यामुळें तेथील सभासदांच्या मतानुसारच परिषदेचें कामकाज चालतें असें म्हणतां येईल. बाहेरील सभासदांना कार्यकारी मंडळाच्या सभांना मुद्दाम कलकत्त्याला जाणें फारसें शक्य होत नाहीं. परिषदेचें बजेट करणें, पुढील अधिवेशनाकरितां अध्यक्षांचें नांव व अधिवेशनाची जागा सुचवणें, मागील वर्षाचा अहवाल सर्वसाधारण सभेला सादर करणें इत्यादि कामें कार्यकारी मंडळ करतें.

परिषदेचे जे निरनिराळे शास्त्रीय विभाग आहेत त्या प्रत्येक विभागाची एक विभागसमिति असते. त्या विभागसमितींत त्या त्या विभागाचे भूतपूर्व अध्यक्ष आणि चिटणीस असे असतात. ह्या विभागसमितीनें पुढील वर्षाच्या परिषदेंतील त्या त्या विभागाच्या अध्यक्षाचें व चिटणिसाचें नांव सुचवावयाचें असतें. मात्र हीं नावें ज्या निवडणूक-पद्धतीनें सुचविलीं जातात ती अत्यंत सदोष आहे असें माझें मत आहे व ती सुधारण्याबद्दलची एक सूचना मीं कार्यकारी मंडळाकडे पाठवली आहे. सध्यांची पद्धत अशी : सप्टेंबरमध्यें विभाग–अध्यक्ष विभाग-समितीच्या सभासदांकडून अध्यक्ष व चिटणीस यांच्या नांवांच्या सूचना मागवतात. ह्या सूचनांवरून मतपत्रिका तयार होऊन समितीच्या सर्व सभासदांकडे जातात व प्रत्येक सभासदानें अध्यक्षपदाकरितां १ व चिटणिसाच्या जागेकरितां १ अशा दोन नांवांना संमति दर्शविणारी मतपत्रिका भरून पोस्टानें पाठवावयाची असते. ह्या पद्धतींतील दोष असा कीं एका जागेकरतां बऱ्याचशा नांवांची सूचना जर आली असेल तर सर्वांत अधिक मिळणाऱ्या मतांची संख्याहि सभासदांच्या संख्येच्या मानानें अगदींच लहान असते व तरीहि अशा अल्प मतांनींहि अध्यक्ष अगर चिटणीस निवडून येऊं शकतो. उदाहरणार्थ, समितींत २५-३० सभासद








# अलाहाबाद येथील भारतीय शास्त्रीय परिषद्

असले व ५–६ उमेदवारांचीं नांवें अध्यक्षपदाकरतां सुचवलीं गेलीं तर निरनिराळ्या उमेदवारांना ५,४, ४,३,२ अशीं मतें पडतात व अखेर ५ मतें मिळा-लेली–म्हणजे समितींतील फारच थोड्या लोकांच्या पसंतीची व्यक्ति विभागाचा अध्यक्ष होऊं शकते. अनेक विभागांत हा प्रकार हल्लीं होऊं लागला आहे व विभागाचा अध्यक्ष त्या त्या विषयांत संशोधन करणारी अधिकारी व्यक्ति असण्याऐवजीं ज्या व्यक्तीला अध्यक्षपद मिळाल्यामुळेंच महत्त्व प्राप्त होईल अशा व्यक्तींची वर्णी लागूं लागली आहे. त्यांतच अध्यक्षपदाच्या जोरावर सरकारी नोकरींत, विश्वविद्यालयांत अगर संशोधन-संस्थांत बढती मिळवूं इच्छिणारे, धडपडे उमेदवार विभागाचें अध्यक्षपद मिळवण्याकरतां ह्या सदोष पद्धतीचा पूर्ण फायदा घेतात असेंहि आढळतें. तसेंच ह्या निवडणुकींत प्रांतीय अभिमानामुळेंहि योग्य व्यक्ती बाजूला सारल्या जातात असा अनुभव आहे. रसायन–विभागांत दक्षिण हिंदुस्थानमधील एका सुप्रसिद्ध संशोधकाचें नांव असूनहि त्याला बाजूस सारून कलकत्त्याच्या एका दुय्यम दर्जाच्या शास्त्रज्ञाची अध्यक्ष म्हणून निवड झाली आहे.

पूर्वी ज्या प्रांतांत परिषद भरे तेथील गव्हर्नरनें परिषदेचें उद्घाटन करावें अशी प्रथा असे. यंदा गव्हर्नरांची जागा हिंदी मुख्य प्रधान पं. जवाहरलाल नेहरू यांनीं घेतली होती. त्याचप्रमाणें परिषदेच्या अधिवेशनाला निमंत्रण देणाऱ्या विश्वविद्यालयाच्या उपकुलगुरूंकडे प्राथमिक भाषण करून सभासदांचें स्वागत करण्याचें काम असतें तेंहि यंदां संयुक्त प्रांताचे पंतप्रधान पं. गोविंदवल्लभ पंत यांनीं केलें. माझ्या मतें ह्या दोन्हीहि गोष्टी अनिष्ट अशा आहेत. प्रांतांच्या अगर मध्यसरकारच्या मंत्र्यांनीं निरनिराळ्या समारंभांत भाग घेऊन आपला वेळ फुकट घालविणें योग्य नाहीं; त्यांनीं आपला सर्व वेळ राज्यकारभार करण्यांतच घालवला पाहिजे. पास झालेल्या बिलांवर सह्या करण्यापलीकडे गव्हर्नर व गव्हर्नर-जनरल ह्यांना कोणतेंच काम नसल्यामुळें पायाचे दगड, उद्घाटन-समारंभ, बक्षीस-समारंभ इत्यादि औपचारिक गोष्टी त्यांनींच कराव्या. शिवाय मंत्री हे राजकारणाच्या धकाधकींत असल्यामुळें व निवडणुकी लढवतांना लांबलांब भाषणें करण्याची त्यांना संवय असल्यामुळें ते एकदां बोलूं लागले म्हणजे त्यांना भान रहात नाहीं असा अनुभव आहे. यंदां प्रथम पं. पंत ह्यांनीं स्वागतपर भाषण केलें, नंतर सौ. सरोजिनी नायडू यांनीं पं. जवाहरलाल ह्यांना उद्घाटन करण्याची विनंति केली व ह्या दोन भाषणांना अर्धा तास लागला. नंतर पंडित जवाहरलाल नेहरू ह्यांनीं एक तासाच्यावर उद्घाटनाचें भाषण केलें व त्या बैठकीचा मुख्य भाग म्हणजे परिषदेच्या अध्यक्षांचें भाषण तें–ह्यांतच परदेशीय शास्त्रज्ञांची ओळख, आभारप्रदर्शन इत्यादींचाहि समावेश झाला होता–फक्त अर्ध्या तासांत आवरावें लागलें ! त्यांतूनाहि परिषदेचे अध्यक्ष सर के. एस्. कृष्णन् ह्यांनीं मागील अनेक वर्षांची प्रथा मोडून आपलें भाषण लिहून व छापूनहि तयार केलें नव्हतें. केवळ सूर्यांतील शक्तीचा उगम परमाणुपरिवर्तनामुळें होत असून ती जवळजवळ अनंत काल पुरेल इत्यादि विचार–सोप्या भाषेंतील एकाद्या शास्त्रीय व्याख्यानाप्रमाणें––त्यांनीं थोडक्यांत मांडले. एकंदर हा सर्व प्रकार विशेष स्फूर्तिदायक झाला असें म्हणतां येणार नाहीं.

ह्यांत आणखीहि एक लहानसा घोटाळा झाला होता. दर वर्षी परिषदेचें अधिवेशन ता. २ जानेवारी ते ८ जानेवारी व्हावयाचें असा संकेत आहे. ता. २ रोजीं उद्घाटन व अध्यक्षीय भाषण झालें. म्हणजे ता. ३ पासून विभागांच्या कामाला सुरुवात होते. यंदां पं. नेहरूंच्या घरीं त्यांच्या भाचीचें लग्न ता. २ ला होतें त्यामुळें म्हणा अगर अन्य कांहीं कारणांमुळें म्हणा, उद्घाटन ता. ३ रोजीं झालें व विभागांचें काम ता. ४ पर्यंत सुरू झालें नाहीं ! २ तारखेच्या बेतानें अलाहाबादला आलेल्या शेकडों शास्त्रज्ञांचा वेळ अशा प्रकारें फुकट गेला.

प्रत्येक विभागापुढें, अध्यक्षीय भाषण, निरनिराळ्या सभासदांनीं पाठवलेल्या संशोधनविषयक निबंधांचें वाचन व त्यांवरील वादविवाद, दोन अगर अधिक विभागांची संयुक्त अधिवेशनें, कांहीं महत्त्वाच्या विषयावरील चर्चा इत्यादि कार्यक्रम

ठरवलेले असतात. यंदा जवळजवळ सर्व विभागांच्या अध्यक्षांचीं भाषणें असमाधानकारक अशीं झालीं. ह्याचें कारण असें कीं, अध्यक्षानें आपल्या संशोधनकार्याचा व तत्सम विषयांवरील इतरत्र झालेल्या संशोधनाचा आढावा घ्यावा व त्यांतील पुढील प्रगतीची दिशा दाखवावी अशी जी मूळ कल्पना ती बहुतेक अध्यक्षांनीं सोडून, त्या विषयांतील शिक्षणक्रम, त्या विषयांतील एकाद्या उपशाखेंतील इतरांनीं केलेल्या कामाचा आढावा, त्या विषयांचें हिंदी राष्ट्राच्या भावी प्रगतींतील स्थान, अशा सर्वसाधारण विषयांवर व्याख्यानें दिलीं. विभागांचे अध्यक्ष हे त्या त्या विषयांवरील महत्त्वाचें संशोधन करणारे अधिकारी पुरुष नव्हते. फार काय, प्रत्येक विषयांत असे अधिकारी पुरुष आपल्या देशांत पुरेसे नाहींत हीच गोष्ट ह्यामुळें सिद्ध झाली.

निरनिराळ्या संयुक्त चर्चांचा कार्यक्रम फार काळजीपूर्वक ठरवावा लागतो व एकाच विषयाच्या निरनिराळ्या दृष्टींनीं विचार करणारीं भाषणें प्रथम होऊन नंतर सर्वसाधारण वादविवाद व्हावयाचा असतो. ह्या भाषणांचे विषय, तीं करणारे वक्ते व त्यांना दिलेला वेळ हीं सर्व जर पद्धतशीर रीतीनें ठरवलीं गेलीं आणि मूळ योजनेप्रमाणें सर्व कार्यक्रम पार पाडण्यांत आला तरच चर्चा उपयुक्त व उद्बोधक होण्याची आशा. पण पुष्कळदां चर्चेंत भाग घेणारे वक्ते परिषदेला हजरच नव्हते किंवा त्यांनीं आपलीं भाषणें लिहून आणलेलीं नव्हतीं असें आढळून येई. मग आयत्या वेळीं कोणीं तरी जुजबी भाषणें करावीं व एकंदर चर्चेंतून कांहीं विशेष फलनिष्पत्ति होऊं नये असाच प्रकार बहुतेक दिसून आला.

कित्येक विषयांवरील संशोधकांची अशी कल्पना दिसून येते कीं, आपण परिषदेपुढें वाचलेल्या निबंधांच्या संख्येवरून आपली योग्यता ठरवली जाते. एकाच संशोधकानें एकाच विषयावरील अगर सारख्या सारख्या विषयांवरील १०–१५ वेगळ्या वेगळ्या निबंधांचा गोषवारा एका अगर अधिक विभागांपुढें वाचण्याकरितां पाठवला असें पुष्कळदां आढळतें. रसायनासारख्या विभागापुढें शेंकडों निबंध येतात. त्यांपैकीं बहुतेक सर्व अगदींच मामुली स्वरूपाचे असतात व त्यांपैकीं जे वाचले जातात किंवा ज्यांवर चर्चा होते तेहि कांहीं विशेष महत्त्वाचे नसतात. अशा प्रकारें निबंधवाचन न करतां कांहीं महत्त्वाचे विषय आधीं ठरवून त्यांवरील चर्चा पूर्वयोजनेप्रमाणें करण्याचे व ती खरोखर महत्त्वाची व फलनिष्पत्ति होण्यासारखी करण्याचे प्रयत्न झाले पाहिजेत. ही गोष्ट विशेषतः रसायन, भौतिक इत्यादि शास्त्रांच्या बाबतींत ज्या विषयांतील निबंधांची संख्या बरीच मोठी असते त्यांच्या बाबतींत व्हावयास पाहिजे.

परिषदेला येणाऱ्यांचे अनेक प्रकार आहेत. सरकारी खात्यांतील अनेक अधिकारी, त्या त्या खात्यांचे प्रतिनिधी म्हणून येतात. तसेंच विश्वविद्यालयें, कॉलेजें इत्यादिमधील प्राध्यापक त्या त्या संस्थांचे प्रतिनिधी म्हणून येतात. ह्या सर्वांना प्रवासखर्च, भत्ता इत्यादि मिळतो. माझा अनुभव असा आहे कीं ह्यांपैकीं पुष्कळसे लोक परिषदेच्या कामांत फारसा मनापासून भाग घेत नाहींत व जणूं काय आपल्याला पैशाची तोशीस न लागतां एकादा आठवडा सुट्टी मिळाली आहे अशा समजुतीनें वागत असतात.

परिषदेच्या स्थानिक समितीतर्फें जेवण्या–रहाण्याची जी सोय केलेली होती ती दुय्यम प्राध्यापक, संशोधन करणारे विद्यार्थी, खासगी संस्थांत कमी पगारावर काम करणारे शिक्षक इत्यादींना झेपण्यासारखी नव्हती. उदाहरणार्थ, यंदा अलाहाबादेस निरनिराळ्या ठिकाणीं जेवण्या-रहाण्याच्या सोईकरितां रोजीं ८ रुपये ते १५ रुपये पडत होते! ज्या बड्या लोकांना हा खर्च परवडणें शक्य होतें त्यांची बहुधा स्थानिक बड्या लोकांकडे पाहुणे म्हणून सोय होते व यंदांहि होती व ज्यांना हा खर्च झेपणें कठिण त्यांना मात्र तो सोसावा लागतो! ह्या पद्धतींत बदल होणें अवश्य आहे. ज्या ठिकाणीं परिषद् भरते तेथें १००–१५० सुखवस्तू कुटुंबें अशीं काढावीं कीं त्यांनीं ५–६ दिवस प्रत्येकीं एक अगर दोन पाहुणे उतरण्याची व्यवस्था करावी. तसेंच रहाण्या-जेवण्याच्या सोईकरितां रोजीं ३–४ रुपये खर्चांत, म्हणजे परिषदेच्या ६–७ दिवसां-







# अलाहाबाद येथील भारतीय शास्त्रीय परिषद्

करतां प्रत्येकीं २५-३० रुपयांपेक्षां जास्त खर्च न होईल अशा प्रकारची व्यवस्था करणें जरूर आहे. नाहीं तर ही परिषद् केवळ श्रीमंत लोकांकरतांच राहील व अभ्यासू, होतकरू, तरुण शास्त्रज्ञांना व विद्यार्थ्यांना तेथें जाणें अशक्य होईल.

परिषदेच्या कार्यक्रमापैकीं आणखी एक भाग म्हणजे सायंकाळीं होणारे फराळ व त्यानंतर सर्वसाधारण श्रोत्यांकरतां होणारीं तज्ज्ञांचीं व्याख्यानें ह्यापैकीं पहिल्या कार्यक्रमाबद्दल बोलावयाचें म्हणजे अलाहाबादेंत धान्यवांटप, मेजवान्यांवरील निर्बंध इत्यादि नसल्यामुळें हजार-दीडहजार सभासदांना पेयें व खाद्यें भरपूर प्रमाणांत पुरविल्याचें, मुंबई प्रांतांतील सभासदांना न दिसणारें, दृश्य तेथें दिसलें. पुढच्या वर्षी परिषद् पुण्यास येणार असल्यामुळें ह्या सर्व प्रश्नांना बरेंच महत्त्व आहे. अशा तऱ्हेच्या मेजवान्या पुण्यांत होणें कायद्यानेंच अशक्य आहे. त्यांतून परिषदेला येणाऱ्या पाहुण्यांची संख्या आतां इतकी प्रचंड झाली आहे कीं त्या सर्वांची रहाण्याची व जेवण्याची सोय करणें दिवसेंदिवस अतिशय अवघड होऊं लागलें आहे. ह्यामुळें परिषदेला निमंत्रण करणाऱ्या विश्वविद्यालयाला अगर प्रांतिक अथवा संस्थानी सरकारला मोठीच जबाबदारी अंगावर घ्यावी लागते.

सायंकाळच्या व्याख्यानांचा मूळ ठरविलेला कार्यक्रम व्याख्यात्यांच्या अनुपस्थितीमुळें बराच बदलावा लागला. प्रो. सिडनी चॅपमन् व प्रो. श्रॉयनर ह्या परदेशीय व्याख्यात्यांचीं व्याख्यानें त्यांच्या विशिष्ट विषयांवर झालीं व तीं फारच उद्बोधक होतीं. सर ज्ञानचंद्र घोष ह्यांचें व्याख्यान ठरविलेल्या दिवशीं न होतां दुसऱ्या एका दिवशीं झालें. तें शुद्ध शास्त्रीय व औद्योगिक संशोधन, सरकारी संशोधन संस्था, हिंदुस्थानची औद्योगिक प्रगति इत्यादि विषयांवरील सटरफटर चर्चेनें भरलेलें व नीरस असें झालें. प्रो. भाभा यांचें व्याख्यानहि कार्यक्रमाप्रमाणें झालें नाहीं पण तें चांगलें झालें. हीं व्याख्यानें शक्य तर निरनिराळ्या देशी भाषांतून व्हावयास पाहिजेत म्हणजे इंग्रजी न जाणणाऱ्या श्रोत्यांनाहि त्यांचा फायदा मिळेल. पहिल्या दिवशीं प्रो. भाभा व सर ज्ञानचंद्र घोष यांचीं दोन्ही व्याख्यानें रद्द करून आयत्या वेळीं सर चंद्रशेखर रामन् यांचें व्याख्यान झालें. पण पुष्कळ मंडळींना ह्या योजनेची बातमीहि नव्हती.

इंडियन सायन्स कॉंग्रेसच्या रौप्यमहोत्सवाला इंग्लंड, अमेरिका, स्वित्झर्लंड, जर्मनी, फ्रान्स इत्यादि देशांतून अनेक जगद्विख्यात शास्त्रज्ञ आले होते. सर जेम्स जीन्स ह्यांनाच त्या अधिवेशनाचें अध्यक्षपद देण्यांत आलें होतें. ह्या शास्त्रज्ञांनीं व्याख्यानें दिलीं, विभागांच्या सभांतील चर्चेत भाग घेतला व हिंदी शास्त्रज्ञांची ओळख करून घेतली. पुढें लढाईनंतर १९४७च्या अधिवेशनाला इंग्लंड, अमेरिका व रशिया येथील शास्त्रज्ञ आले होते. मात्र त्या वर्षी वादळी हवेमुळें त्यांचीं विमानें १-२ दिवस उशिरां पोंचल्यामुळें परिषदेच्या पूर्वनियोजित कार्यक्रमांत भयंकर गोंधळ उडाला. परदेशीय शास्त्रज्ञ न आल्यामुळें सबंध अधिवेशन १ दिवस पुढें ढकललें व जमलेले हजार-बाराशें हिंदी शास्त्रज्ञ व्यर्थ माशा मारीत बसले! हिंदुस्थानखेरीज दुसऱ्या कोणत्या देशांत हा प्रकार पहावयास मिळाला नसता! मागूनहि मध्येंच केव्हां तरी रशियन शास्त्रज्ञ येऊन पोंचल्यामुळें पुन्हां एक वार त्यांच्या सत्काराची सभा झाली व इतर सर्व कार्यक्रम स्थगित केले. अर्थात् ज्यांना ही माहिती कळली नाहीं असेहि पुष्कळ सभासद होते व ते आपापल्या विभागांच्या सभा भरवून चर्चा करीत होते.

१९४७ च्या अधिवेशनापासून परदेशीय शास्त्रज्ञ बोलावण्याची एक प्रथाच पडलेली दिसते व ह्या कामीं हिंदुस्थान सरकारचे हजारों रुपये खर्च होत आहेत. मला तर हा सर्व प्रकार पूर्णपणें निरर्थक वाटतो. खरोखर जर परदेशांतलि पहिल्या श्रेणीच्या शास्त्रज्ञांचा हिंदुस्थानला फायदा व्हावयाचा असेल तर त्यांना अशा प्रकारच्या परिषदांना आमंत्रण करून त्यांचीं मोठमोठ्या जनसमुदायापुढें चार व्याख्यानें करून, त्यांना भोजनांना किंवा पार्ट्यांना बोलावून तो होणार नाहीं. सध्यांचा प्रकार हिंदुस्थानांतील कांहीं व्यक्तींना परदेशांतील शास्त्रज्ञांच्या पुढें पुढें करण्याची संधि मिळावी ह्याकरतां करण्यांत येतो (-पण त्याचाहि फारसा उपयोग होत नाहीं!-) असें माझें स्पष्ट मत आहे. यंदाच्या अधिवेशनाला तर 'येणार,








येणार', म्हणून गाजावाजा केलेले सर रॉबर्ट रॉबिन्सन्, मादाम् क्यूरी, जोलिओ इत्यादि जगद्विख्यात शास्त्रज्ञ आलेच नाहींत. प्रो. झॉयनर पुण्याच्या डेक्कन कॉलेजच्या व हिंदुस्थानसरकारच्या प्राचीनेतिहास–खात्याच्या विद्यमानें आलेले असून शास्त्रीय परिषदेला केवळ सहजगत्या हजर राहिले. प्रो. चॅपमन् व इतर १–२ एवढेच शास्त्रज्ञ परिषदेला म्हणून मुद्दाम आले. ह्यावरून परदेशीय पंडितांना देखील ह्या प्रकरणांत कांहीं तथ्य नाहीं व हा वेळेचा अपव्यय आहे असें वाटूं लागल्याचें दिसतें. एक तर, कितीहि मोठा शास्त्रज्ञ असला तरी हजारों लोकांपुढें एखाद्या राजकारणी पुरुषाप्रमाणें व्याख्यानबाजी करणें हा त्याचा आवडता उद्योग असणें शक्य नाहीं. तज्ज्ञांच्या पुढें तो एखादें व्याख्यान देईल अगर संशोधनांत गुंतलेल्या विद्यार्थ्यांबरोबर चर्चा करील. पण व्यर्थ मेजवान्या झोडणें, सत्कार-समारंभ करणें इत्यादि गोष्टींत वेळ घालवण्यास तो तयार होणार नाहीं. हिंदुस्थानांत कोणीहि, कोणात्याहि शाखेंतला मोठा मनुष्य असला कीं त्याच्या व्याख्यानाला शनवार-वाड्यापुढील व्याख्यानाचें (श्रोत्यांकडून) स्वरूप येऊं पहातें! त्यापेक्षां एकाद्या परदेशीय शास्त्रज्ञाला बोलावून, एका विश्वविद्यालयाच्या ठिकाणीं त्यानें रहावें व सर्व हिंदुस्थानांतील त्या विशिष्ट शाखेंत उच्च प्रकारचें शिक्षण अथवा संशोधन करणारे मोजके लोक तेथें बोलावून त्यांनीं २–४ आठवडे चर्चा करावी, पुढील संशोधनाचा कार्यक्रम आंखावा व आपल्या संशोधनांत येणाऱ्या अडचणींबद्दल वाद-विवाद करावा अशी व्यवस्था केली तरच खर्च केलेल्या पैशाचें चीज होईल. न पेक्षां परदेशीय शास्त्रज्ञांना हिंदी शास्त्रज्ञ, त्यांच्या परिषदा, त्यांची विलक्षण उत्सवप्रियता, त्यांचा दुय्यम दर्जा इत्यादींची स्पष्ट कल्पना आणून देण्यांकरतांच आपला पैसा खर्च होईल.

यंदाच्या परिषदेंत संस्था अगर प्रेक्षणीय स्थळें ह्यांना भेटी देण्याचा कार्यक्रम जवळजवळ नव्हताच. फक्त एका दिवशीं नैनी येथें अमेरिकन मिशननें चालविलेल्या एका फार्मला भेट होती व शनिवारीं अलाहाबादपासून सुमारें ५० मैलांवर असणाऱ्या कौसांबी ह्या गांवीं कांहीं प्राचीन अवशेष आहेत तेथें एक मोटार-बस भरून प्रतिनिधी नेले होते. ह्या सफरीचा सर्व घोटाळाच झाला. जाऊन-येऊन १०० मैल मोटारनें जाणें व दुपारचें जेवण एवढ्याबद्दल प्रत्येकीं रु. ११ घेतले होते! कौसांबीपासून ५॥ मैलांवर बस थांबली. एक पूल फार अरुंद असल्यामुळें बस पुढें जाणें शक्य नाहीं असें आढळून आलें. पुष्कळ खटपट करूनहि दुसरें कांहीं वाहन न मिळाल्यामुळें तेथेंच दुपारचें जेवण सायंकाळीं ५ वाजतां करून रात्रीं ८ ला मंडळी तशीच परत आली! एकंदर गैरव्यवस्थेचा हा तर कळस झाला!

भारतीय शास्त्रीय परिषदेला केवळ एका उत्सवाचें स्वरूप प्राप्त झालें आहे अशी शंका माझ्या-प्रमाणेंच अनेकांना येऊं लागली आहे. तें घालवून ती खरोखर शास्त्रीय परिषद् होईल असा प्रयत्न झाला पाहिजे. विभागाच्या सभांना फक्त तज्ज्ञ लोक येतील, तेथें उत्तम प्रकारचें काम होईल व एकंदर मेळावा बऱ्या लोकांनीं फुगून जाऊन स्थानिक व्यवस्थापकांना व्यवस्था करणें अशक्य होणार नाहीं अशी कांहीं योजना व्हावयास पाहिजे. नाहीं तर जे काय थोडे लोक हिंदुस्थानांत खरोखर शास्त्रीय संशोधन करीत आहेत ते त्या परिषदेचा संबंध सोडतील अशी वेळ लवकरच येईल.

---

## हिंदुस्थानांतील महारोगी

हिंदुस्थानांत महारोगानें पीडित झालेल्यांची संख्या सुमारें दहा लक्ष असून त्यांपैकीं शेंकडा २५ रोगी सांसर्गीक (infectious) आहेत. महारोग्यांची विशेष संख्या हिंदुस्थानच्या ईशान्येकडील आणि दक्षिणेकडील प्रदेशांतून—आसाम, बंगाल, ओरिसा, बिहार, मद्रास—या प्रांतांतून आढळून येते. सांसर्गीक रोग्यांना निराळे ठेवून त्यांच्यावर उपचार करण्याच्या सोयी अजून अत्यंत अपुऱ्या आहेत. हल्लीं चालू असलेल्या केंद्रांतून केवळ १५००० महारोग्यांना पुरेशी जागा आहे.



अनुक्रमणिका






सार–संकलन

# खरा इतिहास : जनतेच्या सर्वांगीण जीवनाचा इतिहास

[ अखिलभारतीय इतिहासपरिषदेचें ११ वें अधिवेशन दिल्ली येथें १९४८ च्या डिसेंबर २५ ला भरलें होतें. म. म. प्रा. दत्तो वामन पोतदार हे या अधिवेशनाचे अध्यक्ष होते. यांनीं जें अध्यक्षीय भाषण केलें त्याचा सारांश खालीं दिला आहे. ]

अखिल भारतीय इतिहास-परिषदेचा जन्म १९३५ सालीं पुणें येथें झाला. तेव्हांपासून इतर शहरांतून या परिषदेचीं अधिवेशनें भरलीं. यंदाचें ११ वें अधिवेशन इतिहासप्रसिद्ध अशा दिल्ली शहरीं भरत आहे.

दिल्ली या नांवांत कांहीं और जादू आहे यांत शंका नाहीं. दिल्ली हें नांव उच्चारल्याबरोबर आपल्या किती तरी प्राचीन स्मृती जागृत होतात ! माझ्या मनश्चक्षूंसमोरून किती तरी ऐतिहासिक व्यक्ती भराभर एकामागून एक जातात ! त्यांमध्यें आमचे प्राचीन 'ऐतिहासिक'—आमचे प्राचीन इतिहास-शास्त्रज्ञ हे माझ्यापुढें उभे रहातात. प्राचीन हिंदुस्थानामध्यें एक वेळ खरोखरीच इतिहासाचा एक विद्या म्हणून शास्त्र म्हणून अभ्यास होत होता. यजुर्वेदांतर्गत एक इतिहासोपनिषद् असून त्यावरून इतिहासाला उपनिषदाची महती प्राप्त झाली होती हें दिसून येतें. त्या इतिहासोपनिषदांतील खालील उतारा मननीय आहे—

॥ इतिहासोपनिषद् ॥

" वृषादर्विकुलं ह वै शिबिकुलं बभूव । तस्यायमितिहासः कुलविद्या बभूव । तद्यो ह स्मेममधीते । स ह स्म राजा भवति । स किंचित्प्राप्यान्तर्हितः । सोऽब्रवीत् । यो मामितिहासं ग्राहयेत् । वरमस्मै दद्यामिति । ततो ब्राह्मणः संयोगं संयुयुजेत् । तमादित्यपुरुषो भास्करवर्णो निष्क्रम्य त एनं ग्राहयांचकार । तमपृच्छत् कोऽसीति । वा वृषादर्विरिति । तस्माद्य इममितिहासमधीते । आदित्यलोके स कामचारी भवति । तस्माद्य इममितिहासमुपनीतो माणवको गृण्हीयात् । गृहीत्वाऽथ ब्राह्मणान् श्रावयेत् । मेधावी भवेत् । वर्षशतं च जीवेत् ॥ "

हें उपनिषद् जरी फार जुनें नसलें तरी इतिहासाभ्यासकांची एक परंपरा प्राचीन काळीं होती असें त्यावरून दिग्दर्शित होतें. ही परंपरा कल्हणाची राजतरंगिणी, त्याचप्रमाणें जुने ताम्रपट व शिलालेख, तशाच भाट आणि चारण यांच्या वंशावली व पट्टावली यांमधून कांहीं काळ चालत आलेली दिसत असली तरी ती पुढें जोरदार टिकून राहिलेली नाहीं ही दुर्दैवाची गोष्ट होय.

या प्राचीन ऐतिहासिक परंपरेचा पुढें पुढें ऱ्हास होत गेला. मुसलमानांच्या अमदानींत इतिहासाच्या अभ्यासास पुन्हां थोडी चालना मिळाली. परंतु इतिहासाच्या खऱ्या शास्त्रशुद्ध अभ्यासास हिंदुस्थानांत युरोपियनांच्या आगमनानन्तरच सुरुवात झाली. युरोपियन पंडितांच्या मागून हिंदी पंडित व्यक्तिशः किंवा संस्थांच्या मार्फत इतिहासाचा अभ्यास करावयास पुढें आले. आरंभीं इतिहासाच्या अभ्यासकांमध्यें परस्परव्यवहार व लेखन करितांना इंग्रजी भाषेचेंच वर्चस्व होतें. जुन्या मुसलमानी वगैरे ऐतिहासिक कागदपत्रांचा अभ्यास मुळांतून न होतां त्यांच्या इंग्रजी भाषांतराच्या आधारानें केला जाई. आणि तें त्या परिस्थितींत साहजिकहि होतें. त्यामुळें इतिहासाचें संशोधन, ज्ञान हें जनतेला गूढच राहिलें असल्यास नवल नाहीं.



अनुक्रमणिका

आतां असें चालणार नाहीं. इतिहासाचा खरा अभ्यास मूळांतील कागदपत्रांवरून झाला पाहिजे. म्हणजे मूळच्या कागदपत्रांच्या भाषा इतिहासाभ्यासकांस चांगल्या अवगत असल्या पाहिजेत. आपले इतिहाससंशोधक बहुभाषाकोविद असले पाहिजेत.

त्याचप्रमाणें इतिहास हा नवीन अर्थानें जनतेचा सर्वांगीण इतिहास म्हणून अभ्यासिला व लिहिला जाणें अवश्य आहे. सामान्य मनुष्याची आतां उपेक्षा करून चालणार नाहीं. अशा नवीन अर्थानें इतिहास अभ्यासावयाचा म्हणजे केवळ जुने ऐतिहासिक कागदपत्र चाळून भागणार नाहीं. ह्याकरितां वाङ्मय, कला, लोककथा, लोकांच्या निरनिराळ्या श्रद्धा व कल्पना यांचा साक्षेपानें अभ्यास व्हावयास पाहिजे. तरच आपल्या इतिहासांतून जनतेच्या जीवनाचें खरेंखुरें चित्र प्रकट होईल. हिंदुस्थानांतील भिन्न भिन्न भाषा आणि त्यांतील साहित्य यांचा सूक्ष्म अभ्यास केल्याशिवाय हें साध्य होणार नाहीं. हिंदुस्थानांत निरनिराळ्या प्रादेशिक विभागांतून भिन्नभाषी लोकसमूह रहात आहेत. आजूबाजूच्या भिन्नभाषी लोकांशींहि त्यांचें दळणवळण असून त्या सर्वांमध्यें एक प्रकारची समान अशी जीवनपद्धति व संस्कृति निर्माण झाली आहे; तथापि तत्तद्भाषी गटाचीहि एक विशिष्ट जीवनपद्धति निर्माण झाली आहे हेंहि लक्षांत घेतलें पाहिजे. अशा प्रत्येक प्रादेशिक लोकसमूहाच्या जीवन-पध्दतीचा अभ्यास केला पाहिजे. अशा सगळ्या घटकांच्या जीवनपद्धतींचा अभ्यास करून नंतर सबंध हिंदुस्थानचें एक संकलित चित्र जर शास्त्रशुद्ध रीतीनें रेखाटलें गेलें तरच खराखुरा हिंदचा सर्वांगीण इतिहास तयार होईल. आपण हें भव्य ध्येय आपणांपुढें ठेविलें पाहिजे.

हें ध्येय साध्य करायचें म्हणजे सर्व प्रकारच्या सामग्रीनें सुसज्ज आणि तज्ज्ञ अशा कार्यकर्त्या ऐतिहासिकांचीं पथकें तयार झालीं पाहिजेत. आमच्याकडे असे एक महान् कार्यकर्ते राजवाडे होऊन गेले. त्यांनींच भारत–इतिहाससंशोधनमंडळाची स्थापना केली. त्यांनीं आपलें सर्व जीवन ऐतिहासिक संशोधन-कार्याप्रीत्यर्थ समर्पित करून त्या कार्याचा मजबूत पायाघातला आहे. कै. स्वामिनाथ अय्यर यांनींहि इतरत्र असेंच काम केलें असून, ही संशोधकी वृत्ति आपल्या देशांत रुजली आहे त्याचें हें लक्षण आहे.

हिंदुस्थानच्या इतिहासाचा प्रश्न साधा नाहीं. आपला हिंदुस्थान हा युरोपएवढा प्रचंड देश असला तरी पूर्वी आपल्या या देशांत युरोपप्रमाणें परस्परांशीं लढणारीं राष्ट्रें निर्माण होऊन त्याचीं युरोपसारखीं शकलें अशीं कधीं झालीं नव्हतीं. त्यांतील विभाग परस्परांशीं लढत असले तरी एक मध्यवर्ती बलाढ्य केंद्र सर्वांना मान्यच होतें. याशिवाय आमचे तत्त्वज्ञानी, साधुसंत आणि धर्मसंस्थापक यांच्या शिकवणुकीनें आपणांमध्यें एक प्रकारचा मानवतावाद आणि सर्वात्मभाव रुजलेला आहे. आपल्या जीवनांत सहिष्णुतेची भावना अनुस्यूत असून त्यायोगानें संघर्षांची कटुता व तीव्रता कमी झालेली आहे. एक उदाहरण द्यायचें तर, जेव्हां नादिरशहानें हिंदुस्थानवर स्वारी केली तेव्हां बाजीरावानें चिमाजी अप्पांना लिहिलेले "आप्पा! परराज्य राहिलें तरी सर्वोवरी आहे" (पेशवे दफ्तर, खंड १५, ले. ७२) हे उद्गार किती अर्थपूर्ण आहेत! अशीं उदाहरणें आणखीं किती तरी देतां येतील. यावरून हिंदुस्थान हा एक आहे ही भावना आपल्या इतिहासांतून खेळत असलेली दिसून येते.

आपल्या स्वतंत्र भारताच्या राष्ट्रीय सरकारकडून जुने ऐतिहासिक कागदपत्र व अवशेष यांचें आस्थेवाईक संरक्षण होईल अशी अपेक्षा करणें योग्यच होईल. इतिहासाच्या अभ्यासाला आवश्यक असें जुनें साहित्य देशाबाहेर जाऊं नये याकरितां योग्य ते कायदे करण्यांत यावेत अशी हिंदी ऐतिहासिक दफ्तर (Historical Records) मंडळानें मागणी केली आहे ती अत्यंत योग्य आहे.

जुन्या ऐतिहासिक कागदपत्रांच्या महत्त्वाविषयीं बोलत असतांना बेनेदेत्तो क्रोचेच्या टीकेची मला आठवण होते. जुने ऐतिहासिक कागदपत्र नुसते म्हणजे निर्जीव हाडें होत. त्यांत चैतन्य ओतणें इतिहासाभ्यासकांचें काम आहे. क्रोचेनें म्हटलें आहे–"प्राचीन ग्रीक व रोमन हे आपल्या थडग्यांतून गाडलेले निर्जीव असे पडले होते. सांस्कृतिक पुनरुज्जीवना–(Renaissance) च्या वेळीं










## खरा इतिहास : जनतेच्या सर्वांगीण जीवनाचा इतिहास

जी मानव्यवृत्ति वहरून आली तिनें त्यांना चैतन्यमय व जागृत केलें. आदिमानवाच्या संस्कृतीचें स्वरूप रानवट, रांगडें म्हणूनच विस्मृतप्राय व उपेक्षित असें होतें. परंतु मानवाच्या प्रगतिक्रमांत जी सौंदर्यवादा-( Romantcism )-ची वृत्ति बहरून आली ती त्या आदिमानवी संस्कृतींतील सौंदर्यार्शी समरस होऊन तिनें तिच्याकडे आपलें लक्ष खेंचलें. अशा रीतीनें जुन्या कागदपत्रांमधून बंदिस्त व निर्जीव झालेले इतिहासाचे भाग जीवनाच्या नवीन उन्मेषानें प्रकाशित होऊन बोलूं लागले व पुढेंहि बोलूं लागतील. अशा प्रकारच्या पुनरुज्जीवनाच्या मागें कांहीं आंतरिक प्रेरणा उत्पन्न व्हाव्या लागतात. नुसत्या भाराभर ऐतिहासिक कागदपत्रांतून अशा प्रेरणा उत्पन्न होत नाहींत !'' हे क्रोचेचे उद्गार सार्थ आहेत. आपल्या परिषदेनें हिंदुस्थानचा सर्वस्पर्शी ( Comprehensive ) इतिहास तयार करण्याचें काम हातीं घेतलें आहे तें 'आंतरिक प्रेरणा' असल्याशिवाय थोडेंच आहे ?

खरे 'ऐतिहासिक' म्हणून आपलें कर्तव्य सत्य आणि न्याय यांची सेवा करणें हें आहे. आपण आपलीं मनें निःपक्षपातीं ठेविलीं पाहिजेत. स्वार्थसंपादनाकरितां सत्याला मुरड घालणाऱ्या कज्जेदलाल पक्षकारांप्रमाणें दृष्टि न ठेवतां, आपण न्यायाधीशाप्रमाणें दृष्टि ठेविली पाहिजे. पाहिले आपण हिंदी, नंतर मराठे, बंगाली, गुजराथी वगैरे. प्रामाणिकपणें म्हणावयाचें तर हीं आमचीं नांवें आम्हांला कशीं टाकून देतां येतील ? प्रामाणिक मराठा, प्रामाणिक बंगाली, गुजराथी राहूनहि आम्हांला तितकेच प्रामाणिक हिंदी नागरिकहि कां रहातां येऊं नये ? हीं आमचीं दोन नांवें परस्परविरोधी नाहींत, तीं परस्परपूरक आहेत.

मानवतावाद किंवा विश्वैक्यवाद हा आम्हाला कांहीं नवीन नाहीं. पाश्चात्य तत्त्वचिंतकांना ॲटम बॉंबमुळें हादरा बसला आहे. टायन्बीसारखा ऐतिहासिक निराशेनें उद्गारतो कीं–'ॲटमबॉंब घेऊन जर मानवजात पिसाट बनणार असेल तर मी आपला मध्यआफ्रिकेंतलि कुब्ज आदिमानव जे नीग्रो त्यांच्याकडे बघेन; निदान ते तरी मानवी संस्कृतीचा कांहीं अवशेष जतन करून ठेवतील, आणि संस्कृतीस पुनः आरंभ करावयास प्रेरणा देतील !' आपल्या "Poetry of History" या पुस्तकांत एमेरी नेफ म्हणतो, "तुरुंगामधून तसेच युद्धांत भयंकर कंटाळवाणें आणि यातनामय जीवन अनुभविलेले, आणि आतां मोठमोठीं इतिहासप्रसिद्ध शहरें जमीनदोस्त झालेलीं पाहिलेले असे अनेक बुद्धिमान् लोक आज तीव्रतेनें विचार करीत आहेत. त्यांना दिसून आलें आहे कीं, पाश्चात्य संस्कृतीची जी धूळधाण झाली आहे ती रानटी परक्यांच्या हातून नव्हे तर शास्त्रीय म्हणून मिरविणाऱ्या दुरभिमानी कल्पनांच्या योगानें. विचाऱ्या असंतुष्ट आणि उपेक्षित जनतेच्या बौद्धिक आणि नैतिक मागसलेपणावर या दुरभिमानानें आपली तुंबडी भरून घेतली आहे''. "मानवावरील संकट मानवानेंच आणलें आहे" म्हणून आध्यात्मिक मूल्यांची प्रतिष्ठापना करणाऱ्या उच्चतर धर्मतत्त्वांतच मानवांचा तरणोपाय आहे असें टायन्बीनें म्हटलें आहे. जगांतील विचारवंतांची अशी अनुकंपनीय स्थिति झाली आहे. आपण हिंदी ऐतिहासिकांनीं याचा विचार करावयास नको काय ?

---

### "सर्वोदय समाज"

सर्वोदय हा क्रांतिकारक विचार व्यक्त करणारा, एक महान् अर्थपूर्ण शब्द आहे. 'सर्वोदय' या शब्दानें कोणता अर्थ सूचित होतो ? थोडयांचाच उदय आम्हांला व्हायला नको आहे, केवळ पुष्कळांचाच किंवा केवळ जास्तींत जास्त माणसांचाच नको आहे. केवळ अधिकांत अधिक व्यक्तींचें अधिकांत अधिक कल्याण होण्यानें आम्हांला समाधान नाहीं. एकूण एक सर्वांचाच–उच्च व नीच, सबळ व निर्बल, बुद्धिमान् व निर्बुद्ध अशा झाडून सर्वांचाच–उदय किंवा कल्याण होणार असेल, तरच आम्हांला समाधान वाटेल, अन्यथा नाहीं. सर्वोदय शब्दांत ही उच्च सर्वस्पर्शी भावना अंतर्भूत आहे. —आचार्य विनोबा

सार–संकलन

# तत्त्वज्ञान कोठें चाललें आहे ?

[ डिसेंबर १९४८ च्या शेवटच्या आठवड्यांत मुंबईला अखिलभारतीय तत्त्वज्ञान–परिषद् भरली होती. तिचे अध्यक्ष बनारस हिंदु युनिव्हर्सिटींतील तत्त्वज्ञानाचे प्रमुख प्रा. मैत्र हे अध्यक्ष होते. त्यांच्या अध्यक्षीय भाषणाचा संक्षिप्त सारांश खालीं दिला आहे. ]

आतां जें वर्ष संपत आहे तें आपल्या देशाला व सर्व जगाला देखील अशुभ वर्ष होतें. कारण वर्षाच्या पहिल्या महिन्यांतच महात्मा गांधींचें निधन झालें. महात्मा गांधी हे आपल्या राष्ट्राचे पिता होते. परंतु केवळ आपल्या देशाच्या दृष्टीनेंच त्यांच्याकडे पहाणें योग्य होणार नाहीं. कारण त्यांचें स्थान सॉक्रेटिस्, येशू ख्रिस्त, भगवान् बुद्ध यांच्या पंक्तींत आहे. खरें म्हटलें तर महात्माजी ह्या युगांतील मानवतेचे सर्वश्रेष्ठ पुजारी होते. त्यांचें अहिंसा-तत्त्व हा मानवतेचा सर्वश्रेष्ठ सिद्धान्त होय. ते खरोखर हिंदुस्थानच्या आत्म्याचें प्रतीक होते. त्यांचें अहिंसातत्त्व म्हणजे आपल्या संस्कृतीचें सार आहे. युगानुयुगें आपला देश हाच संदेश जगाला देत आला आहे.

आज जगामध्यें सर्वच बाबतींत गोंधळ माजला आहे व तत्त्वज्ञान त्याला अपवाद नाहीं. म्हणून माझ्या भाषणाचा विषय 'तत्त्वज्ञान कुणीकडे ?' हा ठेवला आहे. माझ्या भाषणाचें नांव 'मानव कुणीकडे ?' हेंहि ठेवतां आलें असतें. मला जर कोणीं विचारलें कीं कोणत्या प्रकारचें तत्त्वज्ञान आपलें असावें ? तर उत्तरादाखल मी त्याला असा प्रश्न विचारीन कीं, "आपण कोणत्या प्रकारचा मनुष्य होऊं इच्छितां ?" आजकाल तत्त्वज्ञान ह्या नांवाखालीं मिरवणारीं पुष्कळ मतें तत्त्वज्ञान तर नाहींच, उलट तत्त्वज्ञानाला तीं विघातकच आहेत. अशीं मतें म्हणजे सुखवस्तु, बेजबाबदार लोकांचीं करमणुकीचीं साधनें होत. तत्त्वज्ञान्यानें मानाची जागा किंवा लोकप्रियता यांची पर्वा न करतां केवळ सत्यशोधनच करावें.

आपल्याकडे तत्त्वज्ञानाला जी अधोगति लागली आहे, त्याचें मुख्य कारण म्हणजे आपलें राजकीय पारतंत्र्य होय. व पाश्चिमात्य तत्त्वज्ञानाला जें अपयश आलें आहे त्याचें कारण म्हणजे मूल्याकडे दुर्लक्ष करून केवळ प्रत्यक्षावर भर दिला गेला हें होय. तें कांहीं असो. तत्त्वज्ञानानें मात्र मूल्यावरच दृष्टि ठेवली पाहिजे व हीच खरी तात्त्विक दृष्टि होय. सध्यां मानवसंस्कृतीला जी हीनावस्था प्राप्त झाली आहे ती सुधारावयाची असल्यास तत्त्वज्ञानानें निक्षून सांगितलें पाहिजे कीं, "आम्हीं केवळ मूल्याचीच पर्वा करतों, नुसत्या वस्तुस्थितीची नाहीं." आजच्या शास्त्रीय युगांत लोक वस्तुनिष्ठतेच्या मार्गे लागले आहेत. परंतु केवळ वस्तुनिष्ठतेवर जग चालूं शकत नाहीं. आणि आज हे लोक जें वस्तुनिष्ठतेचें अवडंबर माजवूं शकतात त्याचें कारण देखील आपल्या पूर्वजांनीं आपली संस्कृति मूल्यावर आधारली होती हें होय. मात्र आजची ही प्रवृत्ति अशीच चालू राहिल्यास आपली संस्कृति कोलमडून पडेल.

अर्थात् प्राचीन कालांतील मूल्यें आज जशींच्या तशींच कायम ठेवतां येतील असें मात्र नाहीं. आजच्या शास्त्रीय प्रगतीमुळें मनुष्याच्या अनुभवामध्यें जी भर पडली आहे त्यामुळें जुन्या मूल्यांत फरक होईल. आजच्या शास्त्रीय युगांतील वस्तुनिष्ठतेचा जो दोष आहे तो म्हणजे प्रत्येक अनुभवाला इतर सर्व अनुभवांपासून अलग करून स्वतंत्रपणें त्याचा विचार करणें हा होय. ह्या प्रकारानें एकाद्या वस्तूचें सम्यग्ज्ञान होणें तर शक्यच नाहीं.








उलट विपरीत ज्ञान होण्याचा अधिक संभव. वस्तूचें सम्यग्ज्ञान होण्यास त्याचा इतर वस्तूंशीं असलेला संबंध लक्षांत घेऊन त्याकडे साकल्यानें पहाणें अवश्य आहे; संकुचित दृष्टीनें पाहून चालणार नाहीं. आजच्या निरनिराळ्या भौतिक शास्त्रांचीं जीं तत्त्वें आहेत, तीं या आकुंचित दृष्टीचीं फळें आहेत. सर्व अलग अलग वस्तूंकडे संकुचित दृष्टीनें न पहातां जर व्यापक दृष्टीनें पाहिलें तरच त्याच्या खऱ्या स्वरूपाचें दर्शन होईल. हीच तत्त्वज्ञानाची भूमिका आहे.

मूल्यें म्हणजे काय हें समजण्यास त्यांना प्रथमतः अस्तित्वाहून पृथक् करून पाहिलें पाहिजे. वस्तूचीं दोन अंगें आहेत. एक सत्ता किंवा अस्तित्व व दुसरें मूल्य; म्हणजे वस्तूचें पूर्ण ज्ञान होण्यास त्याच्या सत्तेचें तसेंच मूल्याचें ज्ञान होणें अवश्य आहे. अर्थात् एका दृष्टीनें सत्तेला देखील मूल्य म्हणून समजतां येईल. तें कांहीं असो. वस्तु म्हणजे केवळ सत्ता किंवा वस्तु म्हणजे केवळ मूल्य म्हणणें चुकीचें होईल. हिंदी तत्त्वज्ञानांत वस्तूला जें 'सच्चिदानंद' नांव दिलें आहे, तें वस्तूच्या ह्या विविधतेचेंच द्योतक होय.

ज्या ज्ञानानें वस्तुस्थिति काय आहे हें कळतें तेंच ज्ञान खरें ज्ञान किंवा सत्याचें ज्ञान आहे. मूल्याचें ज्ञान हें सत्याचें ज्ञान नव्हे असें कित्येक तत्त्वज्ञांचें मत आहे. परंतु हें मत बरोबर दिसत नाहीं. हें मत खरें धरल्यास मूल्यांचें विवेचन हा तत्त्वज्ञानाचा विषयच होऊं शकणार नाहीं. कारण तत्त्वज्ञानाचें ध्येय काल्पनिक वस्तूंचें ज्ञान नसून सत्याचा साक्षात्कार हें होय.

मूल्य व सत्ता किंवा अस्तित्व हीं परस्परांहून भिन्न आहेत असें आपण म्हटलें आहे. परंतु योग्य विवेचनानंतर कळून येईल कीं अस्तित्वाला देखील एक प्रकारचें मूल्य म्हणून समजलें पाहिजे. कारण जेव्हां एकादी वस्तु आहे असें आपण म्हणतों तेव्हां आपल्या म्हणण्याचा अर्थ असा असतो कीं, ती वस्तु ज्ञात्याच्या ज्ञानावर अवलंबून नसतां स्वतंत्रपणें देखील सत् आहे. अस्तित्व किंवा आहे— पण ह्या शब्दानें त्या प्रकारची ज्ञातृनिरपेक्षता सांगितली जाते. आणि ज्ञातृनिरपेक्षता एक प्रकारचें मूल्य आहे. जी वस्तु ज्ञातृनिरपेक्ष आहे ती काल्पनिक किंवा मनोनिर्मित असूं शकत नाहीं. काल्पनिक किंवा मनोनिर्मित वस्तूंना आपण किंमत देत नाहीं. तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रांत प्रवेश मिळविण्याकरितां कोणत्याहि पदार्थाला कमींत कमी अस्तित्वाचा परवाना हा पाहिजे. वस्तूला इतर कोणतीहि किंमत असो तिला अस्तित्वच जर नसेल तर तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रांत तिला प्रवेश मिळणार नाहीं.

तरी पण नुसतें अस्तित्व असल्यानेंच तत्त्वज्ञान त्याचें विवेचन करील असें सांगतां येत नाहीं. त्याला आणखी इतर किंमत आहे किंवा नाहीं हें पाहूनच त्याचा तत्त्वज्ञानांत विचार होईल. कारण आहेपणा किंवा अस्तित्व हा सत्याचा अगदीं क्षुद्र व संकुचित असा भाग आहे, सत्याचा असा एक अगदीं उदासीन असा धर्म आहे कीं ज्याला जणूं काय कांहीं किंमतच नाहीं. म्हणजे अस्तित्वाच्या दृष्टीनें पाहिलें असतां नर व वानर, अथवा माणसें व दगड यांच्यामध्यें निवड करण्याला अर्थ रहाणार नाहीं. सर्वच वस्तूंना सारखेंच अस्तित्व. आणि 'आहे' एवढ्याच दृष्टीनें पहातां सर्वच वस्तू अगदीं निर्मूल्य व टाकाऊ ठरतील. तत्त्वज्ञानांत अस्तित्वाला किंमत नसण्याचें मुख्य कारण म्हणजे नुसत्या अस्तित्वांत गति, परिवर्तन किंवा प्रेरक शक्ति नाहीं. जे सत्य केवळ अस्तित्वांत आहे तें अनाद्यनंत काल जसेंच्या तसेंच कांहीं एक बदल न होतां राहील.

ह्या बाबतींत आणखी प्रश्न असा उद्भवतो कीं, ज्ञात्याला सोडून मूल्याला स्वतंत्रपणें अस्तित्व आहे काय ? मूल्य ही ज्ञात्याचीच भावना किंवा मनोविकार असेल तर मानसशास्त्रांत त्याला कांहींहि स्थान असलें तरी तत्त्वज्ञानांत त्याला कांहींच स्थान नाहीं. म्हणजे एकतर तत्त्वज्ञानानें हें मान्य केलें पाहिजे कीं मूल्याला ज्ञातृनिरपेक्ष असें कांहीं स्थान आहे किंवा नाहींतर त्याचा तत्त्वज्ञानानें कांहींच विचार करूं नये. ज्ञात्याला सोडून मूल्याला स्वतंत्र अस्तित्व आहे हें मान्य केलें तरी ज्ञाता मूल्याला समजूं शकतो हें मानावयाला कांहीं हरकत नाहीं. आणि आपण जेव्हां कर्तव्यबुद्धीनें प्रेरित होतों, किंवा सुंदर वस्तूचा












रसास्वाद घेतों, तेव्हां आपल्याला वस्तुनिरपेक्ष मूल्याचीच जाणीव होते असें म्हणतां येईल. तरी पण मनुष्याच्या ज्ञानाचा जितका विकास आज झालेला आहे त्यांत ज्ञातृनिरपेक्ष मूल्यांचें संपूर्ण आकलन होतें असें नाहीं. कारण, तसें मानल्यास हेंहि कबूल करावें लागेल कीं, जगाची प्रगति, उत्क्रांति, नवीन व उच्चतर मूल्यांचा विकास इत्यादि येथेंच खुंटली! सध्यांची अपूर्ण स्थिति लक्षांत घेतां असें मानणें म्हणजे मूल्यांचींच किंमत नाहींशी करण्यासारखें होईल. म्हणून असें मानणें योग्य होईल कीं जरी मूल्यांना व्यक्तिनिरपेक्ष अस्तित्व आहे, तरी जगाच्या सध्यांच्या स्थितींत ती अंशतः अभिव्यक्त झालीं आहेत.

पुष्कळदां आपण सत्तेचेंच किंवा अस्तित्वाचें उच्च, नीच असे प्रकार मानतों. परंतु हें ठीक नाहीं. मागें म्हटल्याप्रमाणें अस्तित्वामध्यें उच्च, नीच किंवा दुसऱ्या कोणत्याहि प्रकारचे भेद नाहींत. संत व पापी, मनुष्य व पशु, पर्वत व वारुळ, सर्वांना सारखेंच अस्तित्व आहे. ते आहेतच. बस्स, इतकेंच. परंतु आतांच सांगितल्याप्रमाणें आपण अस्तित्वांत देखील उच्च, नीच भेद करतों. याचा अर्थ काय होतो? त्याचा अर्थ एवढाच आहे कीं, केवळ अस्तित्वावर आपलें समाधान होत नाहीं. आपल्याला इतर मूल्यांची देखील अपेक्षा असते.

मूल्यांची उच्चनीचता हीं तीं मूल्यें किती समृद्ध वा पूर्ण आहेत यांवर आहे. त्या समृद्धीला किंवा पूर्णतेला हिंदी परिभाषेंत 'भग' म्हणतां येईल. भगवान् ह्या शब्दानें सर्व प्रकारच्या मूल्यांची परिपूर्णता व्यक्त होते. सर्वोच्च मूल्य काय आहे? कठोपानिषदांत सांगितल्याप्रमाणें 'पुरुषा'लाच सर्वोच्च मूल्य आहे. म्हणून भगवद्गीतेंत भगवानाला 'पुरुषोत्तम' म्हटलें आहे.

मूल्यांचे नुसते उच्च-नीच भेद आहेत एवढेंच नव्हे तर त्यांच्या पुष्कळ जाती देखील आहेत. अस्तित्वाच्या दृष्टीनें सत्याला अद्वितीय किंवा एकरस असें म्हटलें पाहिजे. परंतु मूल्यांच्या दृष्टीनें 'एक' व 'नाना' दोन्ही एकत्र सुखानें नांदू शकतात. एक सर्वोच्च मूल्य असलें तरी त्याच्या खालीं, त्याच्या पोटांत विलीन न होतां, स्वतंत्रपणें इतर पुष्कळ मूल्यें राहूं शकतात. म्हणजे उच्च, सर्वोच्च मूल्यें खालच्या मूल्यांचें निर्मूलन करतील असें समजण्याचें कारण नाहीं. सर-सेनापति, इतर दुय्यम अधिकारी व सैनिक सर्वच एकत्र राहूं शकतात. उच्च मूल्याकडे इतर मूल्यांची धांव असते. म्हणजे जगाची उत्क्रांतीकडे जी प्रवृत्ति आहे तिची केंद्रीय प्रेरक शक्ति हें सर्वोच्च मूल्य आहे. व विश्वाचें मूल कारण देखील हेंच परममूल्य होय. थोडक्यांत म्हणजे हें परममूल्य जगाच्या उत्क्रांतीची प्रेरक शक्ति व त्याच्या अस्तित्वाचें देखील आद्य कारण आहे. परममूल्य हेंच अंतिम सत्य होय.

म्हणून मूल्यें संपादणें म्हणजे जीं मूल्यें मूळचीं आहेतच त्यांनाच खालच्या पातळीवर आणणें होय. मूल्यांचें वास्तवीकरण (Realization) करणें ह्याला कांहीं अर्थ नाहीं, तरी पण त्यांचें खालच्या पातळीवर अवतरण होणें शक्य आहे. अर्थात् आपल्या दृष्टीनें किंवा जगाच्या दृष्टीनें मूल्यांचें वास्तवीकरण करणें शक्य आहे. अर्थात् जसजसें मूल्यांचें खालच्या पातळीवर अवतरण होईल तसतसें आपण अंतिम सत्याच्या जवळ जाऊं. हें वास्तवीकरण किंवा साक्षात्कार म्हणजे आपल्या दृष्टीनें (ऊर्ध्वगमन) वर जाणें होय. आणि मूल्यांच्या दृष्टीनें तें खालीं येणें (निम्नगमन) होय.

वरील तत्त्वज्ञानाचे विचार योगी अरविंद बाबूंच्या 'लाइफ् डिव्हाइन्' ह्या पुस्तकांतून घेतले आहेत. त्यांच्या मतानें उत्क्रांति किंवा प्रगति म्हणजे जुन्या तत्त्वांशीं कित्येक नवीन तत्त्वांची मिळवणी करणें नव्हे. खऱ्या उत्क्रांतीनें जुन्या तत्त्वांमध्यें सुद्धां बदल होईल. अगदीं नवीन तत्त्वांची उत्पत्ति झाली असतां जुनीं तत्त्वें जशींच्या तशीं न रहातां, त्यांमध्यें परिवर्तन होईल, आजपर्यंत जगांत निसर्गानें 'जड', 'प्राण', 'जीव' व 'मन' हीं मूल्यें संपादन केलीं आहेत. हीं मूल्यें एक दुसऱ्याहून क्रमानें श्रेष्ठ आहेत. जेव्हां 'प्राण' तत्त्वाचें वास्तवकिरण झालें तेव्हां 'जड' तत्त्व पूर्वीप्रमाणें केवळ 'जड' राहिलें नाहीं. त्याचप्रमाणें जेव्हां 'जीव' तत्त्वाचा विकास झाला तेव्हां पूर्वीच्या 'जड' व 'प्राण' तत्त्वांमध्यें बदल झाला. त्याचप्रमाणें 'मन' तत्त्वाबद्दलहि म्हणतां येईल. योगी अरविंदबाबू म्हणतात












कीं, ह्यानंतर विश्वांत मनापेक्षां उच्च मूल्याचें किंवा तत्त्वाचें अवतरण होईल. थोडक्यांत, उत्क्रांतीमध्यें मागच्या तत्त्वांचा केवळ नाश न होतां त्यांमध्यें केवळ बदल होतो. व ह्या परिवर्तनानें तीं तत्त्वें उपकृत होऊन त्यांना अधिक पूर्णता येते.

मूल्याला सत्य मानणाऱ्यांच्यापुढें आणखी एक असा प्रश्न आहे कीं, वाईटाचा चांगल्यामध्येंच समावेश होतो कीं वाईटाची जात चांगल्याहून अगदीं निराळी आहे ? वाईट व चांगलें ह्यांचें द्वैत मानणें म्हणजे माझ्या मतें सत्याला 'मूल्य' न समजणें होय. ह्या प्रश्नाला उत्तर देताना कित्येकांनीं वाईट म्हणून कांहीं नाहींच असें म्हटलें आहे. परंतु हें कसें बरोबर असेल ? जगामध्यें दुःख, अपूर्णता व वाईट आहे हें तर अगदीं उघड आहे. प्रश्न एवढाच आहे कीं, वाईटाला चांगल्याहून स्वतंत्र कांहीं अस्तित्व आहे कीं काय ? विचारान्तीं असें दिसून येईल कीं, वाईटाला मूल्याच्या क्षेत्रामध्येंच अर्थ आहे, इतरत्र नाहीं. मूल्य जणूं काय दोन प्रकारचें आहे. धनमूल्य व ऋणमूल्य. धनमूल्याच्या विरुद्ध वाईट म्हणजे ऋणमूल्य होय. आतां माझें म्हणणें असें आहे कीं, वाईट म्हणून जीं ऋणमूल्यें आहेत तीं कधींहि चांगल्याला किंवा धनमूल्याला दाबून ठेवूं शकत नाहींत. उलट चांगल्याचेंच वाईटावर दवाण असतें. धनमूल्यानें ऋणमूल्यावर जर अजून विजय मिळविला नसेल तर एवढेंच सिद्ध होतें कीं, आपण अजून उत्क्रांतीच्या खालच्या पायरीवर आहोंत. त्यानें असें सिद्ध होत नाहीं कीं वाईट हें अनंत आहे, किंवा मानवांना त्यावर विजय मिळविण्याची शक्यताच नाहीं. वस्तुतः उत्क्रांति म्हणजे वाईटावर क्रमानें अधिकाधिक विजय मिळविणें हेंच होय. उत्क्रांति म्हणजे ऋण-मूल्यांचें परिवर्तन, त्यांच्या कडा घासून टाकणें, जेणें-करून त्यांना धनमूल्यामध्यें बसवतां येईल. थोड-क्यांत, वाईट म्हणजे आपल्या उत्क्रांतीच्या वर्तमान अपूर्ण अवस्थेचें आवश्यक अंग आहे. उदाहरणार्थ, आपण ज्याला सुख म्हणून समजतों तें म्हणजे आनंद नव्हे. आणि ज्याला आपण दुःख समजतों तेंहि आनंदाचा अगदीं अभाव आहे असें नव्हे. आनंद हें मूल्य सुख व दुःख त्या दोघांमधूनही अभिव्यक्त होतें.

त्यावरून असें दिसून येईल कीं, सध्यां आपल्या बौद्धिक भूमिकेवरून ज्या ज्या गोष्टीस आपण मूल्य देतों त्या गोष्टी जेव्हां 'अतिमना'चा म्हणजे मनापेक्षां उच्च मूल्याचा अवतार होईल तेव्हां तशा मूल्यवान् रहाणार नाहींत. ही गोष्ट नैतिक मूल्यांच्या बाबतींत विशेषतः खरी ठरेल. श्रीमद्भागवतांत म्हटलें आहे कीं, गुण व दोष पहाण्याची दृष्टि हा देखील एक दोषच आहे. व खरा गुण गुणदोषवर्जित आहे (भागवत ११–१९–४५). योगी अरविंदबाबूंनीं म्हटलें आहे कीं "नीति ही उत्क्रांतीच्या मार्गांतील नुसती एक पायरी आहे. सच्चिदानंदाचा स्वाभिव्यक्तीकडे एकसारखाच जो ओढा आहे त्यांत पहिल्या प्रथम नीतिमत्ता म्हणून कांहीं चीज नव्हतीच. उत्क्रांतीच्या सध्यांच्या पायरीवर त्याचा उद्भव झाला आहे. व उत्क्रांतीच्या पुढच्या पायरीवर नीतिमत्तेची कांहीं आवश्यकता रहा-णार नाहीं." (लाइफ डिव्हाइन, भा. १ पा. ८४६.)

एका हिंदी राजकारणी पुरुषानें म्हटलें होतें कीं, परतंत्र देशाला राजकारण म्हणून कांहीं नाहीं. त्यांना असेंही म्हणतां आलें असतें कीं, परतंत्र देशाला तत्त्वज्ञान म्हणूनही कांहीं नाहीं. तत्त्वज्ञान म्हणजे स्वतंत्र आत्म्याचा आविष्कार होय. आत्म्यास कोण-त्याही प्रकारचें बंधन असेल तर हा आविष्कार होणार नाहीं; अर्थात् तत्त्वज्ञानाच्या बाबतींत विचार-स्वातंत्र्यालाच प्राधान्य आहे. राजकीय पारतंत्र्याचा विचारस्वातंत्र्यावर परिणाम होतोच. तथापि तो परिणाम अल्पांशानें होणें शक्य आहे. आणि ब्रिटि-शांच्या अमदानींत आपल्याला थोडेंफार विचार-स्वातंत्र्य होतें हें कबूल करावें लागेल. म्हणून ह्या पारतंत्र्यांत देखील आपल्या देशांत योगी अरविंदां-च्या तत्त्वज्ञानासारखें उच्च तत्त्वज्ञान उदयास येऊं शकलें. परंतु कोणत्याही तत्त्वज्ञानाची वाढ तेव्हांच होईल जेव्हां तें जास्तींत जास्त लोकांत फैलावेल व त्यांच्या मनांत जास्तींत जास्त खोल बिंबेल. आणि भारत आतां स्वतंत्र झाल्यानें हें करण्यास आपल्याला संधि मिळाली आहे. हिंदुस्थानचें जें खरें तत्त्वज्ञान आहे व जी खरी संस्कृति आहे ती ओळखून सबंध जगाला देण्याची संधि आपणांला मिळाली आहे. व आजच्या जगाच्या वाईट परिस्थितींत त्याची










आवश्यकताही खूप आहे, ह्याबद्दल कांहीं शंका नाहीं. हिंदुस्थानाच्या तत्त्वज्ञानाचा व संस्कृतीचा मूळ आत्मा खालील वचनांतून प्रकट होणाऱ्या विचारांत सांपडेल :

' सर्वभूतेषु चात्मानं सर्वभूतानि चात्मनि ।

समं पश्यन्नात्मयाजी स्वाराज्यमधिगच्छति ॥- मनु.

( जो स्वतःला भूतमात्रांमध्यें व भूतमात्रें स्वतांत पहातो आणि जो सर्वत्र समदृष्टि आहे, त्याला स्वाराज्य किंवा खरें स्वातंत्र्य मिळतें. )

" येनाहं नामृता स्यां किमहं तेन कुर्याम्। "

—बृहदारण्यकोपनिषद्

( ज्यानें मी ' अमृत ' होणार नाहीं त्याची मला काय जरूर ? )

ज्यांना हिंदी संस्कृतीचें प्रतीक म्हणतां येईल अशा तीन विभूती– योगी अरविंद, महात्मा गांधी व कविवर्य रवींद्रनाथ टागोर ह्या शतकांत जन्मास आल्या. हिंदुस्थान सबंध जगाला तत्त्वज्ञानाच्या कांहीं संदेश देऊं शकतो ह्याबद्दल एवढाच पुरावा पुरेसा नाहीं काय ?

---

## ' सर्व–धर्मी समानत्व '

१ " देवांचा प्रिय प्रियदर्शी राजा सर्व धर्मपंथांतील श्रमण (प्रव्रजित) आणि गृहस्थ यांना पूज्य मानतों व त्यांना दानें व इतर प्रकारच्या देणग्या देऊन आपला त्याविषयींचा गौरव व्यक्त करितो. पण त्यांना निव्वळ दान देणें किंवा देणग्यांच्या रूपानें आपला गौरव व्यक्त करणें एवढेंच देवांच्या प्रिय राजाला विशेष वाटत नाहीं; तर सर्व धर्मपंथांतील सारभूत तत्त्वांची वृद्धि (विकास) व्हावी ही गोष्ट त्याला प्रिय वाटते. हीं मूलभूत तत्त्वांची वृद्धि विविध प्रकारांनीं होतें. त्या वृद्धीचें मूळ आपल्या जिव्हेच्या नियंत्रणामध्यें आहे. हें नियंत्रण अशासाठीं कीं, त्यामुळें आपल्या धर्मपंथाचा बडेजाव व परधर्मपंथाची कारणाशिवाय निंदा होऊं नये !......

" म्हणून सर्व पंथांतील समवाय (सुसंवादन) हाच एक प्रशस्त मार्ग आहे. याच मार्गानें एकमेकांच्या धर्मतत्त्वांचें आपण होऊन व स्वखुषीनें लोक श्रवण करतील; व देवांच्या प्रिय व प्रियदर्शी राजाची अशीच इच्छा आहे कीं, सर्व धर्मपंथीयांनीं ( एकमेकांच्या धर्मतत्त्वांच्या श्रवणानें ) बहुश्रुत व्हावें, आणि कल्याणधर्म हृदयाशीं बाळगावा.

२ ": देवांच्या प्रिय व प्रियदर्शी राजाची अशी इच्छा आहे कीं, सर्वत्र ( आपल्या राज्यांत ) सर्वधर्मपंथीयांनीं वस्ती करावी. कारण त्या सर्वांची इच्छा दोन प्रकारची आहे:–संयम व भावशुद्धि. पण लोकांच्या इच्छा निरनिराळ्या व त्यांच्या आवडीनावडीहि निरनिराळ्या ! त्यांमुळें धर्माच्या आज्ञा कांहीं माणसें संपूर्णपणें पाळतील, तर कांहीं माणसें अंशतः पाळतील. दान देण्याच्या बाबतींत जरी एकाद्याजवळ भरपूर संपत्ति नसेल, तरी त्याचेजवळ खालील गुण तरी असतील : इंद्रियावरील ताबा, चित्ताची शुद्धता, कृतज्ञता आणि दृढनिष्ठा. हेच गुण धर्मपालनास अत्यावश्यक होत. "

**—सम्राट् अशोकाचे दोन शिलालेख,** 'धर्मचक्रा'तून (जानेवारी १९४९ )








# औद्योगिक वृत्त-विशेष

( पॅरेमाऊंट पब्लिसिटी सिंडिकेट लि. पुणें. तर्फे )

**सातारा टेक्स्टाइल मिल्स लि.**—(केशवनगर, सातारा) या ५० लक्ष रु. भांडवलाच्या सुताच्या गिरणीस १२००० चात्यांची परवानगी सरकारकडून मिळाली आहे. कंपनीनें वीस लक्ष रुपयांच्या माशिनरीची ऑर्डर दिली आहे.

**बागलकोट सिमेंट कं. लि.**— ( कचेरी इंडस्ट्रिअल इन्शु. बिल्डिंग्ज, चर्चगेट स्ट्रीट, मुंबई, १) ही एक कोट रु. अधिकृत भांडवलाची कंपनी बागलकोट येथें सिमेंटचा कारखाना काढणार आहे. कंपनीच्या संचालक-मंडळावर मुंबई सरकारतर्फे तीन डायरेक्टर्स असून शेठ तुलसीदास किलाचंद हे कंपनीचे पहिले डायरेक्टर आहेत.

**बँक ऑफ महाराष्ट्र लि.**— ( पुणें २ ) या महाराष्ट्राच्या अग्रेसर बँकेस १९४८ सालांत रु. २ लक्ष ५ हजारांपेक्षां अधिक निव्वळ नफा झालेला आहे. बँकेची उत्तरोत्तर प्रगति होत असून वरील नफ्याची रक्कम मागील वर्षापेक्षां जास्त आहे. सरकारी कर्जरोख्यांत गुंतविलेल्या बँकेच्या भांडवलाचें प्रमाणही आतां वाढलें आहे. बँकेनें म. गांधी-स्मारक-निधीस रु. ७५०० देणगी दिली. बँकेचे व्हाइस-चेअरमन श्री. बा. पुं. वर्दे यांची नेमणूक रिझर्व्ह बँकेच्या मुंबई बोर्डावर झाली आहे. हेंहि तिला भूषणावह आहे.

---



अनुक्रमणिका

वर्ष दुसरें
अंक ५ वा

# नवभारत

फेब्रुवारी
१९४९

## या अंकांतील जाहिराती व जाहिरातदार

आर्य महौषधालय : आयडियल फर्निचर वर्क्स : डॉ. पुरोहित फार्मसी : गजानन जनार्दन बोडस : कैसरी इंडस्ट्रियल्स लि. : साठे बिस्किट कंपनी : दळवी इंजिनिअरिंग वर्क्स : आयुर्वेद रसशाळा लि. : अब्दुल हुसेन अल्लाबक्षर्जी : धि सेंट्रल पॉटरीज लि. : विष्णु फार्मसी : सह्याद्रि विमा कं. लि. : सेंट्रल ग्लास फॅ. : धूतपापेश्वर, पनवेल : आयुर्वेद फा. नगर :

## वर्गणीदारास सूचना

(१) 'नवभारत'चा अंक दरमहा १ तारखेच्या आंत नियमितपणें काळजीपूर्वक पोष्टांत टाकला जातो. वर्गणीदारांस जर आपला अंक ५ तारखेपर्यंत मिळाला नाहीं तर त्यांनीं प्रथम स्थानिक पोष्ट ऑफिसांत चौकशी करून नंतर आमचेकडे लिहावें. अंक शिल्लक असला तरच पाठविला जाईल. अंक न मिळाल्याबद्दल १० तारखेनंतर येणाऱ्या तक्रारीस उत्तर दिलें जाणार नाहीं.

(२) वर्गणीदार कोणत्याहि महिन्यापासून होता येते.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास




नवभारत
७५
अमृतमहोत्सवी
वर्ष




# भारताचे भूषण

जगांतील कोणत्याही राष्ट्रांस औषधी शास्त्राच्या ज्ञानाचा गंधही नव्हता अशा अतिप्राचीन काळापासून भारतवर्षानें या शास्त्रांत आश्चर्यकारक प्रगति केलेली आहे. त्या गोष्टीचा प्रत्येक भारतियास अभिमान वाटल्यास तो सहाजिक नव्हे काय ? जगांतील सर्व वैद्यकांत जुना म्हणून ज्येष्ठपदाचा मान असलेल्या आयुर्वेदाची हिंदुस्थान ही जन्मभूमि आहे.

अहमदनगर येथील आयुर्वेदाश्रम फार्मसीमध्यें हिंदुस्थानांतील सर्वोत्कृष्ट आयुर्वेदीय औषधी तयार केल्या जातात. म्हणून आयुर्वेदाश्रम फार्मसीचें सीलतुमच्या ओळखीचें असणें हितावह आहे.




**आयुर्वेदाश्रम फार्मसी लिमिटेड, (आफालि) अहमदनगर.**

G 19





Regd. No. B. 5177

# गांधी-तत्त्वज्ञानाच्या अभ्यासकांसाठीं

## आमचें आदर्श वाङ्मय

| | |
|---|---|
| उपनिषदांतील दहा गोष्टी (तृतीयावृत्ति) :— शंकरराव देव | रु. ।।।. |
| जवाहरलाल नेहरू : आत्मचरित्र (द्वितीयावृत्ति) | रु. १२।। |
| भारतीय संस्कृति (चतुर्थावृत्ति) :—साने गुरुजी | रु. ३।। |
| गांधीजींचें विविध दर्शन (द्वितीयावृत्ति) :—डॉ. राधाकृष्णन् | रु. २।। |
| जिवंत व्रतोत्सव (द्वितीयावृत्ति) :—आचार्य कालेलकर | रु. ३।।। |
| सत्याग्रही महाराष्ट्र :—प्रेमा कंटक | रु. ३ |
| अर्थशास्त्र कीं अनर्थशास्त्र ? (द्वितीयावृत्ति) :—जॉन रस्किन | रु. २ |
| जीवन-दर्शन (तृतीयावृत्ति) :—खलिल जिब्रान | रु. १।।। |
| संस्कृतीचें भवितव्य (द्वितीयावृत्ति) —डॉ. राधाकृष्णन् | रु. १। |
| जीवन आणि साहित्य :—आचार्य भागवत | रु. २।। |
| संयम कीं स्वैराचार ? :—महात्मा गांधी | रु. १।।। |
| हिंदु-मुसलमान-ऐक्य :—आचार्य जावडेकर | रु. ३ |
| गीता-हृदय (तृतीयावृत्ति) :—साने गुरुजी | रु. ।।।. |
| हिंदूंचें समाजकारण :—आचार्य कालेलकर | रु. २। |
| काँग्रेस-कथा (द्वितीयावृत्ति) :—गो. आ. देशपांडे | रु. ४।। |
| भगवान् बुद्धासाठीं :—शंकरराव देव | रु. ३।। |
| आचार्य कृपलानी :—निवडक लेख व भाषणें | रु. ३ |
| वाल्मिकी आश्रमांतील प्रवचनें :—आचार्य जावडेकर | रु. १ |
| संपूर्ण स्वदेशी :—महात्मा गांधी | रु. २। |
| लो. टिळक व महात्मा गांधी :—आचार्य जावडेकर | रु. २ |
| पत्री :—साने गुरुजी | रु. ३।। |
| गांधीजींचें मानस :—प्रभु आणि राव | रु. ४ |
| दिल्ली-डायरी :—महात्मा गांधी | रु. ६ |

सुलभ राष्ट्रीय ग्रंथमाला, पुणें २.




